# घरचा राजवैद्य.

अथवा

# आरोग्य रक्षणाचा माहितगार.



पुस्तक तयार करणार,

के० वा० गोपाळ यज्ञेश्वर भिडे राहणार मालगुंड.

प्रकाशक—वासुदेव गोपाळ भिडे,

चालक— { गोपाळ यज्ञेश्वर भिडे औषधी कारखाना,
मु० मालगुंड जि. रत्नागिरी.



आवृत्ति साहावी.



मार्च १९३१

किंमत २ रुपये.

# प्रस्तावना.



मनुष्यास सुख मिळण्याचीं साधनें आहेत त्या सर्वांत प्रकृति निरोगी आणि बळकट असणें हें महत्वाचें साधन आहे. म्हणून तिकडे विशेष लक्ष पुरविलें पाहिजे, परंतु आपली प्रकृति निरोगी कशी ठेवावी व रोग झाला असतां काय उपचार करावे याची माहिती पुष्कळांस नसते, यामुळें ह्या कामास वैद्यावर अवलंबून राहणें भाग पडते. खेडेगांवातून वैद्य क्वचित असतात, कोठें असले तर वक्तशीर मिळत नाहींत, व तसें जाहलें म्हणजे प्रकृति बिघडते व ती सुधारण्यास फार अडचण पडते. दुसरी गोष्ट अशी कीं जरी वैद्य मिळाला तरी गरीब लोकांस पैसे खर्च करण्याचें सामर्थ्य नसल्यामुळें औषध मिळण्याची अडचण पडते. तेव्हां या व अशा अनेक गोष्टींचा विचार करून वरील अडचणी बऱ्याच अंशीं दूर व्हाव्या म्हणून आम्ही "घरचा वैद्य" या नांवाचें पुस्तक पूर्वी प्रसिद्ध केलें होतें, व त्याचा लोकांस पुष्कळ उपयोग होत असल्यामुळें त्याच्या मागण्याहि येतात. म्हणून त्या पुस्तकांत सुधारणा करून आणखीं मिळालेले अनुभव व माहिती देऊन वाढवून हें पुस्तक तयार केलें आहे.

या पुस्तकाचीं ८ प्रकरणें केलीं आहेत. त्या प्रत्येक प्रकरणांत कोणकोणते विषय आहेत त्याचें टिपण पुढें दिलें आहे व वर्णवार अनुक्रमणिका दिली आहे.

**प्रकरण** ७ यांत औषधांची यादी दिली आहे. त्यांतील बहुतेक काढे व चूर्णे शार्ङ्गधर म्हणून जो जुना वैद्यक ग्रंथ आहे त्यांतील दिलीं आहेत, व तीं अनुभवानें विशेष चांगलीं वाटल्यामुळेंच दिलीं आहेत.

**प्रकरण** ८ यांत पदार्थांचे गुणदोष दिले आहेत त्यावरून कोणता पदार्थ कोणत्या प्रकृतीचे माणसास हितकर होईल हें समजेल व त्याप्रमाणें वागण्यास ठीक पडेल.

कोठें कोठें अमुक औषध द्यावें असें लिहून त्याचे पुढें यादी नंबर लिहिला आहे, तो प्रकरण ७ यांत पहावा म्हणजे त्या औषधासंबंधीं माहिती समजेल.

या पुस्तकांत शास्त्रोक्त व अनुभविक अशीं औषधें व इतर माहिती दिली आहे. औषधांपैकीं बरींच औषधें स्वल्प खर्चानें व स्वल्प प्रयासानें मिळणारीं आहेत व

सर्वांस या पुस्तकाचा उपयोग करितां यावा अशा बेतानें व्यवस्था केली आहे, तेव्हां पुस्तकांत लिहिल्या प्रमाणें काळजी पूर्वक व्यवस्था करून उपचार केले तर हें पुस्तक खरोखरच राजवैद्य होईल अशी आमची मोठी उमेद आहे. निदान हें खाचित आहे कीं, आरोग्य रक्षणाचे कामीं हें पुष्कळ मदत करील, व वारंवार वैद्याकडे जाण्याचें कारण पडूं देणार नाहीं.

हें पुस्तक करितांना माधवनिदान, शार्ङ्गधर, निघंटरत्नाकर वगैरे वैद्यक पुस्तकांचें सहाय्य घेतलें आहे, व बरीच माहिती कित्येक मित्रांकडून मिळालेली आहे. तेव्हां या पुस्तकाचा जो उपयोग होईल त्याचें बहुतेक श्रेय त्या त्या ग्रंथकर्त्यांकडे व आमचे मित्रांकडे आहे.

या पुस्तकांत जो कमीपणा असेल व ज्या चुका असतील त्या कोणी कळविल्यास त्यांचे फार आभार मानून पुढील आवृत्तीचे वेळेस त्या गोष्टींचा विचार करूं.

अखेरीस पुस्तकांतील दोष मनांत न आणितां गुण असेल तेवढा घेण्याविषयीं विनंति करितों.

मु. मालगुंड, }
ता. ३--३--०३ } गोपाळ यज्ञेश्वर भिडे.



# साहावी आवृत्ति.

पांचवी आवृत्ति सुधारून वाढवून ही छापिली आहे. कापडी बाइंडिंग प्रतीस दोन आणे जास्त.

मु. मालगुंड, } विष्णु गोपाळ भिडे.
ता. १--३--३१ } वासुदेव गोपाळ भिडे.

# विषयांचें टिपण





---

पुस्तक छापून पुरें झाल्यावर जी माहिती मिळाली ती फार उपयोगी सबब देत आहें.

**पुळीः**—आडिवरें गांवचे एका स्नेह्याचे मुलास पायावर पुळी होऊन पाय ढोपरा खालीं सडूं लागला. पुणें येथें डाक्टरचे उपचार होऊन कांहीं बरा होईना. पाय कापून टाकणें हा एकच मार्ग डाक्टरनीं सांगितला. त्याजला गांवीं परत आणिल्यावर कापूर भेंडीचें पाळ उगाळून लाविल्यावर तो पाय पहिल्यासारखा चांगला बरा झाला. कोणताही सडणारा व्रण असला तरी कापूर भेंडीचे पाळानें सडण्याची क्रिया बंद होऊन व्रण भरून येतो तरी वाचकांनीं हा उपाय रोगी आढळल्यास त्यास सांगावा. आम्ही पाळें लागेल तितकीं अल्प मोबदल्यांत पुरऊं.

—**ग्रंथकर्ता.**

# विषयांची वर्णवार अनुक्रमणिका.

# घरचा राजवैद्य

अथवा

## आरोग्य रक्षणाचा माहितगार.

### प्रकरण १ विषविकार.

विष विकार दोन प्रकारचे आहेत. १ प्राण्यांचे दंशानें, किंवा प्राण्यांचें विष अन्य तऱ्हेनें पोटांत गेल्यानें होणारा विकार (विषार). २ विषारी पदार्थ पोटांत गेल्यानें होणारा विकार.

**विषारावर औषध देण्यापूर्वी ध्यानांत ठेवण्यासारिख्या गोष्टी.**

१. विषार झाला आहे किंवा नाहीं, झाला असेल तर कोणत्या जनावरांपासून झाला आहे, याची खात्री करण्यासारिखी असेल तितक्या प्रकारानें करावी. अमूकच जनावराचा विषार झाला आहे हें समजलें ह्मणजे उपचार करण्यास सोईचें पडतें.

२. विषार झाला आहे किंवा नाहीं याची परीक्षा अशी करावी कीं, काळ्या पानवेलीचें पान दंश झालेल्या जाग्यावर चोळावें, ह्मणजे विषार झाला असल्यास दंश झालेली जागा काळी होईल. करवंदीचें पाळ ६ मासे पर्यंत पाण्यांत उगाळून पोटांत ध्यावें. विषार झाला असेल तर त्यापासून वांति होणार नाहीं. विषारानें डोक्यांत भार, दंश झालेल्या ठिकाणीं फुणफुण व सूज अंगाचा दाह, घेरी येणें, तोंडावाटे फेंस, अंगाला घाण, बेशुद्धपणा, इत्यादि विकार होतात. यावरूनहि विषार झाला किंवा नाहीं हें ठरवावें.

३. कोणताही विषारी सर्प चावतो तेव्हां · · अशा दोन जखमा होतात; परंतु जेव्हां दोहों पेक्षां अधिक ह्मणजे ⁝ ⁝ अशा जखमा होतात, तेव्हां तो सर्प विषारी नाहीं असें अगर तो दंश विषाचे दातांनीं झालेला नाहीं असें बिनधास्त समजावें. दंश होतांना मनुष्य झोंपला असला तर तो त्या दंशाचे वेदनेनें उठतो; त्याला कांहीं टोंचलेंसें वाटतें. वेदना फार नसतात. तात्काळ होणारीं लक्षणें ह्मटलीं ह्मणजे बेशुद्धि, बेजारपणा आणि पाय मोडकळणें हीं होत. शिवाय वांति होणें, श्वासोच्छ्वास मंद होणें, नाडी जलद चालणें किंवा अनियमित चालणें, जीभ बाहेर येणें, वगैरे अनेक लक्षणें होतात.

४. जेथें औषधाचें प्रमाण सांगितलें नाहीं, तेथें मोठे (२० वर्षांवरील) मनुष्यास पाल्याचा अगर फळाचा रस ४—८ तोळे पर्यंत द्यावा, व लहानास (२०

वर्षांचे आंतील ) १—४ तोळे पर्यंत द्यावा. पाळ देणें असेल तेव्हां मोठ्यास ६ माशां-पासून २ तोळे पर्यंत द्यावें, व लहानास १—६ मासे पर्यंत द्यावें.

५. औषधाचें प्रमाण जरी सांगितलें असलें, तरी मनुष्याची प्रकृति, वय, व विषार कितपत झाला आहे, इत्यादि गोष्टींचा विचार करून औषधाचें प्रमाण कमजास्त करावें.

६. पाळ किंवा साल उगाळणें असल्यास थंड पाण्यांत उगाळावी, परंतु प्रकृति फार अशक्त असेल तर गरम पाण्यांत उगाळावी. पाणी घेणें तें औषध उगाळून पितां यावें अशा बेतानें घ्यावें.

७. जेथें पथ्य सांगितलें नाहीं तेथें तेल, तिखट, आंबट आणि वातुळ असे पदार्थ खाऊं नयेत. भात खाणें तो सोनफळ अगर नवान्न या जातीचे तांदुळाचा खावा. दिवा जवळ ठेवूं नये. मीठ न खाल्लें तर चांगलें. ( मिठा ऐवजीं सैंधव घ्यावें. )

८. रोग्यास अमुकच औषध आहे हें न समजण्याबद्दल फारच खबरदारी घ्यावी. अमुक औषध आहे हें रोग्यास समजलें, व या औषधानें काय होणार वगैरे गोष्टी रोग्याचे मनांत आल्या, ह्मणजे तें चांगलें औषध असलें तरी मनावर घडलेले परिणामामुळें उपयोग कमी होईल. रोग्याची औषधावर श्रद्धा असणें हें गुण येण्यास फारच मदत करणारें आहे.

९. विषार होतांच उपचार सुरू करावे. एक औषध २-३ वेळां देऊन कांहींच गुण न वाटेल तर दुसरें औषध द्यावें.

१०. पहिल्यानें लिहिलेलें औषध मिळाल्यास तेंच अगोदर द्यावें. कारण विशेष गुणकारी व अनुभवास आलेलीं अशीं औषधें प्रथम लिहिलीं आहेत. पहिलें औषध न मिळाल्यास, अगर देऊन गुण न आल्यास दुसरें द्यावें.

११. ज्या प्राण्यांचे विषारावर जें औषध लिहिलें आहे, तें न मिळाल्यास मिळेपर्यंत पुढें ‘ सर्व प्राण्यांचे दंशावर उपचार ’ या सदराखालीं लिहिलेले औषधांपैकीं एखादें द्यावें. या औषधांपासून विषार चढणार तर नाहींच, परंतु पुष्कळ प्रसंगीं दुसरें औषधही घ्यावें लागणार नाहीं.

१२. दिवसांतून कितीवेळ औषध घ्यावें हें जेथें सांगितलें नाहीं तेथें दिवसांतून ३।४ वेळां घ्यावें.

१३. औषध ताजें मिळवावें, तसें न मिळेल तर जुनें उपयोगांत आणावें.

## विंचू

विंचू चावला ( नागीनें दंश केला ) असतां प्रथम अग्नी लागल्यासारखी आग होते, नंतर ती पीडा सर्व शरिरांत पसरते. विंचू चावल्याबरोबर दंश जाहल्या भागावरती दोरा ताणून बांधावा व तो भाग चोखून थुंकून टाकावा. चोखणाऱ्याचे तोंडांत क्षत

मात्र असूं नये. विंचवाच्या जाति अनेक आहेत. याचे विषारावर लिहिलेलीं औषधें प्रकृति मानानें सर्वांसच एकसारिखीं लागू पडत नाहींत. एकास एका औषधापासून गुण आला तरी दुसऱ्यास त्याच औषधापासून तितका गुण येत नाहीं. ह्मणून एका औषधानें गुण न आल्यास थोडक्या वेळांत दुसरें उपयोगांत आणावें. औषध दंश झालेल्या जाग्यावर चोळावें, व जेथपर्यंत वेदना होत असतील तेथपर्यंतहि लावावें व चोळावें.

**उपचारः**—१ आघाड्याच्या झाडाची मुळी उगाळून लेप द्यावा. २ कुंपणांत वगैरे ज्या एरंडाचे मोखे घालितात व ज्यास मोंगली एरंड ह्मणतात त्या झाडाचा पाला आणि काळ्या तुळशीचा पाला समभाग एकत्र करून दंश झालेल्या जाग्यावर चोळावा. याच एरंडाचे पानांचा रस दंशित जागीं चोळून, तोच रस मनुष्याच्या ज्या बाजूस दंश झाला असेल, त्याचे दुसरे बाजूचे कानांत घालावा. ३ सतापाचे झाडाचा पाला चोळावा ४ उंबराचा पाला पाण्यांत वाटून विंचू चढला असेल तेथपासून दंशाचे जाग्यापर्यंत चोळावा. ५ काळे अळवाचा कांदा उगाळून लेप द्यावा. ६ खाजकोलतीच्या झाडाची मुळी उगाळून लेप द्यावा. ७ " पांढरा चांफा " या झाडाची साल उगाळून दंशाचे जागीं लावावी ८ नवसागर आणि हरताळ पाण्यांत वाटून दंशाचे जागीं लेप द्यावा. ९ बचनाग पाण्यांत उगाळून लेप द्यावा. १० बाभ्याचें पाळ दह्यांत उगाळून लावावें. ११ कापशीचा पाला आणि मोहऱ्या एकत्र वाटून लेप द्यावा. १२ तुरटीचा खडा दिव्यावर तापवून रस होऊं लागला ह्मणजे लागलाच दंशाचे जाग्यावर लावावा. १३ सूर्य फुलाच्या झाडाचें पान चोळून त्याचा वास घ्यावा. १४ जपाळाची बी पाण्यांत उगाळून लेप द्यावा. १५ सोमल लिंबाचे रसांत उगाळून लावावा. १६ मिठाचा खडा दंशाचे जागीं जोरानें दाबून धरावा १७ चिंचेच्या पानांचें अथवा कांद्याचें पोटीस बांधावें.

**विशेष सूचनाः**—औषधापासून गुण आला तरी केव्हां केव्हां दंशित जागीं फुणफुण राहतो तसें होईल तर त्या ठिकाणीं तिळाचें तेल १—२ घटिका चोळावें.

## फुरसें.

हा प्राणी सुमारें वीत दीड वीत लांब असतो. याचे २।३ प्रकार आहेत, परंतु सर्वांवर उपचार एकसारिखेच आहेत. यानें दंश केला असतां त्या ठिकाणीं रक्त व सूज येते, फुणफुण सुटतो, मस्तकांत भार येतो, दिवा पाहवत नाहीं पाहिला तर विषविकार वाढतो. विषाचा विकार शरिरांत फार भिनला तर सर्व रोमरंध्रांतून रक्त येऊं लागतें. यासच उपळ सुटली असें लोक ह्मणतात किंवा पोटांत रक्त गोठतें.

**उपचारः**—१ काळ्या कुड्याचें २।३ तोळे पाळ, ५।६ तोळे गोमुत्रांत उगाळून द्यावें. काळ्या कुड्याचें पाळ न मिळेल तर दुसरे प्रकारचे कुड्याचें द्यावें. हें औषध दिवसांतून तीन वेळां पोटांत घ्यावें, आणि दंश झालेल्या जाग्यावर गणसुरीचे

पाळाचा लेप द्यावा. हें औषध साधारण दिसतें परंतु याचा गुण उत्तम येतो. तीन दिवस झाल्यावर दहिंभात जेवावा. तोंपर्यंत दहीं किंवा ताक खाऊं नये. २ फांद ह्मणून एक प्रकारची वेल आहे. हिचें पान आपट्याचे पानासारिखें असतें. या वेलीचें पाळ सुमारें एक तोळा घेऊन दोन अडीच तोळे पाण्यांत उगाळून दिवसांतून एकदां द्यावें. दिल्यावर ४ घटिकेनें ताकभात खावा. ३ भारंगीचें पाळ ६ माशांपासून एक तोळा पर्यंत पाण्यांत उगाळून द्यावें, किंवा याच झाडाचे पाल्याचा रस द्यावा. घेरी वगैरे येईल तर कण्हेरी पाजावी. ४ हळदवेलीचें पाळ व वेखंड हीं समभाग उगाळून तें पोटांत घ्यावें. एकंदर मिश्रण २–३ तोळे असावें. याचाच लेप दंशित जागीं करावा ५ पांगळ्याचें पाळ १|२ तोळे घेऊन पाण्यांत उगाळुन घ्यावें, व दंशित जागीं लेप करावा. ६ गरुडवेलीचा कांदा सुमारें १|२ तोळे घेऊन, पाण्यांत उगाळून द्यावा. ७ गणसुरीचें पाळ ६ मासे व १|२ रिठे पाण्यांत उगाळून तें द्यावें. हें औषध दिवसांतून ३ वेळां द्यावें. ८ हडकीच्या झाडाचें पाळ उगाळून द्यावें. व दंशावर लावावें. ९ सापसंदीचें पाळ उगाळून द्यावें, किंवा त्याच झाडाचे पाल्याचा रस द्यावा. १० धावशीचें पाळ द्यावें. ११ अगस्त्याचे झाडाची साल सुमारें १ तोळा व २ रिठें पाण्यांत उगाळुन तें द्यावें. विष उतरल्यावर तूपभात घालावा. १२ वेल पाडळीचें मुळ उगाळुन द्यावें, व दंशावर लावावें. १३ तांबडे सालीचे कुंभ्याचा रस ५|६ तोळे (रस न निघेल तर पाण्यांत साल वाटून रस काढावा) व काळे वेलीचा रस अर्धे-तोळ्यापासून १ तोळ्यापर्यंत असे एकत्र करून आंत थोडी मिरपूड घालून द्यावें; १४ अळविणीचा पाला व काळीं मिऱ्यें एकत्र वाटून तें खावें.

**उपळ सुटल्यासः—**१ सायाचे झाडाचीं कोवळीं पानें किंवा ढिऱ्या यांचा ५|६ तोळे रस द्यावा. २ बिवळ्याचे झाडाचा चीक दांतास लावावा, आणि याच झाडाचे सालीचा रस पोटांत घ्यावा, ह्मणजे तावडतोब गूण येतो. ३ सापसंदीचें पाळ उगाळून घ्यावें. ४ कांगणी (कांकणी) चें पाळ उगाळून घ्यावें. ५ तुडतुडी व पुसरी यांचीं पाळें समभाग घेऊन तुपांत उगाळून तें मस्तकास गजावें.

**डोक्यास भार आल्यासः—**काळ्या कुड्याचें पाळ उगाळून मस्तकास गजावें.

**सूज आल्यासः—**१ गणसुरीचें पाळ उगाळून सूज आलेल्या भागास लावावें. २ धोतऱ्याचे पाल्याचा रस काढून ऊन करून त्यांत कुळिथांचें पीठ घालून त्याचा लेप द्यावा. ३ उक्षीचें पाळ गोमूत्रात उगाळुन लावावें.

**विषाचें पेढ पोटांत धरल्यास किंवा अंगावर विष गोठल्यास** अगस्त्याचे झाडाची उत्तरेकडील साल उगाळून पोटांत घ्यावी, किंवा काळे वेलीचा कांदा उगाळून पूर्वी लोणी लावून मग पोटास लावावा. यास पुष्कळ खाज आहे ह्मणून पोटांत घेऊं नये.

**अंगाची आग झाल्यासः**—धावशीचें पाळ उगाळून द्यावें. **पथ्यः**—कुळिथांच्या घुगऱ्या, नाचण्याची भाकरी, सोनफळ किंवा नवान्न या जातीचे तांदुळांचा भात हे पदार्थ खावे. मीठ खाऊं नये. भात खाणें असेल तेव्हां कुळियांचे कटाशीं खावा. जवळ दिवा असूं नये. तेल, तिखट, व आंबट खाऊं नये.

### मण्यार

या प्राण्याच्या २।३ जात आहेत. एक जात तर अशी आहे कीं ती अंगावरून गेली किंवा तिची सावली अंगावर पडली, तर तिचे विषाची बाधा होते. कोणत्याही मण्यारीचे विषाची बाधा होऊन त्वरित उपाय न झाल्यास दिवसास बाधा झाली असतां सूर्यास्ताचे अगोदर, व रात्रीस झाली असतां सूर्योदयाचे अगोदर मनुष्य मरतें या करितां त्वरित उपाय झाले पाहिजेत. या प्राण्याच्या विषानें घेऱ्या येतात, व बेशुद्धि होते. सर्व जातीचे मण्यारीवर औषधी उपचार एकच आहेत.

**विशेष सूचनाः**—खालीं लिहिलेले औषधांपैकीं कोणतेंही औषध दिलें तरी नंबर १।२।३ यापैकीं एखादें औषध सर्वांगास गजावें.

**उपचारः**—१ धावशीचे पाल्याचा रस व सब्जाचे पाल्याचा रस, हे समभाग एकत्र करून, तें मिश्रण ७।८ तोळे पिण्यास द्यावें, व तेंच मिश्रण मस्तकास व सर्वांगास गजावें, व नाकांतहि घालावें. विष कमी झाल्याशिवाय गजण्याचें बंद करूं नये. पोटांत हें औषध देणें तें विष उतरेपर्यंत प्रहराप्रहरानें द्यावें. मनुष्यास शुद्धि येऊन रोजच्या प्रमाणें व्यवहार सुरू झाले ह्मणजे विष कमी झालें असें समजावें. या प्राण्याचे विषावर हें औषध केवळ अमृत आहे. या सारिखें दुसरें उत्तम औषध नाहीं ह्मटलें तरी चालेल. हें वेळेवर पोंचलें असतां मण्यारीचें विष कधींही बाधावयाचें नाहीं. आशा सोडलेले असे लोक सुद्धां या औषधानें बरे झालेले आहेत. कदाचित सब्जाचा रस न मिळेल तर धावशीचें पाळ पोटांत द्यावें, व पाल्याचा रस सर्वांगास गजावा. २ देवडांगरीचें फळ द्यावें. "तें देण्याची कृति सर्पावरील उपचार यांत पहा." हेंहि औषध उत्तमपैकीं आहे. ३ काजूच्या झाडाचे सालीचा किंवा पाल्याचा रस ८।१० तोळे द्यावा, व सर्वांगास गजावा. मग दुर्वांचा रस द्यावा. ४ मण्यारकांडें याच्या पातीचा रस ५।७ तोळे काढून त्यांत त्याच झाडाची थोडी मुळी उगाळून तो द्यावा व सर्वांगास गजावा. ५ आष्टाचे सालीचा रस १।२ तोळे द्यावा. ६ कुंभ्याचे पाल्याचा रस ५।७ तोळे द्यावा, व तोच रस नाकांत व कानांत जोरानें फुंकावा, व मस्तकास चोळावा. ७ पडवळाचा रस द्यावा.

### घोणस

हें जनावर अंगानें जाड असून लांबी सुमारें १।२ हात असते. याचे विषाचा विकार साफ मोडला नाहीं तर बरेच दिवसांनीं अंगावर चट्टे पडतात. याचे विषापासून

ताबडतोब जरी मनुष्य मरत नाहीं, तरी त्याची भीति पुष्कळ दिवस पर्यंत असते.

**उपचार:**—पांगळ्याचें पाळ पाण्यांत उगाळून द्यावें. व पाला वाटून दंशावर बांधावा. २ गणसुरीचें पाळ पाण्यांत उगाळून द्यावें, व दंशाचे ठिकाणीं त्याचा लेप द्यावा. ३ कांटलीचे वेलीचा कांदा पाण्यांत उगाळून द्यावा. ४ रायआंवळीचे पाल्याचा रस ५।७ तोळे काढून त्यांत गणसुरीचें पाळ उगाळून द्यावा. ५ भारंगीचें पाळ पाण्यांत उगाळून द्यावें.

## सर्प

हा प्राणी फारच भयंकर आहे. या सारिखा दुष्ट, विषारी, आणि ताबडतोब प्राण घेणारा, दुसरा प्राणी नाहीं ह्मटलें तरी चालेल. याचें विष फारच भयंकर आहे. यानें दंश केल्यापासून १।२ प्रहरांचे आंत, फार तर ४ प्रहरांचे आंत मनुष्य मरतें. या करितां अति त्वरित उपचार केले पाहिजेत. हा प्राणी चावला ह्मणजे यमाचे घरचें बलावणें आलें असें ह्मणतात, तें खरें आहे. या करितां त्वरित उपचार करण्यास चुकूं नये. याचे विषाची बाधा झाल्याची परीक्षा अशी आहे कीं, दंश झालेल्या मनुष्यास कडु लिंबाचा पाला किंवा मिरच्या खाण्यास दिल्या असतां, विषबाधा झाली असेल तर अनुक्रमें कडू व तिखट लागणार नाहीं.

सर्प दंश झाला ह्मणजे खालीं लिहिलेलीं औषधें द्यावींच, परंतु पहिल्यानें सर्व शरिरांत सर्पाचें विष भिनूंनये ह्मणुन दंश स्थळाच्या वरील बाजूस ताणून पट्टा बांधावा. औषध सुरू असतां असें करावें कीं, दंश झालेल्या ठिकाणीं शस्त्रानें जवळ जवळ दोन तीन फांसण्या रक्त येई अशा मारून तेथें जिवंत कोंबड्याचें गुदद्वार चिकटवून धरावें. थोडे वेळानें तें कोंबडें विषाचे योगानें मरतें. मेल्यावर दुसरें धरावें. याप्रमाणें कोंबडें न मरेपर्यंत करावें. एखादे वेळेस वीस पंचवीस कोंबडीं सुद्धां मरतात. हा उपाय फार चांगला आहे. मात्र कोंबडीं लावणारा मनुष्य कुशल असला पाहिजे, नाहीं तर कोंबडेंच लागत नाहीं.

**उपचार:**—१ देवडांगरीचे फळाचे आंतील शिबें प्रत्येक वेळेस सुमारें ·॥· ते १ फळांचें घेऊन तें पांच सहा तोळे पाण्यांत कोलून तासातासाच्या अंतरानें द्यावें. मनुष्यास उतार पडलासें वाटलें ह्मणजे प्रमाणानें व जास्त वेळानें द्यावें. अगदीं विकार मोडला ह्मणजे तूप पाजावें. या औषधानें वांति होऊन किंवा रेच होऊन विष पडेल. हें औषध फार उत्तम आहे. देवडांगरीचीं झाडें कोंकणांत क्वचित असतात, ह्मणून त्यांचें बीं आणून झाडें तयार करावीं. व त्यांचीं फळें संग्रहास ठेवावीं. साधारणपणें कांटलासारखीं यांचीं फळें आहेत. २ भुइपाडळ ह्मणून एक वेल आहे. ( कोणी वेल-पाडळ असेंही ह्मणतात. ) तिचें पाळ प्रत्येक वेळेस तीन पासून सहा मासे पर्यंत तासातासाचे अंतरानें चावून खावें, तसें खाण्याचें अवसान नसेल तर पाण्यांत उगा-

ळून पिण्यास द्यावें. हेंच पाळ पाण्यांत उगाळून अंजन करावें. व दंशाचे ठिकाणीं लेप द्यावा. ३ सबजाचे पाल्याचा रस प्रत्येक वेळेस ४ तोळे पर्यंत तासातासाच्या अंतरानें २।४ वेळां द्यावा. ४ खुरचाफ्याची शेंग पाण्यांत उगाळून द्यावी. शेंग न मिळेल तर याच झाडाचे सालीचा रस द्यावा. या झाडाच्या शेंगा वेळेवर मिळत नाहींत ह्मणून हंगामी आणून दुधांत उकडून सुकवून ठेवाव्या. हें औषध फार उत्तम आहे. ५ रिठ्याचीं ८।१० फळें, १०।१२ तोळे पाण्यांत कोळून तें पाणी पिण्यास द्यावें, व हेंच फळ पाण्यांत उगाळून अंजन करावें, हें औषध तासातासानें २।३ दां द्यावें. ६ कडूनिंबाचे पाल्याचा अगर सालीचा रस द्यावा. कडूपणा लागूं लागला ह्मणजे विष उतरलें असें समजावें. ७ मोराचीं पिसें तमाखू बरोबर चिलमींत घालून ओढावीं. ८ पांढरे कण्हेरीचें मूळ द्यावें. मात्र सर्प दंशच झाला आहे अशी खात्री झाल्यावर हें औषध द्यावें नाहीं तर इतर जनावरांचा दंश झाला असल्यास समयीं परिणाम भयंकर होईल. पाळ जास्त पोटांत गेलें असें वाटेल तर थोडी सुंठ पाण्यांत उगाळून देणें. ९ खुरचाफ्याची साल व बेलाची साल, समभाग एकत्र कुटून त्याचा ७।८ तोळे रस द्यावा. १० पांढरे चित्रकाचें पाळ, काळे वेलीचा कांदा, व बोखाड्याचें पाळ, समभाग घेऊन पाण्यांत उगाळून तासातासाच्या अवकाशानें ३ वेळ द्यावें, आणि दंश झालेल्या माणसास शेणखळ्यांत बसवावें. **उतारः**—तूप पाजावें. ११ नागदवणीचें मूळ पाण्यांत उगाळून द्यावें ह्मणजे वांति होऊन विष उतरेल. या औषधानें तोंडास खाज सुटली तर तुपाच्या गुळण्या करून टाकाव्या.

**विशेष सूचनाः**—सर्प दंश होऊन सर्वांगास विष भिनून लहरी येऊं लागल्या, किंवा मनुष्य बेशुद्ध झाला, तरी उपचार करण्याचें बंद करूं नये. दांतखिळी बसून पोटांत औषध जाण्याचें बंदच होईल, तर मस्तकावर रक्त येई अशा फांसण्या मारून त्या ठिकाणीं व सर्वांगास औषध गजावें.

## नानेटी.

हें जनावर १॥-२ हात लांब असून अंगानें बारिक असतें, व याचे पाठीवर काळे पट्टे असतात, याचें विष सर्पाचे विषा जवळ जवळच भयंकर आहे.

**उपचारः**—१ रिठे २।३ व पाणी ४।५ तोळे घेऊन, रिठे पाण्यांत उगाळून तें तासातासानें २।३ वेळां द्यावें, ह्मणजे वांति होऊन विष उतरेल. २ सर्पावरील ' उपचार ' या सदरांतील औषधें द्यावीं. मात्र तीं त्यापेक्षां कमी प्रमाणानें द्यावीं.

## कांडर.

हें जनावर सर्पासारिखेंच लांब व जाड असतें, परंतु तितकें चपळ नसतें. हें फडा करीत नाहीं. याचें विष मात्र सर्पापेक्षांहि भयंकर आहे. याचे विषांपासून कफ होऊन तो घशापर्यंत भरत येतो, याचे अगोदर औषध पोंचलें पाहिजे.

उपचारः—१ देवडांगरीचें फळ द्यावें. तें देण्याची कृति सर्पावरील 'उपचार' यांत पहा. २ खांदवेलीची मुळी व सारवटीची मुळी ( ज्या झाडांचीं पानें श्रावण मासांत मंगळागौरीस पातळें ह्मणून देवावर घालतात तें झाड ) प्रत्येकीं १-१॥ तोळा घेऊन, ७।८ तोळे थंड पाण्यांत उगाळून तें द्यावें, व असेंच मिश्रण सुमारें एक शेर ( २८ तोळे ) तयार करून सर्वांगास गजावें. हें औषध फार उत्तम आहे असें एकानें अनुभवानें सांगितलें आहे. ३ सुमारें १०।१२ रिठे घेऊन, ते ७।८ तोळे पाण्यांत कोळून तें द्यावें व या प्रमाणें रिठ्याचें पाणी सुमारें एक शेर तयार करून सर्वांगास गजावें, हें औषध दिल्यावर वांति होईल.न झाल्यास थोड्या वेळानें पुन्हां द्यावें. ह्मणजे वांति अगर रेच होऊन विष उतरेल. विष कमी झाल्यावर थंड पाण्यानें स्नान घालून दहींभात खावयास द्यावा. ४ लुतीचे कांद्याचा रस सुमारें २।३ तोळे द्यावा. विष उतरल्यावर दहींभात खाण्यास द्यावा. ५ मण्यारकांड्यांचा रस १॥-२ तोळे द्यावा. ६ दुधारकंद सुमारें ६।१२ मासे पर्यंत ५।६ तोळे पाण्यांत उगाळून द्यावा. या औषधानें घसा भाजल्यासारिखा होईल तर विष कमी झाल्यावर तूप पाजावें. ७ कात्री निर्गुडी, काजूचें झाड, व शमीचें झाड यांच्या पानांचा रस, प्रत्येकीं २।३ तोळे घेऊन, एकत्र करून त्यात २।३ रिठे उगाळून द्यावा. वांति अथवा रेच होऊन कफ पडेपर्यंत हें औषध घटकेघटकेनें देत जावें. हें औषध सर्वांगासहि गजावें.

## सर्पटोळी.

या जनावराचा रंग हिरवा असून लांबी सुमारें दोन हात पर्यंत असते. हें जनावर बहुतकरून झाडावर असतें. याचें विष सर्पाचे विषाप्रमाणेंच भयंकर आहे.

उपचारः—४।५ रिठे, ७।८ तोळे पाण्यांत कोळून द्यावें; ह्मणजे वांति होऊन विष कमी होईल वांति न झाल्यास थोडे वेळानें पुन्हां हेंच औषध द्यावें. सर्पावरील उपचार करावे.

## मागें सांगितलेले विंचू खेरीजकरून सर्व प्रकारचे प्राण्याचे दंशावर उपचार.

उपचारः—१ भारंग मूळ १।२ तोळे घेऊन तें ४।५ तोळे पाण्यांत उगाळून, त्यांत काळे मिऱ्याची पूड १।२ मासे घालून किंवा वेखंड २।३ मासे उगाळून द्यावें; व याच झाडाचे पाल्याचा रस अर्धा शेर पर्यंत काढून त्यांत वेखंड उगाळून तो सर्वांगास गजावा. अन्न लवकर द्यावें. कदाचित् औषधानें मनुष्य बेशुद्ध पडेल. तसें झालें तरी भिण्याचें कारण नाहीं. लागलाच थोडा दहींभात खाण्यास द्यावा, अगर कण्हेरी द्यावी. १ देवडांगरीचें फळ द्यावें. तें देण्याची कृति "सर्पावरील उपचार" यांत पहा. ३ फुरवी ( गुराखी कोरून फुगे वाजवितात तें झाड ) या झाडाची मुळी पाण्यांत उगाळून द्यावी, व हेंच औषध सर्वांगास गजावें. ४ हडकी या झाडाची मुळी पाण्यांत उगाळून द्यावी,

व हें च औषध सर्वांगास गजावें. ५ तुडतुडी, व कुशरी ( पुसरी ) यांचीं पाळें समभाग घेऊन, पाण्यांत उगाळून तें द्यावें. नाकांतून वगैरे उपळ ( रक्तपडणें ) सुटल्यास हींच पाळें गाईचे तुपांत उगाळून तें मस्तकास गजावें. ६ काळे सापसंदीचें मूळ पाण्यांत उगाळून, त्यांत २–३ मिऱ्यें वाटून द्यावें. ७ कडू दोडका २–३ मासे घेऊन १४ तोळे पाण्यांत काढा करून २–२॥ तोळे राहिल्यावर त्यांत ६ मासे तूप घालून द्यावा.

## कुत्रें.

साधारण कुत्रें चावलें तर त्यापासून विषाची बाधा होत नाहीं, परंतु पिसाळलेलें कुत्रें चावलें तर त्याचे विषाची बाधा होते. सरकारनें कुत्रा चावल्यानें होणारे विषावर उपचार करणेंकरितां कसौली ( हिमालय ) व कुनूर ( मद्रास ) येथें धर्मार्थ दवाखाने उघडलेले असून गरिबांस आपले खर्चानें नेऊन आणण्याची तजवीज करण्याची सोय केली आहे. परळ येथें अगर जिल्ह्याच्या मुख्य दवाखान्यांत लस टोचण्याची सोई केलेली आहे.

**कुत्रें पिसाळण्याचीं कारणें व पिसाळलेल्या कुत्र्याचीं लक्षणें:—** मनुष्याचें किंवा इतर प्राण्यांचें कुजलेलें मांस खाणें, कांहीं कारणानें जखम पडून त्यांत किडे पडणें, फार तेलकट पदार्थ खाणें, इत्यादि कारणांनीं तें पिसाळतें. पिसाळलें ह्मणजे सैरावैरा धांवतें, धांवतांना त्याचें शेंपूट जमिनीकडे असतें, व तोंड जमिनीकडे करून पळतें. त्याचे तोंडांतून लाळ फार येऊं लागते.

**याचे विषापासून उपद्रवः—**छाती व मस्तक दुखणें, ज्वर, अंग ताठणें, बुद्धीस भ्रम, कुत्र्यासारिखें ओरडणें, दुसऱ्या माणसास चावण्यास धांवणें, हे उपद्रव होतात. याचे विषाचा चढ पर्जन्य पडण्याचे आरंभाचे दिवसांत मेघांचा गडगडाट होऊं लागला ह्मणजे होतो.

**उपचारः—**१ प्रथम तूप तापवून त्याचा दंशस्थानीं डाग द्यावा, व जुनें तूप पाजावें. २ कांकर ( देवबाभूळ ) हिचें पाळ प्रत्येक वेळेस १–२ तोळे घेऊन, तें पाण्यांत उगाळून सकाळ सायंकाळ ७–१४ दिवस द्यावें. हें औषध फार उत्तम अनुभविक आहे. ३ कळंबाच्या सालीचा रस अगर काढा करून, त्यांत हिराकसाची पूड १॥–दोन मासे घालून तें तीन दिवस द्यावें, ह्मणजे रेच होऊन वीष उतरेल, व पोटांत अंडीं झालीं असल्यास तींहि पडतील. ( हीं अंडीं खसखशी सारखीं असतात. ) पथ्यः–तेल, तिखट, आंबट, १४ दिवस वर्ज करावें. पुढें लिहिलेलीं औषधें ७–१४ दिवस पर्यंत द्यावीं, व वरील प्रमाणेंच पथ्य करावें. ४ आघाड्याचें मूळ एक तोळा कुटून मधाबरोबर खावें, आणि दंश झालेल्या ठिकाणीं कोरफडीचें पान आणि सैंधव बांधावें. ५ बाभळीचे पाल्याचा रस ६–७ तोळे, गाईचें तूप ६ मासे, व कस्तुरी पाव गुंज, असें एकत्र करून द्यावें. ६ कोंबड्याचे विष्ठेचा दंशावर

लेप करावा. ७ वाघाच्या कपाळाचें करटें पाण्यांत उगाळून द्यावें, व दंशाचे ठिकाणीं लावावें. ८ रुईचा चीक लहानास ४।५ थेंब, व मोठ्यास ८--१० थेंब, विड्याचे पानांतून द्यावा; म्हणजे रेच होऊन विष उतरेल. ९ काजऱ्याच्या बिया तुपांत परतून चूर्ण २ गुंजा प्रमाणें कांहीं दिवस देणें

## कोल्हा.

कोल्हा पिसाळल्याचीं लक्षणें व त्याचे उपद्रव बहुतेक पिसाळलेल्या कुत्र्याप्रमाणेंच असतात.

**उपचारः**—१ कुत्र्याचे विषावरील "उपचार" या सदरांतील नंबर २-३-८ यापैकीं एखादें औषध द्यावें. २ कडू दोडक्याचे २।३ गुंजा शिबें ( दोडक्यांतील जाळें ) ४।५ तोळे पाण्यांत कोळून त्यांत कांकर ( देवबाभूळ ) हिचें पाळ १ तोळा उगाळून, सकाळ संध्याकाळ ७ दिवस द्यावें.

**बाह्यउपचारः**—दंश झाल्याबरोबर मीठ बारीक वांटून व्रणावर बसवावें व वर पैसे जोरानें दाबून बसवावे. १।२ तासांनीं पुनः मीठ बदलून पैसे दाबून बांधावे आणि तेवढ्या कळीचा चुना बसवावा. या उपचारानें विष तेवढेसें रक्तांत पसरणार नाहीं.

**पथ्यः**—तुरीचे डाळीचें अळणी वरण, नाचण्याची भाकरी, कुळथांची उसळ किंवा त्याचें सार उकड्या तांदळांचे भाताशीं.

**अपथ्यः**—दळण्याचा आवाज, तेलकट पदार्थ खाणें अगर तळणाचा वास, अत्यंत तिखट, आंबट वगैरे. वरील औषधांचा ज्यांनीं अनुभव घेतला असेल त्यांनीं तो कृपा करून प्रसिद्ध करावा.

## उंदीर.

साधारण उंदीर चावला तर त्यापासून कांहीं इजा होत नाहीं. परंतु पिसाळलेल्या कुत्र्याप्रमाणेंच कांहीं उंदरांची स्थिति होऊन त्यांस विष उत्पन्न होतें, व तशा प्रकारचा उंदीर चावला तर त्याची बाधा होते.

**विषाची बाधा झाल्याचें लक्षणः**—उंदीर चावल्यानंतर कांहीं दिवसांनीं अंगावर चकदणें ( चट्टे ) उठणें हें मुख्य लक्षण आहे. याशिवाय अरुचि, दाह, ठणका, ग्लानि, कंप, मस्तक जड होणें, वगैरे उपद्रव होतात. वांतीमध्यें उंदराचीं बारीक बारीक पोरें कफानें गुरफटलेलीं पडतात.

**उपचारः**—१ उंदीर चावतांच दंशस्थानीं लांकडानें किंवा भिंगानें डाग द्यावा. डाग दिल्यावर फांसण्या मारून रक्त काढावें. मग अन्य उपचार करावे. २ वेखंड गेळफळ देवडांगरीचें फळ व मोख हीं गोमुत्रांत वाटून दह्यांत कालवून द्यावें.

३ कापशीचे पाल्याचा रस २-३ तोळे व तिळांचें तेल ६ मासे असें एकत्र करून द्यावें. ४ काजऱ्याचे झाडावरील बांधांचा रस २ तोळे, जिरें पैसा भार, खडीसाखर पैसा भार, आणि दूध एक तोळा, असें एकत्र करून द्यावें. ( बांधाचा रस न आल्यास त्यांत दूध घालून काढावा ) ५ मांजराच्या कपाळकरटीचें हाड पाण्यांत उगाळून दंशित जागीं लावावें, आणि थोडें पोटांतहि घ्यावें. असें हाड नच मिळालें तर अन्य ठिकाणचें घ्यावें. ६ पडवळीचे किंवा तुळशीचे पाल्याचे रसांत अफू उगाळून दंशस्थानीं लेप द्यावा. ७ चुलीवरील घेरोसा, मंजिष्ट, हळद, सैंधव, आणि शिरस, हे जिन्नस समभाग घेऊन रुईचे चिकांत वांटून त्याचा लेप करावा. ८ वडाचा चीक दंशावर लावावा. ९ आघाड्याची मुळी उगाळून लावावी.

## बेडूक.

**उपचारः**—१ गणसुरीचें पाळ गोमुत्रांत उगाळून द्यावें.

## पारु.

**उपचारः**—१ करटोलीचा कांदा सुमारें १ तोळा पाण्यांत उगाळून द्यावा. २ गणसुरीचें पाळ गोमुत्रांत उगाळून द्यावें, व सर्वांगास लावावें.

## विषारी पदार्थ आणि त्यांचे विषावर उपचार

विषारी पदार्थ पोटांत गेले ह्मणजे त्यांचे विषानें प्रथम जीभ काळी होते व ताठते मग मूर्च्छा येते. ग्लानि व वांति हे विकार होतात. नंतर कंप, घाम, दाह, घशांत वेदना, डोकें जड इ० विकार क्रमाक्रमानें होतात.

**सामान्य उपचारः**—१ कोणतेहि पदार्थाचें विष असलें तरी प्रथम वांतीचें औषध द्यावें. २ अंगावर थंड पाणी शिंपावें. ३ तूप आणि मध एकत्र करून त्यांतून विषघ्न औषध द्यावें. ( तूप आणि मध केव्हांही समभाग घेऊं नये ). ४ दूध पाजावें. ५ कर्टोलीचा कांदा, पाढळमूळ, किंवा बेलाचें मूळ, यापैकीं मिळेल त्या एकाची मुळी थंड पाण्यांत उगाळून त्यांत तूप घालून तें पाजावें.

## अफू.

**उपचारः**—१ तुळशीचा रस २–३ तोळे द्यावा. किंवा १–२ तोळे तुरटीची पुड करून त्यांत ५।६ तोळे पाणी घालून तें द्यावें. २ पांढरा कोरा कागद सुमारें २ तोळे घेऊन तो ५।६ तोळे पाण्यांत कोळून तें द्यावें. ३ कांद्याचा रस १।२ तोळे द्यावा ४ रिठ्यांचीं ४।५ फळें घेऊन, ५।६ तोळे पाण्यांत कोळून तें द्यावें. ५ क्षेंडूच्या पाल्याचा रस सुमारें २।३ तोळे द्यावा. ६ पेरूचे पाल्याचा रस, आणि किंजळीचे पाल्याचा रस, प्रत्येकीं २ तोळे एकत्र करून तें द्यावें. ७ हिंग २।३ मासे घेऊन ताकांत कालवून द्यावा. ( ताक ५।६ तोळे घ्यावें ). ८ बेखंडाचें चूर्ण व

सैंधव प्रत्येकीं २।३ मासे घेऊन, ४।५ तोळे पाण्यांतून द्यावें. ९ मोहऱ्यांची बारीक पूड करून शक्तिप्रमाणें पाण्यांतून द्यावी. १० ऊन कॉफी द्यावी.

## सोमल.

**उपचारः**—१ पुष्कळ दूध पाजावें. (पुष्कळ उलटी होईपर्यंत) २ शेवग्याचे सालीचा रस व दूध प्रत्येकीं ७।८ तोळे घेऊन एकत्र करून द्यावें. हें औषध घटिकेघटिकेनें द्यावें. ३ जांभळीचे सालीचा रस खडीसाखर घालून द्यावा. ४ उंबराचे सालीचा अगर पानाचा रस द्यावा. ५ सोमल जितका पोटांत गेला असेल तितका टांकणखार तुपांतून द्यावा. ६ केळीचे कांद्याचा किंवा सोपाचा रस ७।८ तोळे द्यावा. ७ सुमारें पैसाभार कात घेऊन त्याची पूड करून ७।८ तोळे पाण्यांत टाकून द्यावें. ८ वांती होणेंसाठीं ऊन पाणी व दूध देत रहावें. ९ प्राणीज कोळसा द्यावा.

## बचनाग.

**उपचारः**—१ उंबराचे सालीचा रस व गाईचें तूप प्रत्येकीं २–२॥ तोळे घेऊन एकत्र करून तें द्यावें. २ गाईचें तूप न मिळेल तर म्हशीचें दूध, २–३ शेर द्यावें. ( २८ तोळ्यांचा शेर ) ३ कापूर १–२ मासे घेऊन ४।५ तोळे पाण्यांत कोळून तें पाणी द्यावें. ४ हिंग सुमारें १ मासा व तूप ३ मासे, असें एकत्र करून द्यावें. ५ कोळसे अथवा कुंद यांचा काढा द्यावा.

## भांग.

**उपचारः**—१ चिंच २–३ तोळे घेऊन पाण्यांत कोळून तें द्यावें. २ पेरू किंवा पेरूचा पाला खाण्यास द्यावा. ३ दहीं खावें. ४ तुरीची डाळ वांटून पाण्यांत घालून पाजावी. ५ नाकापुढें अमोनिया ( ओलाचुना व नवसागर ) धरावा.

## धोतरा.

**उपचारः**—१ तूप द्यावें. २ दुधांत साखर घालून तें द्यावें.

## कापूर.

**उपचारः**—१ मोहरीचें पीठ शक्ती प्रमाणें घेऊन पाण्यांत कालवून द्यावें. म्हणजे ओकारी होऊन विष उतरेल. २ सरक्या वाटून त्यांत पाणी घालून तें गाळून घ्यावें आणि त्यांत महाळुंगाचें मूळ उगाळून द्यावें. ३ तूप पाजावें.

## कुचला.

विष पोटांत गेल्या पासून अगदीं थोड्या वेळांत ( एक तासाचे आंत ) धनुर्वातासारखीं लक्षणें दिसतात. स्नायूस ताण बसतो.

**उपचारः**—१ वांती करवावी किंवा जुलाब द्यावा. २ प्राणिज कोळसा द्यावा.

## तंबाकू.

**उपचारः**— १ वांति करवावी. २ एरंडेलचा जुलाब द्यावा. ३ उष्ण उपचार करावे.

## गांधीलमाशी.

गांधीलमाशी चावल्यानें सारखे वेग येतात. व तुमसड ( गांधीलमाशीचा प्रकार ) चावल्यानें फार सूज येते.

**उपचारः**—वेग येत असल्यास कळीचा ओला चुना दंशाचे जागेवर लावावा. ( २ ) सूज आली असल्यास पोलादी हत्यार अगर कोयती दगडावर थंड पाण्यांत उगाळून तो गंज लावावा.

## दारू वगैरे मादक पदार्थ.

दारू माडी वगैरे मादक पदार्थ प्यायल्यानें मनुष्य बेशुद्ध होऊन पडतो.

**उपचारः**—१ उलटी करवावी ( घशांत पीस फिरविल्यानें उलटी होते ) २ सर्वांगावर २।३ घागरी गारपाणी ओतावें. ३ अमोनिया हुंगवावा.



# प्रकरण २.

## आरोग्य रक्षणासंबंधीं कांहीं सूचना.



मनुष्याची शरीर प्रकृति चांगली राहणेस खालीं लिहिलेल्या गोष्टींकडे लक्ष पुरविलें पाहिजे.

हवाः—प्रकृति नीट राहण्याकरितां चांगली हवा मिळणें फार आवश्यक आहे. आपल्या लोकांत कितीएकांची तशी समजूत नसते. व त्यामुळें ते आजारी मनुष्यास खोलीबाहेर सुद्धां पडूं देत नाहींत, परंतु ही मोठी चुकी आहे. आजारी मनुष्यास पहिलें औषध तर शुद्ध हवा हेंच होय. याजकरितां ती मिळेल अशी तजवीज करावी. मुख्य जपणें तें वाऱ्याचा प्रवाह रोग्याचे अंगावर येऊं न देणें हें होय. कितीएक वेळां असें घडून आलें आहे कीं, औषधानें बरे न होणारे रोगी नुसत्या चांगल्या हवेनेंच बरे झालेले आहेत. स्वच्छ हवा मनुष्याच्या शरिरांतून व कुजणाऱ्या पदार्थांतून जे अपायकारक पदार्थ बाहेर निघतात त्यांस दूर नेऊन आपणास निरोगी व बळकट ठेवण्यास व आजारी मनुष्याची प्रकृति सुधारण्यास फार उपयोगाची आहे. वाईट हवेच्या योगानें नानाप्रकारचे रोग उत्पन्न होतात; ह्याकरितां चांगली हवा मिळण्याविषयीं खबरदारी घ्यावी. समुद्रावरची हवा निरोगी असते, याजकरितां ती दररोज सोय असल्यास घ्यावी. आतां चांगली हवा मिळण्यास अनुकूल अशा कांहीं गोष्टी सांगतों.

१. दाट वस्तींत राहूं नये.

२. घराचे आजूबाजूस उकिरडा टाकूं नये व इतर प्रकारची घाण करूं नये.

३. घरें सर्द जाग्यावर व सखल जागीं असूं नयेत उंच जाग्यावर असावीं.

४. घरांत व दाराचे आजुबाजूस मोकळी हवा येण्याची सोय असावी.

५. एखादे ओलसर किंवा कुजकट वगैरे ठिकाणाहून येणारी हवा न मिळेल अशी तजवीज ठेवावी.

६. अंगास घाम आला असतां त्यावर गार वारा लागूं देवूं नये.

७. निजण्याची खोली मोकळी असावी.

८. जेथें आपण राहतों तेथें धूर जाण्यास धुरांडें असावें.

९. घरांतील केरकचरा वेळेवर बाहेर टाकून घरें स्वच्छ ठेवावीं.

१०. स्वयंपाकाचें गढूळ पाणी, व अशाच प्रकारचें दुसरें पाणी, घराजवळ जमिनींत मुरूं देऊं नये.

११. आपलें शरीर आणि वस्त्रपात्र हें स्वच्छ ठेवावें. दांत स्वच्छ ठेवणेची फार खबरदारी ठेवावी.

१२. घराजवळ बाग असावा, निदान घराचे आजूबाजूस हवा शुद्ध करणारीं तुळस, सबजा, बेल, लिंब, शमी, इत्यादि प्रकारचीं झाडें तरी लावावीं. या व अशा प्रकारच्या गोष्टींनीं मोकळी हवा मिळण्याविषयीं जें ज्यांस अनुकूल असेल तें करण्याविषयीं चुकूं नये, ह्मणजे रोग होणार नाहीं. व झाल्यास कमी होईल व लवकर प्रकृति सुधारेल.

१३. सांथीचे दिवसांत किंवा चांगलें पाणी नसले बद्दल संशय येईल तर पाण्यास आधण आणून मग गार करून प्यावें.

**पाणीः**—शरिराची शक्ति कायम राखण्यास पाणी पिणें फार अगत्याचें आहे. पाणी निर्मळ नसेल किंवा वाईट ठिकाणांतील असेल तर त्यापासून अनेक प्रकारचे रोग उत्पन्न होतात. जें पाणी निर्मळ असतें, ज्यास रुचि नसते व वास येत नाहीं, आणि ज्यांत कुजलेले पदार्थ नसतात, तें पाणी उत्तम समजावें. ज्या विहिरींचे झरे जमिनींत फार खोल असतात त्यातील पाणी बहुधा चांगलें असतें.

पाणी निर्मळ नसेल तर तें फिल्टरांतून ( गाळण्याच्या यंत्रांतून ) शुद्ध करून प्यावें. फिल्टर नसल्यास पाणी चांगलें तापवून थंड करून प्यावें. गढूळ पाणी स्वच्छ करण्याचें असेल तर त्यांत निवळीच्या ७।८ बिया उगाळून तें पाणी ४।५ घटका तसेंच ठेवावें. ह्मणजे निवळ पाणी वर राहून माती खालीं बसेल. तसेंच बुरणूस अगर फ्लानेल याचे कपड्यावर थोडी कोळशाची भुकटी पसरून त्यांतून पाणी गाळून घ्यावें. ह्मणजे स्वच्छ होतें. जेथें नद्यांचें पाणी पिण्याचा प्रसंग आहे, त्याठिकाणीं तर तें पाणी स्वच्छ करण्याकडे विशेष लक्ष दिलें पाहिजे. कारण अनेक प्रकारनीं नदीचें पाणी वारंवार बिघडतें. एकंदरींत पाणी स्वच्छ मिळण्याची तजवीज असली पाहिजे.

**थंड पाणी कोणी प्यावें व तापविलेलें पाणी कोणी प्यावें तेंः—**

निरोगी मनुष्यानें थंड पाणी प्यावें, व आजारी मनुष्यानें तापविलेलें पाणी प्यावें. चांगल्या विहिरीचें ताजें पाणी मिळण्याची सोय असेल तेथें तसें आणून आजारी मनुष्यास द्यावें. परंतु तसेंहि फार आजारी मनुष्यास देऊं नये. थंड पाणी, बरगड्याचा शूळ, पडसें, वातरोग, आध्मान ( पोट फुगणें ) कफ, अरुची, गुल्म, खोकला, श्वास, या रोगांवर, व स्नेहपान केलें असतां देऊं नये.

**पाण्याचे गुणः**—विहिरीचें पाणी शीत, निरस, अग्निदीपक, पाचक, रुचिकर व हलकें असून, कफ पित्त ज्वर यांचें नाशक आहे. नद्यांचें पाणी वातल, सारक, हलकें, निरस, अग्निदीपक असें असून, पित्त व कफ यांचा नाश करितें.

**भोजनाचें व उदकाचें प्रमाणः**—मनुष्यानें आपल्या कुशीचे दोन भाग अन्नानें पूर्ण करावे, व तिसरा भाग पाण्यानें पूर्ण करावा. आणि चवथा भाग वायु

संचारार्थ रिकामा राहूं द्यावा. साधारण मानानें अन्नाचे चवथा हिस्सा, फार तर तिसरा हिस्सा पाणी प्यावें.

**भोजनाच्या पूर्वी व भोजनांत पाणी पिणें:**—भोजनाच्या पूर्वी पाणी प्यालें असतां तें कृषपणा आणि मंदाग्नि यांना करितें. तसें (अनशेपोटीं) पाणी पिणेंच झाल्यास एकदम न पितां थोडथोडें, असें थोडेसें प्यावें. भोजनामध्यें पाणी प्यालें असतां अग्नीला प्रदीप्त करितें व भोजनाचे अंतीं प्यालें असतां स्थूलता आणि कफ करितें.

जेवतांना पाणी प्यावें कीं न प्यावें याबद्दल कांहीं इं० डॉक्टरांचें मत असें आहे कीं, जेवतांना किंवा जेवण झाल्यावर एक तास पर्यंत पाणी पिऊं नये कारण पोटांत जाणाऱ्या अन्नास चर्वणाच्या वेळीं लालोत्पादक पिंडांतून जो द्रव मिळतो तेवढ्यानेंच तें अन्न द्रवीभूत होऊन कोठ्यांत जाणें इष्ट आहे. त्याला पाण्यानें कृत्रीम स्वरूप आणून पोटांत घालविणें अपायकारक आहे. पण तिकडील डाक्टरांपैकीं एकानें अलिकडे प्रयोग करून पाहून सिद्ध केलें आहे कीं, जेवतांना पाणी प्याल्यानें पचनेंद्रियांवर कोणतेंच अनिष्ट परिणाम घडत नाहींत इतकेंच नव्हे तर पाणी व अन्न याचें मिश्रण झाल्यानें अन्न पचनास मदतच होते, शौचास साफ होतें, व कृमि होण्याचा संभव कमी असतो.

अलिकडे कितीएक लोक जेवतांना किंवा जेवणानंतर १ तास पर्यंत पाणी पीत नाहींत त्यांनीं याचा विचार करावा.

एकदम फार पाणी पिणें चांगलें नाहीं, याजकरितां दर वेळेस थोडें प्यावें. तहान लागली असतां भोजन करूं नये. व क्षुधा लागली असतां पाणी पिऊं नये. तहान लागली असतां जेवलें तर गुल्म होतो. आणि क्षुधा लागली असतां पाणी प्यालें तर जलोदर होतें.

**विशेष सूचनाः**—आजारी मनुष्यास फार तहान लागते तेव्हां पाणी तापवून त्यांत, अग्नींत लोखंड लाल करून तें बुडवावें आणि तें पाणी द्यावें. ह्मणजे विकार करीत नाहीं, व तहानहि कमी होते.

**उषःपानः**—रात्रीं ठेविलेलें उदक सूर्योदयकाळापूर्वीं प्राशन करणें यास उषःपान म्हणतात.

**उषःपानाचे गुणः**—यापासून अर्श (मूळव्याध) संग्रहणी, ज्वर, उदररोग कोष्टरोग, मेदोरोग, मूत्राघात, वायु, पित, व कान, गळा, मस्तक आणि नेत्र याचे रोग इत्यादि नाश पावतात व जरा (ह्मातारपण) जाऊन मनुष्य पुष्कळ दिवस वांचतो. जो पहांटेस नाकानें उदक पिईल तो बुद्धीनें पूर्ण होऊन त्याच्या अंगाच्या बळकट्या व ह्मातारपण जाऊन सर्व रोगांपासून मुक्त होईल.

**उषःपान करण्यास अयोग्यः**—स्नेहप्राशन व रक्तशुद्धि केली, किंवा पोट फुगणें उदरमांद्य, उचकी हे विकार आहेत, तर उषःपान करूं नये.

**विशेष सूचनाः**—उषःपानाचे मुख्य मुख्य गुणदोष ग्रंथोक्त वर लिहिले

आहेत, पण उषःपान सुरू करणें झाल्यास अगोदर एकाद्या वैद्यास प्रकृति दाखवून त्याचे सल्ल्यानें काय तें करावें. आमचा अनुभव असा आहे कीं, उषःपानानें केव्हां केव्हां हिंवताप जडतो. व अन्य विकारहि कांहीं होतात. ह्मणून उषःपानास प्रकृति योग्य आहे कीं नाहीं हें पहावें.

**अन्न**:—मनुष्यास शारीरश्रम, मानसिकश्रम किंवा अशा प्रकारचीं अनेक कारणें घडलीं ह्मणजे, स्नायू आदिकरून शरीराच्या घटकावयवांचे परिमाणू घडतात, व ते शरिरांतून मळ, मूत्र, घाम, श्वासोच्छ्वास इत्यादि मार्गांनीं बाहेर पडतात, त्यांच्या ठिकाणीं नवीन परमाणूंचा पुरवठा होण्यास, व शरिराची शक्ति कायम राहण्यास, व तिची वृद्धि होण्यास अन्न खावें लागतें. तसेंच मनुष्याच्या शरिरांत दहन क्रिया चालण्यास उष्णता लागते. तीहि अन्नापासून उत्पन्न होते. आतां अन्ना-संबंधीं कांहीं गोष्टी लिहितों:—

१. निरनिराळ्या जातींच्या अन्नापासून शरीरावर निरनिराळे परिणाम घडतात. याजकरितां साधेल तितकें निरनिराळ्या जातीचें अन्न खावें. पालेभाज्या खाव्या.

२. मनुष्याचें मुख्य अन्न ह्मटलें ह्मणजे धान्य हें होय. धान्यापैकीं गहूं, सातू, मका हें फार पौष्टिक आहे. तांदूळ हे कमी पौष्टिक आहेत. दूध फार पौष्टिक पदार्थ आहे. ज्या धान्यामध्यें पौष्टिकपणा फार आहे तें पचण्यास फार वेळ लागतो, व ज्यांत कमी पौष्टिकांश आहे, त्यांस कमी वेळ लागतो. नवीन धान्य पचण्यास जास्ती वेळ लागतो याचें कारण तें जड असतें हेंच होय.

३. अन्न खाण्यासंबंधानें फार नियमितपणा पाहिजे. ज्यांची इच्छा आपली प्रकृति नीट रहावी अशी आहे, त्यांनीं भोजनाचा नियम ठेवावा. व नियमित वेळीं जेवावें. फार उशीरां अगर लवकर जेऊं नये. नियम ठेवल्यानें खालेल्या अन्नाचें पचन होऊन चांगला परिणाम होतो. ज्यास बरीच मेहनत करावी लागते, त्यांनीं दिवसांतून तीनदां जेवावें, बाकीच्यांनीं दोन वेळ जेवावें. आपलेकडील शेतकरी वगैरे लोकांस दिवसभर काम करावयाचें असतें, त्यामुळें त्यांस तीनदां जेवावें लागतें, परंतु ज्यांस फार श्रम करावे लागत नाहींत ते दोनदांच जेवतात.

४ अन्न हें प्राणरक्षणास अवश्य आहे हें खरें, परंतु जें अन्न खावयाचें तें योग्य प्रमाणानें न खातां अधाशीपणानें भुकेपेक्षां जास्त खाल्लें तर रोग उत्पन्न होतात. आरोग्य रक्षणाचा पहिला मुख्य उपाय मिताहार (प्रमाणशीर अन्न खाणें) हा आहे. याच्या योगानें वातादि दोष कुपित न होतां त्याचें काम योग्य प्रकारानें चालतें, व स्मरणशक्ति, आयुष्य, बल इत्यादि वाढतात आणि अग्नि प्रदीप्त राहतो.

५. आपल्या प्रकृतीस जे पदार्थ सोसत नाहींत ते गोड लागले तरी खाऊं नयेत. शरिरास हितावह असेल तोच पदार्थ खावा.

६. भोजनाचे पूर्वी मीठ आणि आलें खाल्लें असतां तें पथ्यकर, आणि अग्नि-दीपक, रुचिकर, व जिव्हा आणि गळा ह्यांचें शोधन करणारें असें आहे.

७. भोजनाची समाप्ति मधुर रसानें करावी असें आहे. म्हणून भोजनांतीं दूध घ्यावें.

८. खाल्लेल्या अन्नाचें चांगलें पचन झाल्याशिवाय दुसरें अन्न खाऊं नये. खाल्लें तर पहिल्या अपक्व अन्नावर दुसरें अन्न पोहोंचून त्याचा परिणाम नीट होत नाहीं. तसेंच अर्धवट शिजलेलें अन्न फार अहितकारक आहे ह्मणून तें खाऊं नये.

९. जेव्हां गांवांत पटकी किंवा आमांश हे आजार असतात, तेव्हां अन्नाविषयीं विशेष काळजी घेतली पाहिजे. अशा वेळेस लवकर पचणारें अन्न असेल तेंच खावें व भुकेपेक्षां कमी खावें.

१०. पोटास तडस लागेपर्यंत कधींहि अन्न खाऊं नये.

११. दुखणेकऱ्यास सदोदित हलकें अन्न द्यावें. त्यास भात खाणें हें चांगलें आहे. त्याचा कंटाळा येईल तर साबूदाण्याची पेज घालावी, किंवा भरडी द्यावी.

१२. साधारण मानानें अन्न पचन होण्यास ३ पासून ५ तास लागतात. कितीएक पदार्थ लवकर पचन होतात. भात एका तासांत पचन होतो.

१३. फार तिखट खाणें चांगलें नाहीं. तिखट बेताचें असेल तर पचनशक्ति नीट राहते, आणि फार खाल्लें तर ती बिघडते.

१४. उन्हांतून येतांच किंवा पुष्कळ काम केल्यावर लागलेंच जेऊं नये.

१५. डाळीचे पदार्थ पचण्यास फार व्यायाम पाहिजे, याजकरितां ते बेताबातानें खावे.

१६. अतिकढत अन्न भक्षण केलें तर बलनाश होतो, व शीत शुष्क अन्न दुर्जर होतें.

१७. अति जलद भाक्षिलेलें अन्न ग्लानि करितें.

१८. सर्व प्रकारच्या साळींमध्यें तांबड्या साळी आणि खाटक्या साळी श्रेष्ठ आहेत. कुसुंब्याचे धान्यांत गहूं व यव उत्तम. संपूर्ण फळशाकांमध्यें पडवळ, पाले-भाजांमध्यें चाकवत व बडीशेप, आणि कंदांमध्यें सुरण उत्तम आहे. द्विदल धान्यांत उडीद, मिठांत उखर जमिनीचें मीठ, फळांत लहान फणस, आणि शाखांत मोहरीची भाजी अहितकारक आहे.

**विरुद्धाशनः**—विरुद्धाशन म्हणजे पदार्थ पदार्थांच्या संयोगानें विपरीत होणारें भोजन हें विषासारखें मारक आहे, ह्मणून त्याचें सेवन करूं नये.

उष्ण पदार्थ, दूध, तेलकट पदार्थ आणि बेलफळ हे दह्याबरोबर, तूप, केळें लाह्या, सातूचें पीठ हे ताकाबरोबर, दूध खिचडी बरोबर, मासे, मांस, गूळ, मूग, मुळे, जांभळें, मद्य, आसव हे दुधाबरोबर, विरुद्ध होतात ह्मणून तसे खाऊं नये. दुधभाता-

बरोबर मीठ खाणें, फणसाचे गरे खाऊन विडा खाणें, व मध आणि तूप समभाग खाणें विरुद्ध होय.

तेल, पाणी, काढा, आणि वरण, हे पदार्थ एकदां शिजवून थंड झाले ह्मणून पुनः ऊन करून खाऊं नयेत, खाल्ले तर विरुद्ध होतात.

कांशाच्या भांड्यांत ८।१० दिवस पर्यंत ठेविलेलें तूप खाणें विरुद्ध होय.

**व्यायामः**—व्यायाम ह्मणजे श्रम. ते केल्यानें रुधिराभिसरण नीट चालून शरीराच्या सर्व भागांत रक्त पसरतें, मेंदूंत स्वच्छ रक्त जाऊन तो चांगल्या स्थितींत राहतो, व त्या योगानें विचारशक्ति वाढते, वातादि दोषांचा क्षय होऊन अग्नीची वृद्धि होते, व खाल्लेलें अन्न चांगलें पचतें, कोठा साफ राहून मलशुद्धि चांगली होते, त्वचा उष्ण होऊन तींतून घाम येतो, व त्याबरोबर शरिरांतील घाणेरडे पदार्थ बाहेर पडतात. स्थूल मनुष्यास तर सुखविणारें उत्तम औषध व्यायामच होय. एकंदरींत शरिराचे अवयव बळकट होण्यास व अन्नाचें पचन होण्यास त्याची चांगली मदत होते. अन्नाचें पचन चांगलें झालें ह्मणजे मनुष्यास रोग होत नाहीं. मात्र व्यायाम बेताबातापेक्षां जास्त झाला तर प्रकृति बिघडेल हें लक्षांत ठेविलें पाहिजे, व तो थोडा थोडा वाढवित गेलें पाहिजे. एकदम फार व्यायाम करूं लागलें तर स्नायूंस बळकटी न येतां उलट शक्ति क्षीण होईल.

**व्यायामाचे प्रकारः**—उड्या मारणें, जलद चालणें, धांवणें, मारणें, नमस्कार घालणें, दांडपट्टा खेळणें, जोर काढणें, घोड्यावर बसून भरधांव जाणें, होडींत बसून वल्हीं मारणें, कुस्ती करणें, जोडी मलखांब करणें, जोडी पेलणें, इत्यादि.

व्यायाम सर्व ऋतूंत करावा. त्यांतून फार करून वसंत ऋतूंत व शीत कालांत तरी अवश्य करावा. दररोज सकाळीं फिरण्यास जाणें हें फार चांगलें आहे. थंडीचे दिवसांत अंगांत गरम कपडे घालून मोकळ्या हवेंत फिरावयास जावें. जेवल्याबरोबर व्यायाम करूं नये.

**झोंपः**—श्रमाचा थकवा नाहींसा होण्याकरितां व अन्नाचें पचन होण्याकरितां मनुष्यास झोंप अवश्य पाहिजे.

**झोंप किती घ्यावी तेंः**—अहोरात्र मिळून मनुष्यानें ७।८ तास झोंप घेतली पाहिजे. अगदीं कमी ह्मटलें तरी ६ तास झोंप पाहिजे. या पेक्षां झोंप कमी झाली तर मनुष्याची प्रकृति बिघडेल. वर लिहिलेल्या प्रमाणापेक्षां जास्त झोंप मनुष्यास उपयोगी नाहीं. जास्त घेतली तर प्रकृति बिघडते. मनुष्याची शक्ति जसजशी कमी होते तसतसा त्याचा आहारहि कमी होतो, व निद्रेचें मानहि कमी होतें. याच कारणामुळें वृद्ध मनुष्यास झोंप कमी येते. ज्याचा आहार अधिक असतो त्यास अधिक निद्रा घ्यावी लागते.

**दिवसास निजलें असतां होणारे विकारः**—दिवसास झोंप घेतली असतां वात रक्तादि सर्व दोषांचा प्रकोप होऊन खोकला, श्वास, मस्तकास जडपणा, अंग-

वळणें, अरोचक, अग्निमांद्य, दुर्बलपणा, इत्यादि विकार होतात. ग्रीष्मऋतूंत मात्र दिवसास निद्रा घेतली तर हितावह होतें.

**दिवसास कोणी निजावें तें:**—तृषा, शूल, उचकी, अजीर्ण आणि अतिसार, यांनीं व्याप्त पुरुषांस दिवसाची निद्रा हितावह होते. निषिद्ध ऋतूंचे ठायींहि बाल, वृद्ध, मैथुनानें क्षीण, उरक्षतानें क्षीण, नित्य मद्यपानकर्ता, व अश्वादि वाहनानें व मार्ग गमनें करून श्रांत, उपवासी, व ज्याचे मेद, स्वेद, कफ, रस, रक्त हे क्षीण झाले आहेत तो, व अजीर्ण झालेला, या सर्वांस दिवसास दोन घटका निद्रेविषयीं निषेध नाहीं. तसेंच रात्रीस जागरण झालें असतां, जागरण कालाचे अर्ध कालपर्यंत दिवसास निद्रा हितावह होते.

झोंप येत नसली तरी, डोळे मिटून पडावें. झोंप येत नाहीं ह्मणून जागरण करणें चांगलें होत नाहीं.

**निजण्याची जागा:**—निजण्याची खोली अशी असावी कीं, तेथें ताजी हवा येण्याचीं साधनें ( खिडक्या दारें वगैरे असून जागा प्रशस्त असावी, व तेथें प्रकाश असावा. खिडक्या दारें वगैरे अशा बेतानें मोकळीं ठेवावीं कीं, तिकडून येणारा वारा निजणाराच्या अंगावर लागूं नये.

**स्वच्छता:**—शरीर मलीन असलें ह्मणजे त्वचेचा व्यापरर नीट चालत नाहीं, आणि त्यांपासून अनेक प्रकारचे रोग उत्पन्न होतात. कितीएकांस असें वाटत असेल कीं, मलीनपणा आणि रोग यांचा कांहीं संबंध नाहीं; परंतु तसें नाहीं. याजकरितां अंग व अंगांतील कपडे स्वच्छ ठेवावे. शरीर स्वच्छ असलें ह्मणजे मनुष्याची बुद्धि तीक्ष्ण होते, व क्षुधा चांगली लागून अन्न पचन होतें. मलीन लोक बहुधा व्याधिग्रस्त असतात.

तसेंच मलमूत्रादि मार्ग, हस्तपाद प्रक्षालन, मुखमार्जन, जिव्हाशुद्धि, इत्यादिकांच्या स्वच्छतेकडे विशेष लक्ष दिलें पाहिजे.

**मलशुद्धि:**—प्रकृति चांगली राहण्यास रोज सकाळीं मलशुद्धीस साफ होणें विशेष अगत्याचें आहे. मलशुद्धीस साफ झालें नाहीं तर अनेक रोग जडतात. दांत स्वच्छ न ठेवल्यानें दांतावर बुर्शी जमून दांतास कीड लागते दांतांचे मूळांत पू होऊन तो पोटांत जाऊन अनेक विकार होतात तरी कोणतीही वस्तू खाण्यापूर्वी चांगली चूळ भरून दांत स्वच्छ करून खावी. हात पाय तोंड धुऊन मग जेवण्यास बसण्याची पद्धत याच मुद्यावर पूर्वी पासून सुरू आहे.

**मलशुद्धीस साफ न होण्याचीं कारणें व उपचार:**—स्निग्ध पदार्थ ( दूध तूप ) कमी खाणें, अपचन, राहण्याचे ठिकाणची, हवापाण्याची परिस्थिति अनुकूल नसणें, वातविकार, इत्यादि कारणांनीं मलशुद्धि होत नाहीं ह्मणून या

गोष्टींकडे लक्ष पुरवावें. सारक अशा भाज्या, फळें व अन्न खावें. यादी नं. ८४ चें चूर्ण घ्यावें. एरंडेलाची पोळी खावी. यादी नं. १९४ पहा.

**वि० सू०**——मळशुद्धी करितां औषध रोज घेऊं नये. रोज घेतल्यानें त्याच औषधांचा कांहीं दिवसांनीं उपयोग होत नसतो. कारण तें आहारवत् होतें. सबब प्रकृति निरोगी राहण्यसाठीं एनिमा घ्यावा.

**स्नानः**——आर्य वैद्यकांत स्नानाचें मोठें महत्त्व मानिलें आहे. हजारों कामें असलीं तरी स्नानाची वेळ चुकवूं नये. स्नान हें अग्नि प्रदीप्त करणारें वीर्यकारक आयुष्यवर्धक शुभदायक असून कंडू, मल, श्रम, आळस व दाह यांचा नाश करणारें आहे असें मानिलें आहे.

स्नानाचे योगानें शरीर स्वच्छ राहतें हें सर्वांस माहितच आहे. दुसरी गोष्ट अशी कीं, शरिराच्या बाह्य त्वचेला पुष्कळ छिद्रें असल्यामुळें त्यांतून घाम येतो, व त्याच्या बरोबर शरिरांतील घाण त्या घामाचे द्वारें रात्रंदिवस बाहेर पडत असते, व यामुळें तीं छिद्रें चोंदिलीं जाऊन शरिरांतील घाण बाहेर जाण्यास प्रतिबंध होतो आणि ती घाण शरिरांत राहिली ह्मणजे बाधक होते. स्नान केल्यानें चोंदलेलीं छिद्रें मोकळीं होऊन शरिरांतील घाण बाहेर जात असते, व तसें होणें इष्ट आहे. याजकरितां नेहमीं स्नान करावें व तें साधेल तितकें सकाळीं करावें. दिवसास श्रम करणारे लोकांनीं संध्याकाळीं करणें चांगलें.

स्नानाचे योगानें मस्तकांतील मेंदू थंड राहतो व आरोग्यहि प्राप्त होतें.

उष्ण प्रकृतीचे माणसास थंड पाण्यानें स्नान करणें चांगलें. स्नानाचे वेळीं मस्तकावर पाणी घेणें तें थंडगार अगर कोमट असें घ्यावें. तें कढत असलें तर मेंदूस इजा होईल. गळ्याखालीं मात्र ऊनपाणी घ्यावें ह्मणजे सर्व अवयवांचे श्रम दूर होतात. तापकरी माणसानें चांगली शक्ति आल्याशिवाय स्नान करूं नये; कारण त्यापासून ज्वर उलटण्याचा संभव असतो.

**प्रकाशः**——आरोग्य राहण्यास सूर्याचा प्रकाश विशेष जरूरीचा आहे ही गोष्ट पूर्णपणें लक्षांत ठेवावी. सूर्याचा प्रकाश प्रत्यक्ष ज्या भागांत पडतो, अशा भागांत दिवसाचा बराच भाग प्रत्येकानें काढावा. ज्यांस प्रकाश मिळत नाहीं अशीं झाडें व मनुष्यें रोगी व खुजीं होतात हें बहुतेकांस माहितच आहे.

**तंबाकूः**——तंबाकू खाणें व ओढणें चांगलें नाहीं. याचे योगानें तृषा, सुस्ती, पित्तविकार, खोकला, वगैरे उत्पन्न होतात. लहानपणापासून ही संवई जडल्यास शरीराची वाढ खुंटते, मज्जा—तंतूची शक्ति कमी होते, व अपस्मार, रक्तपित्त, आम्लपित्त, मस्तक फिरणें इत्यादि विकार जास्त होतात. याकरितां तंबाकूचें व्यसन

करूं नये. २०।२५ वर्षांचे आंतील मनुष्यास तर हें व्यसन जडलें असतां वृद्धापकाळीं फार इजा सोसावी लागते.

**धातूची वृद्धिः**—शरीरांत शुक्र धातूची वृद्धि होऊन ती व्यवस्थितपणें राहणें हें प्रकृति चांगली राहण्यास मोठेंच साधन आहे. फार तर काय परंतु आजन्मांतील प्रकृति सुख, मुख्यत्वेंकरून यावर अवलंबून आहे.

अलिकडे अल्प वयांत बरेच असामीस अशक्तता, व चहा वगैरे फार घेऊन कामवासना उत्पन्न होते, व त्यांची समजूत अशी होते कीं, शरीरांत धातू वाढल्या-मुळें ही वासना उत्पन्न झाली. मग अशा समजुतीनें ते आपल्या धातूचा व्यय करितात. कितीएक मुष्टि मैथुनास प्रवृत्त होतात, कितीएक परस्त्रीचे ठायीं रत होतात, परंतु ह्या सर्व घातुक गोष्टी आहेत. शरीरांत धातु वाढल्यानें कधींहि वाईट परिणाम व्हावयाचा नाहीं. मात्र मनोविकार उत्पन्न होतांकामा नये. मनोविकार उत्पन्न होणें न होणें हे ज्याचे त्याचे स्वाधीन आहे. मनाचा निग्रह केला ह्मणजे तो कधींहि उत्पन्न होणार नाहीं. जो २० वर्षांचे आंत विषयासक्त होतो, त्याचे शरिरांत रोग मालक होऊन राहतात. याकरितां शुक्र धातूचें चांगल्या प्रकारें रक्षण करावें.

शुक्र धातूचें रक्षण होण्यास व वृद्धि होण्यास पचन क्रिया चांगली असली पाहिजे. पचनक्रिया चांगली नसल्यानें त्यापासून रस कमी उत्पन्न होतो, व शुक्र धातूंत भर पडत नाहीं. एकंदरींत "शुक्र धातूचें कृपणाप्रमाणें रक्षण केलें पाहिजे." हीं सर्वांत महत्वाची गोष्ट लक्षांत ठेवावी.

**विशेष सूचना**—प्रकृति चांगली राहण्यास हवा, पाणी, अन्न, व्यायाम, स्वच्छता, झोंप, इत्यादि गोष्टींविषयीं मागें सांगितल्याप्रमाणें व्यवस्था ठेवावी. या विषयाचें जास्त विवरण केलें असतें तर चांगलें झालें असतें; परंतु तशानें पुस्तक वाढणार. ह्मणून इतकीच सूचना करितों कीं, या गोष्टी अति महत्वाच्या आहेत. रोग होऊन मग औषध देण्यापेक्षां वरील गोष्टीप्रमाणें वागून रोग न होऊं देणें हें चांगलें.



# प्रकरण ३.

## रोगोत्पत्तीचीं मुख्य कारणें, वातपित्तादि दोषांचे प्रकोप, शमन, अष्टविधपरीक्षा, इत्यादि.



नियमितपणानें न वागणें, बहुत पाणी पिणें, भलत्याच वेळीं जेवणें व अनियमित आणि अपथ्यकर अन्न वगैरे खाणें, दिवसांत निजणें, रात्रीं जागरण करणें, मलमूत्राचा रोध करणें, मोकळी हवा न घेणें, अस्वच्छ पाणी पिणें, व अस्वच्छता इत्यादि कारणांनीं रोगाची उत्पत्ति होते.

**वात, पित्त, आणि कफ, यांचे दोषः**—वर सांगितल्या व अन्य कारणांनीं शरिरांत वातपित्तादिकांचा कोप होऊन, ते रसादि धातूंस दूषित करितात; ह्मणून त्यांस दोष असें ह्मणतात. यांचीं कर्मे कोणतीं, व प्रकोप आणि शमन कसें होतें, याबद्दल खालीं सांगतों.

**वात दोषाचीं कर्मेः**—अंगाला खरखरीतपणा, संकोचन, ठणका, शूल, काळेपणा, चेष्टानाश, स्पर्शानें अज्ञान, शैत्य, रुक्षत्व, आणि शोष, हीं वायूचीं कर्मे आहेत.

**वात प्रकोप कारण**—लाक, वाटाणे, हरभरे, सातृ, मूग, तुरी, पावटे, रानमूग, मठ, कर्डईचें बीं, मसुरा, हरीक, व कडू तिखट तुरट शीतल रुक्ष लघु असे पदार्थ, अल्प भोजन, विषम भोजन, निरशन, भोजनोत्तर लागलेंच भोजन, भोजन जिरल्यावर फार श्रम, भार वाहणें, फार मार्ग चालणें, झाडावरून पडणें, मोठ्या स्वरानें अध्ययन, धातुक्षय, जागरण, मलमूत्रादिकांचा विरोध, वारंवार मैथून अपानादि वायूचा रोध, फार वांति, फार रेच, अति रक्तस्राव, चिंता, शोक, भय, वर्षाऋतु शिशिरऋतु दिवसाचा व रात्रीचा तिसरा भाग, मेघोदक, पूर्वेकडील वारा, आणि थंडी, इत्यादिकांनीं वायूचा कोप होतो.

**वातप्रकोप महिनेः**—मार्गशीर्ष, पौष, माघ, आषाढ, श्रावण व भाद्रपद, हे महिने वात प्रकोपाचे आहेत.

**वातशमनः**—स्निग्ध, उष्ण, जड, बळकर, खारट, गोड. आंबट, तेल, ऊन, स्नान, अभ्यंग, अंगास उटणी लावणें, घाम, नस्य, शयन, बसणें, इत्यादि प्रकार वायूची शांति करितात.

**वातवृद्धि लक्षणः**—वायू वाढला असतां कृशता, खरखरीतपणा, उष्णाची इच्छा, मळाचा खडा, अशक्तता, आणि निद्रानाश, हीं लक्षणें होतात.

**पित्ताचीं कर्में**:–अत्यंत श्रम, घाम, दाह, अंगावर लाली, दुर्गंधिपणा, अंगाला ओलसरपणा, अंगावर गांधी, बडबड, मूर्च्छा, व भ्रम, हीं पित्ताचीं कर्में आहेत.

**पित्तप्रकोप कारणः**—तिखट आंबट मद्य खारट उष्ण उडीद तीळ कुळीथ दहीं ताक व मद्य यांचें सेवन, आणि क्रोध, सूर्यताप, उपवास, अग्निभय, श्रम, शुष्क-शाका, अजीर्ण, अजीर्णकारक भोजन, पर्जन्य जाण्याचे दिवस, मेहनत, शरदृतु, ग्रीष्मऋतु, माध्यान्ह, आणि मध्यरात्र, इत्यादि कारणांनीं पित्ताचा कोप होतो.

**पित्तप्रकोप महिनेः**—आश्वीन, कार्तिक, वैशाख, व जेष्ठ, हे पित्त प्रकोपाचे महिने आहेत.

**पित्तोपशमनः**—कडू, गोड, थंड, तुरट, वारा, छाया, रात्र, पाणी, चांदिणें, भुयार, कारंजीं, कमळें, स्त्रियांचें आलिंगन, तूप, दूध, रेचक, अंगावर पाण्यादिकांचें सिंचन, रक्तस्राव, आणि लेप, इत्यादि उपचार पित्ताला शांत करितात.

**पित्तवृद्धि लक्षणः**—विष्ठा, मूत्र, नेत्र, अंग यांना पिंवळेपणा, इंद्रियांस क्षीणता, संताप, मूर्छा, थंड पदार्थांची इच्छा, थोडी निद्रा, हीं लक्षणें होतात.

**कफाचीं कर्में**—शरिराला पांढरेपणा, थंडपणा, जडपणा, कडू, चिकटपणा, सूज, व काम लवकर न होणें, हीं कफाचीं कर्में आहेत.

**कफप्रकोप कारणः**— गुरु, क्षार, मधुर, आंबट, स्निग्ध, उडीद, तीळ, द्रवपदार्थ, व दहीं, दिवानिद्रा, शीत, निचेष्टपणा, आणि दिवसाचा व रात्रीचा पहिला भाग, भोजनोत्तर काल, आणि वसंतऋतु, या कारणांनीं कफाचा प्रकोप होतो.

**कफप्रकोप महिनेः**—फाल्गुन आणि चैत्र हे दोन महिने कफप्रकोपाचे आहेत. ह्या महिन्यांत थंड पाण्याच्या प्राशनानें श्लेष्मा उत्पन्न होतो.

**कफोपशमनः**—रूक्ष, तुरट, तिखट, व्यायाम, स्त्रीगमन, मार्गगमन, युद्ध, जागरण, जलक्रीडा, धूम्रपान, ताप, मस्तकरेच, वांति, घाम, आणि पेंड बांधणें, इत्यादि कफाला शांत करितात.

**कफवृद्धि लक्षणें**:—मळ, मूत्र, नेत्र, त्वचा व नखें हीं पांढरीं व त्यांस थंडपणा, अंगाला जडपणा, अतिनिद्रा, ग्लानि, तोंडाला पाणी सुटणें, हीं लक्षणें होतात.

**ऋतुविशेषें दोषांचा उत्पत्तिः**—हेमंतऋतु वर्षाऋतु आणि शिशिरऋतु यांमध्यें वायुचा कोप होतो, आणि शरदृतु व ग्रीष्मऋतु यांमध्यें पित्ताचा कोप होतो व वसंतऋतुमध्यें कफाचा कोप होतो.

**कोणत्या दोषावर काय योजावें तेंः**—कफप्रकोप झाला असतां नस्य व वमन, पित्तव्याधीवर रेचक, आणि वातव्याधीवर शोधन द्यावें. त्रिदोषजनित व्याधी-वर सर्व उपचार करावे.

**दोषत्रयशमनः**—कफाला शत्रूसारखा तीक्ष्ण औषधांनीं, वायूला स्नेहनद्रव्यांनीं मित्रासारिखा, आणि पित्ताला मधुर व शीतल पदार्थांनीं जांवयासारिखा जिंकावा.

**रात्रदिवसांत दोषत्रयाचा कोप**ः—दिवसाचे पूर्वभागीं व प्रदोषकाळीं श्लेष्मकोप होतो, मध्यान्ह व मध्यरात्रीं पित्तकोप होतो, आणि अपराण्ह काळीं व मध्यरात्रीं नंतर वायूचा कोप होतो.

## सहा रसांचे गुण.

**मधुररसः**—शीत, धातु व बल यांतें देणारा, नेत्रांना हितावह, वायु व पित्त यांचा नाशक, आणि स्थूलता करणारा आहे.

**आम्ल रस**ः—उष्ण, व कफ पित्त रक्त यांतें करणारा, दांत नेत्र भृकुटि, यांचा संकोच करणारा आणि वातनाशक आहे.

**खारट रस**ः—पाचन, व पित्त कफ यांना करणारा, पुरुषत्व व वायु यांचा नाशक, व शरिराला शिथील आणि मृदु करणारा आहे.

**कडू रस**ः—शीत, व तृषा मूर्च्छा ज्वर पित्त आणि कफ यांचा नाशक आहे.

**तिखट रस**ः—रुक्ष, व मेद श्लेष्मा कंडू विष यांचा नाशक, व पित्तवात करणारा, आणि शोषक पाचक व असा आहे.

**तुरट रस**ः—व्रणाला भरणारा, स्तंभन, रेचक, थंड कफ व रक्तपित्त यांचा नाशक, आणि लघु असा आहे.

## अष्टविध परीक्षा.

**रोग्याच्या परिक्षेचीं स्थानें आठ आहेत तीं**ः—नाडी, मूत्र, मळ, जिव्हा, नेत्र, शब्द, स्पर्श, आणि रूप.

**नाडीपरीक्षाः**–हाताचे आंगठ्याचे मुळीं वात, पित्त आणि कफ, या तीन प्रकारांनीं नाडी वाहत असते. शास्त्ररीतीप्रमाणें स्नान केलेल्याची, तैलाभ्यंग केलेल्याची, भोजन केलेल्याची, आणि क्षुधेनें व तृषेनें पीडित झालेल्याची नाडी पाहूं नये. प्रातःकाळीं उठून घडिमात्र स्वस्थ बसलेल्या पुरुषांचीं उजवे हाताची व स्त्रियांची डावे हाताची नाडी पहावी.

**नाडीची गति**ः—वाताचा प्रकोप झाला ह्मणजे नाडीची गति जळू व सर्प यांच्या गतिप्रमाणें वांकडी होते, आणि पित्त प्रकोप झाला ह्मणजे नाडीची गति बेडूक व कावळा, यांच्या गतिप्रमाणें होते. कावळा व बेडूक याचें गमन उड्या मारित मारित असतें. कफ प्रकोप झाला म्हणजे पारवे व हंस पक्षी यांच्या गतीप्रमाणें नाडीची गति होते. हंस व पारवा यांचें गमन हळू हळू असतें. त्रिदोष (कफ, पित्त, व वात, यांचें ऐक्यत्वानें प्रकोप होणें यालाच संन्निपात म्हणतात. ) झाला असतां लावा व तित्तिर पक्षी यांच्या गतीप्रमाणें नाडीची गति होते. लावा व तित्तिर पक्षी यांचें गमन त्वरित

असतें. दोन दोषांचा प्रकोप झाला म्हणजे नाडी केव्हां मंद व केव्हां चंचल वाहते व या प्रमाणें क्षणोक्षणीं गतींत फेर पडतो.

ज्वरित मनुष्याची नाडी मोठ्या वेगानें चालते. सामान्य ज्वराचा प्रकोप झाला म्हणजे नाडी उष्ण असून मोठ्यानें वाहते. मोठ्या रक्तदोषाच्या योगानें नाडी जड होते व थोडी उष्ण वाहते, तशीच आमांशाच्या योगानें नाडी जड वाहते. गर्भिणीची नाडी गंभीर पुष्ट व हलकी अशी वाहते.

कामातुर पणानें व क्रोधानें नाडी मोठ्या वेगानें वाहते. भीतीच्या योगानें नाडी क्षीण वाहते. जठराग्नि मंद झाल्यानें व धातु क्षीण झाल्यानें आणि चिंतेच्या योगानें नाडी अगदीं मंद वाहते. आणि क्षुधेच्या योगानें नाडी चंचल वाहते.

तर्जनीची ( अंगुष्टा जवळील बोटाची ) नाडी वहात असतां किंवा नाडी स्थानापासून चळली असतां रोगी वांचणार नाहीं. जी नाडी अति मंदमंद व गुंतत वाहते, ती प्राण्याचा नाश करणारी आहे असें समजावें.

**नाडीचे ठोके**:—रक्ताशयाचे जागीं ( डावे हाताकडील स्तनाचे खालीं ) छातीशीं कान लाविला असतां कटकट ( घड्याळाप्रमाणें ) सारखा आवाज होत असतो त्यास हृदयाचे ध्वनि असें म्हणतात. नाडीची व्याख्या थोडक्यांत अशी आहे. रक्ताचा प्रवाह एक सारखा चालला असतां त्यात वेळोवेळीं जसजसें आणखी रक्त येतें तसतशी धमनी उसळते त्यास नाडी म्हणतात. मोजण्यास सोइस्कर पडावें म्हणून नेहमीं पुरुषाची उजवे व स्त्रियांची डावे हाताचे मनगटाजवळ नाडी पहाण्याचा प्रघात आहे. निरोगी व जवान मनुष्याची नाडी एका मिनिटांत सुमारें ७५ वेळां उडतें. उपजल्यापासून वृद्धावस्थेपर्यंत नाडीच्या ठोक्याची संख्या कमी होत जाते. साधारणपणें स्त्रीची नाडी पुरुषाच्या नाडीपेक्षां कांहीं जलद चालते. आरोग्यांत साधारणपणें नाडी, श्वासोच्छ्वास व छातीचे ठोके यांचें प्रमाण सारखें असतें. नाडीचें साधारण प्रमाण खालीं लिहिल्याप्रमाणें आहे.

| | |
|---|---|
| गर्भस्थानांत गर्भाची नाडी एका मिनिटांत | १५० वेळां उडते. |
| जन्माचे वेळीं | १३५ |
| १ वर्ष पर्यंत | १२० |
| २ ” ” | ११० |
| ३ ” ” | १०० |
| ७ ” ” | ९० |
| १५ ” ” | ८० |
| तारुण्यांत | ७० ते ८० |
| वृद्धावस्थेंत | ६० ते ७० |

आरोग्यात नाडी सकाळच्या वेळीं कांहींशी जलद चालते, दिवस वर येतां तशी ती कांहीं मंद होते. व मध्यरात्रीं फारच मंद पडते. उभे असतां नाडी जलद, बसलों असतां त्याहून मंद व निजल्यावर त्याहून मंद चालते.

**अंगांतील उष्णतामान:**— निरोगी स्थितींत मनुष्याच्या अंगांत उष्णतामान सारखें असतें. अशक्त प्रकृतीच्या माणसांत व विशेषत: स्त्रियांत हें मान अर्धा डिग्री फरकानें जास्तही आढळण्यांत येतें. आंगांतील उष्णता मापण्याकरितां पाऱ्याची नळी—थर्मामीटर—मिळते. या नळीवर ९५ पासून ११० पर्यंत आंकडे घातलेले असतात. कोणत्याही स्थितींत शरिराची उष्णता पाहणें असेल तर थर्मामीटरमधील पारा ९६ पर्यंत खालीं उतरून खाकोंटींत धरावा. थर्मामीटर किती वेळ ठेवावा हें त्या नळीवर लिहिलेलें असतें त्यापेक्षां थोडा वेळ जास्ती ठेवून मग पहावा. खाक पुसून मग थर्मामीटर लावावा.

हवेंतील उष्णतामानावर थोडें शरिरांतील उष्णतामान वाढत असतें. परंतु ९८·४ हें सर्वसाधारण चांगले प्रकृतीचें उष्णतामान समजण्यास हरकत नाहीं. १०१ किंवा त्यापेक्षां थोडें जास्त ज्वराचें मान वाढलें तर त्याचा परिणाम मेंदूवर होतो, ह्मणून तापाचें प्रमाण वाढल्यावर डोक्यावर कोलनवाटरची पटी ताप कमी होई-पर्यंत ठेवावी. १०० तापाचें प्रमाण आल्यावर कोलनवाटरची पटी नको. बर्फ ठेविलें असतां उष्णता लवकर कमी होते.

**मूत्र परिक्षा**—प्रात:कालीं मोठ्या पहांटेस उठून कांचेच्या किंवा शिशाच्या पाञ्यांत मूत्राची पहिली धार व शेवटची धार खेरीज करून मूत्र धरावें. नंतर तें मूत्रपात्र सारख्या भूमीवर स्वच्छ उजेडांत ठेवावें, आणि त्यांत गवताचे काडीनें मोठ्या कुशलतेनें तिळाचे तेलाचा बिंदु टाकून साध्यासाध्य विचार करावा. मूत्रांत टाकिलेला तेलबिंदु चोहोंकडे पसरला ह्मणजे बहुधा रोगी साध्य आहे असें जाणावें, आणि बिंदूला कांहीं उंचपणा असेल तर कष्टसाध्य, व तो मूत्राच्या तळास गेला तर रोगी खचित मरेल असें समजावें. मूत्रांत तैलबिंदु टाकतांच पातळ छायेसारखा पसरला ह्मणजे वातदोष आहे असें समजावें, बुडबुडे आले ह्मणजे पित्तदोष जाणावा, व स्वच्छ प्रभा पडली ह्मणजे कफदोष जाणावा. तसेंच तेलबिंदू पूर्वेस वाढत जाईल तर रोगी लवकरच बरा होईल असें जाणावें. दक्षिणेस पसरेल तर ज्वर आहे असें समजावें. उत्तरेस पसरेल तर रोगी रोगरहित आहे असें जाणावें. बिंदू ईशान्य, आग्नेय, वायव्य व नैर्ऋत्य यांपैकीं एखाद्या दिशेस पसरेल, किंवा बिंदू पसरून आंत छिद्रें होतील किंवा मनुष्याचे धडासारिखा किंवा तोडलेल्या हातापायासारिखा किंवा तरवार मुसळ बाण पद्म दांडा यांसारिखा आकार होईल तर असाध्य जाणावा.

तेलाचा बिंदू टाकिल्यावर त्याची हंसपक्षी, तलाव, कमळ, हत्ती, चवरी, छत्र, तोरण किंवा बंगला यांची आकृति होईल तर रोग्यास खचित आरोग्य होईल.

**ठोकळ अनुमानें**:—स्वाभाविकपणें मोठ्या मनुष्यास चोवीस तासांत ह्मणजे एक दिवसांत ४० ते ५० औंसपर्यंत लघवी होते. याहून जास्त जाहल्यास प्रकृतींत कांहीं दोष उत्पन्न झाला असें समजावें. ज्वर, हगवण, कॉलरा, आंव वगैरेंनीं शरिरांतील पाणी कमी होऊन लघवी कमी होते व मूत्रल औषधें पोटांत गेल्यानें, चहा किंवा पाणी फार पिण्यानें, मेहाचे विकारांत अगर थंडी जाहल्यानें लघवी फार होते.

लघवीचा रंग स्वाभाविकपणें स्वच्छ पाण्यासारिखा असतो व ती दुर्गंधयुक्त नसते. दुर्गंधयुक्त असेल तर मूत्राशयगत कांहीं रोग आहे असें समजावें. मूत्रांत जर रक्त जात असेल तर तें लाल अगर काळें दिसतें. श्लेष्म, पू वगैरे असेल तर लघवी गढूळ असते. लघवी थोडावेळ तशीच ठेविली तर तळाशीं सांकव जमतो.

**मूत्राच्या रंगावरून रोगाची परीक्षा.**

वायूचा प्रकोप झाला असतां—निळ्या रंगाचें व रुक्ष.
पित्तप्रकोप—तांबूस, पिंवळ्या रंगाचें व तेलासारिखें.
कफप्रकोप—चिकट व सांचलेल्या उदकासारिखें.
वातानें—पांडुरवर्ण.
पित्ताच्या योगानें— पिंवळें.
कफानें—फेनयुक्त असून पांढरें.
सन्निपातानें—काळें किंवा सर्व मिश्रित रंगाचें.
वातपित्तानें—धूम्रवर्ण व उष्ण उदकासारिखें.
कफपित्तानें—तांबूस असून गढूळ.
जलोदरानें—तुपाच्या कण्यासारिखें.
अजीर्णापासून—तांदुळांच्या धुण्यासारिखें.
आमवायूनें—ताकासारिखें.
वातकफानें—पांढरें व बुडबुड्यांनीं युक्त असें.
अजीर्णापासून ज्वर असल्यास—शेळीच्या मूत्रासारिखें.
नवज्वरानें—धूम्रवर्ण व पुष्कळ.
अपचनानें—महाळुंगाच्या रसासारिखें किंवा कांजीसारिखें किंवा पाण्यासारिखें, किंवा चंदनासारिखें.
जीर्णज्वरानें—रक्तासारिखें.
वातज्वरानें—कुंकवासारिखें लाल.
क्षयरोगानें—उष्ण व खालचें पिवळे आणि वरचें रक्तवर्ण.
बाळंतरोगानें—पिंवळें असून वरची छाया कृष्णवर्ण.
रक्तपित्तानें—रक्तवर्ण, उष्ण, आणि स्निग्ध.
शिरोरोगानें—मंजिष्ठासारिखें.

असाध्य रोगाचें—नीलवर्ण.

उदरानें—गाढवाच्या मूत्रासारिखें.

मेहानें—पुष्कळ आणि गढूळ.

मुतखड्यानें—स्वच्छ गोमेद मण्यासारिखें असून मूत्राला बोकडाच्या मुत्राची घाण येणें.

**मलपरिक्षा**—वायूचा कोप असतां मल फेंसयुक्त रुक्ष व धूम्रवर्ण, पित्ताचा पिंवळा हिरवट व गंधियुक्त, कफाचा श्वेतवर्ण, त्रिदोषाचा सर्व लक्षणांनीं युक्त, अजीर्णाचा दुर्गंधीयुक्त, क्षयाचा श्यामवर्ण, असा असतो. अतिशुभ्र किंवा अतिकृष्ण, तसाच पिंवळा किंवा अरुणवर्ण असून अत्यंत उष्ण, असा मळ झाला असतां मृत्युकारक जाणावा.

**नेत्रपरिक्षा**—वायुचा कोप असतां डोळे निस्तेज, धुरकट, दहायुक्त, किंचित लाल, ताठलेले, व चंचळ असतात. पित्ताचे योगानें पिंवळे हळदीसारिखे, व लाल दहायुक्त, आणि दिवा पाहण्यास असमर्थ, व कफाचे योगानें पांढरे, निस्तेज, व चिकट, व त्रिदोषानें लाल असून किंचित् काळे असे दिसतात.

**जिव्हापरीक्षा**—वातानें थंड खरखरीत व फुटलेली, पित्तानें—आरक्त, कफानें—पांढरी व चिकट, त्रिदोषाची--काळी व कांटे असलेली अशी, मरणकाळीं खरखरीत आंत ओढलेली फेंसयुक्त व चलनवलन रहित अशी असते.

**रूपपरीक्षा**—वाताचे योगानें शरीर तेजरहित व काळसर असें होतें. पित्तानें, पीतवर्ण व थोडें सुजीर असतें. कफानें तोंड कलाहीन असून तेलकट, व डोळे सुजीर आणि चिकटलेले असें होतें.

**शब्दपरीक्षा**—कफानें स्वर मोठा, पित्तानें स्पष्ट, आणि वायूनें दोहों लक्षणाहून भिन्न ह्मणजे 'घर्घर' असा स्वर होतो. त्रिदोषांचा सर्व लक्षणांनीं युक्त असतो.

**स्पर्शपरीक्षा**—वायुनें अंग खरखरीत व, पित्तानें उष्ण, आणि कफानें शीतल असतें.

**मरणचिन्ह**—मरणकाळीं मनुष्याचें तोंड सुकणें, अंगावर काळे डाग दंतपंक्ति काळी, नाकाजवळची जागा थंड; हातपाय लुले, कानाच्या पाळ्या पडणें, थंड, किंवा उष्ण श्वासोच्छ्वास, शरीर थंड, इत्यादि चिन्हें होतात.

## औषधी प्रतिनिधी.

एखादें औषध न मिळाल्यास त्याचे अभावीं खालीं लिहिल्याप्रमाणें प्रतिनिधि ( जामीन ) दुसरें औषध घ्यावें, परंतु जें औषध काढ्यांत किंवा चूर्णांत मुख्य ह्मणजे पहिल्यानें सांगितलें आहे, त्याचे अभावीं मात्र घेऊं नये.

| औषधीचें नांव. | प्रतिनिधि. | औषधीचें नांव. | प्रतिनिधि. |
|---|---|---|---|
| अम्लवेतस. | हरभऱ्याची आंब. आंबट चुका. | जायपत्री. | लवंग. |
| | | पहाडमूळ. | सफेत मुसळी. |
| अतिविष. | नागरमोथे. | पिंपळी. | मिरीं. |
| कस्तुरी. | जायपत्री. | पुष्करमूळ. | कोष्ट. |
| कापूर. | चंदन. | रसांजन. | दारू हळद. |
| कंकोळ. | वेलची, जायपत्री. | रिंगणी. | कडुनिंब. |
| खैरसाल. | कडुनिंबाची साल. | लोहकांत. | पोलाद. |

| औषधीचें नांव. | प्रतिनिधि. | औषधीचें नांव. | प्रतिनिधि. |
|---|---|---|---|
| गजपिंपळी. | पिंपळमूळ. | वाळा. | नागरमोथे. |
| चवक. | गजपिंपळी. | वेखंड. | कोळिंजन. |
| चित्रक. | दांतिमूळ, नेपाळ. | शिलाजित. | सोरा. |
| चंदन. | वाळा, कापूर. | जाईचीं फुलें. | लवंगा. |
| धायटीचें फूल. | मोहाचें फूल. | दारुहळद. | हळद. |
| शेळीचें दूध. | गाईचें दूध. | सोनें. | लोहभस्म. |
| सुवर्णमाक्षिक. | सोनगेरू. | संचळ. | मीठ. |

## ढाळकाचा विधी.

ढाळक वेळें असता वातपित्तादि दोष कमी होतात. जठराग्नि प्रदीप होतो, इंद्रियांस शक्ति येते, धातु आणि वय यांना स्थीरपणा येतो.

**ढाळक कोणास द्यावें:**—जीर्णज्वर, भगंदर, मूळव्याध, वातरक्त, पांडू, उदर, गुल्म, प्लीहा, ओकारी विषुची, कर्णरोग, नासारोग, मस्तकरोग, उपदंश, कृमि, शूल, वातरोग व कफरोग, यांनीं पीडित असेल तर ढाळक द्यावें.

**ढाळक कोणास देऊं नये तें**—बाल, वृद्ध, गर्भिण, बाळंतिण, उरक्षतानें क्षीण, भयाभीत, श्रम झालेला, मंदाग्नि, तृषित, व रुक्ष, यांना ढाळक देऊं नये.

**ढाळक देण्याविषयीं साधारण लक्षांत ठेवण्याच्या गोष्टी.**

ज्या मनुष्याचे कोठ्यांत फार पित्त असतें, त्यास रेचक फार लवकर लागू पडतें.

याजकरितां द्राक्षें दूध व * एरंडेल हीं एकत्र करून ढाळक द्यावें. ज्याचे कोठ्यांत कफ फार असतो, त्यास निशोत्तर कटुकी व बहाव्याचे शेंगेचा मगज हीं तीन औषधें एकत्र करून ढाळक द्यावें. ज्याचे कोठ्यांत फार वायू आहे, त्यास निवडुंगाचें दूध किंवा जेपाळबीज इत्यादिक योजुन ढाळक द्यावें, किंवा नाराचरस ( यादी नंबर ८५ ) किंवा इच्छाभेदी ( यादी नंबर १२० पहा ) द्यावा. पित्ताचें आधिक्य असतां द्राक्षें गुलाबफूल किंवा बडिशेप यांपैकीं एकाद्याचे काढ्यांतून निशोत्तराचें चूर्ण द्यावें. कफाधिक्य असतां त्रिफळेचा काढा व गोमूत्र एका जागीं करून त्यांत सुंठ मिरीं पिंपळी यांचें चूर्ण घालून द्यावें. वायूनें पीडित असतां निशोत्तर सैंधव व सुंठ यांचें चूर्ण लिंबूचे रसांत द्यावें.

**ऋतुभेदेंकरून ढाळकें**—वर्षाऋतूंत--( श्रावण भाद्रपद ) निशोत्तर इंद्रजव पिंपळी व सुंठ यांचें चूर्ण द्राक्षाचे काढ्यांत मध घालून घ्यावें. **शरदतूंत**—( आश्विन कार्तिक ) निशोत्तर धमासा नागरमोथे पांढरा चंदन व जेष्ठमध यांचें चूर्ण द्राक्षांचे काढ्यांत द्यावें. **हेमंत** ऋतूंत-( मार्गशीर्ष पौष ) निशोत्तर चित्रक पहाडमूळ जिरें देवदार वेखंड आणि पिसोळी यांचें चूर्ण ऊन पाण्यांत द्यावें. **शिशिर**—( माघ फाल्गुन ) आणि **वसंत** ऋतूंत—( चैत्र वैशाख ) पिंपळी सैंधव निशोत्तर आणि सुंठ यांचें चूर्ण मधांत द्यावें. **ग्रीष्म** ऋतूंत--( जेष्ठ आषाढ ) निशोत्तराचें चूर्ण साखर घालून द्यावें.

नळाश्रित वायु असेल तेव्हां निशोत्तर ४ भाग, व सुंठ सैंधव आणि हरडेदळ हीं प्रत्येकीं एकेक भाग, यांचें चूर्ण ऊन पाण्यांत द्यावें.

**ढाळ चांगले होण्यास उपचारः**—ढाळक घेतल्यावर डोळ्यांना थंड पाणी लावून डोळे पुसावे; विडा खावा व सुगंधादिक पदार्थ हुंगावे, आणि ढाळ होत असतां मध्यें मध्यें थोडें कोमट×पाणी वारंवार प्यावें.

**ढाळ झाल्यावर कसें वागावेंः**—वाऱ्यांत बसूं नये, झोंप घेऊं नये, थंड पाणी पिऊं नये इतकेंच नाहीं तर त्यास स्पर्श सुद्धां करूं नये, व अजीर्ण, परिश्रम आणि मैथून हीं करूं नयेत.

**ढाळ बंद होण्यास उपचारः**—आंब्याची साल गाईचे दह्यांत अथवा कांजींत वाटून कल्क करून नाभीचे ठायीं लेप करावा. शेळीचें दूध प्यावें. तूपभात खावा. मोगली एरंडाचें पाळ ताकांत किंवा तांदळाचे धुणांत उगाळून प्यावें.

---

* एरंडेलांत लोखंडाचे पळींत सुंठोचा तुकडा टाकून कढ आणावा. गार जाहले वर सुंठ काढून टाकून तेल घेणें. वास येत नाहीं व लवकर लागू पडतें.

× एखादा ढाळ झाल्यावर मग दुसरा होत नाहीं असें असेल तेव्हां पाणी पिऊं नये. पाणी पिणें त ढाळ होत असतांच प्यावयाचें आहे. अलिकडे कितीएक लोक पाण्याऐवजीं चहा घेतात पण चहा घेण्यापेक्षां पाणी घेणं चांगलें.

# प्रकरण ४.

## औषधें नवीं कोणतीं घ्यावीं, जुनीं कोणतीं घ्यावीं, औषध केव्हां व कसें घ्यावें, किती घ्यावें, इत्यादिकासंबंधीं सूचना.



१. सर्व कामास नवीं औषधें घ्यावीं, परंतु वावडिंग पिंपळी गूळ धने आणि मध हे पदार्थ एका वर्षानंतरचे असावे. तूप भोजनामध्यें किंवा इतर वेळीं खाण्याकरितां घ्यावयाचें तेव्हां ताजें घ्यावें आणि इतर कामास एकावर्षानंतरचें घ्यावें. इतर कामास जितकें जुनें असेल तितकें चांगलें. जुनें तूप उन्माद अपस्मार सूज कुष्ट कर्णरोग इत्यादिकांचा नाश करितें व जखम किंवा व्रण शुद्ध करून भरून आणितें.

२. गुळवेल कुड्याची साल अडुळसा कोहळा शतावरी अश्वगंध कोन्हांटी बडिशेप व प्रसारणी ( हिचें नांव देशावर चांदवेल असें आहे ) हीं औषधें सदोदित ओलीं घ्यावीं. ओलीं आहेत ह्मणून अधिक घेऊं नये. याशिवाय बाकीचीं औषधें ओलीं असल्यास दुप्पट घ्यावीं.

३. ज्या औषधाचें अंग सांगितलें नाहीं तेथें मूळ घ्यावें. जेथें औषधींचे भाग सांगितले नाहींत तेथें तीं समभाग घ्यावीं.

४. आश्विन आणि कार्तिक या दोन महिन्यांत संपूर्ण औषधीं आणून ठेवाव्या. त्या वेळेस त्या रसभरीत असतात. मात्र रेचक आणि वमन करणारीं औषधें, वैशाख व ज्येष्ठ या महिन्यांत आणावीं.

५. ज्या वृक्षांचें मूळ मोठें आहे त्याचे मुळाची साल घ्यावी. ज्या वनस्पतीचें मूळ लहान आहे तिचें मूळ घ्यावें. रिंगणी गोखरू पित्तपापडा पुनर्नवा इत्यादि वनस्पती पानें फुलें आणि मुळें सुद्धां घ्याव्या.

६. वड पायरी जांभूळ आंबा पिंपळ इत्यादि वृक्षांची साल घ्यावी. बिवळा खैर आसाणा मोह बाभूळ यांचा नार घ्यावा. तमालपत्र कोरफड नागवेल तालीस इत्यादिकांचीं पानें घ्यावीं. हरडा बेहडा आंवळकटी बोरी इत्यादिकांचीं फळें घ्यावीं. धायटी पळस गुलाब इत्यादिकांचीं फुलें घ्यावीं. व निवडुंग रुई मांदार यांचा चीक घ्यावा.

७. औषधांपैकीं चूर्ण दोन महिन्यांनीं हीनवीर्य होतें. गुटिका ( गोळ्या ) आणि अवलेह हीं एका वर्षानंतर हीनवीर्य होतात. तूप आणि तेल हीं चार महिन्यांनीं हीनवीर्य होतात. आसव आणि संपूर्ण धातूंचीं भस्में व रसायनें जितकीं जुनीं तितकीं विशेष गुणावह होतात.

**काढा कसा करावा**:—मातीचें भांडें घेऊन ( कोरें भांडें घेणेचें नाहीं ) त्यांत काढा करावयाचीं औषधें थोडीं कुटून घालून, जेवढा शेष राखावयाचा असेल त्याचे आठपट पाणी घालून, मंदाग्नीनें कढवावा, आणि अष्टमांश राहिला ह्मणजे गाळून घ्यावा.

९. **काढ्यांत औषधें किती घालावीं**:—मोठे मनुष्याकरितां एकंदर औषधें ३–४ तोळे घालावीं, व लहान मुलांकरितां एक तोळ्यापासून दोन तोळ्यांपर्यंत घालावीं; परंतु रोगाचें बलाबल पाहून कमजास्त प्रमाण करावें.

१०. **काढ्यांत साखर व मध किती घालावा**:—साखर घालणें झाल्यास वात, पित्त, आणि कफ, यांवर अनुक्रमें–काढ्यांतील सर्व द्रव्यांचा चवथा, आठवा किंवा सोळावा हिस्सा प्रकृति मानानें घालावी. मध घालणें झाल्यास एक माशापासून तीन माशांपर्यंत रोगाचें बलाबल पाहून घालावा. ( कोणाचें मत असेंहि आहे कीं, वात पित्त आणि कफ यांवर अनुक्रमें काढ्यांतील द्रव्यांचा सोळावा आठवा आणि चवथा हिसा मध घालावा ) काढ्यांत मध किंवा साखर घालण्याविषयीं जेथें कांहीं सुचविलेलें नाहीं, तेथें नुसताच काढा द्यावा. वाटेल तर प्रकृतीमान पाहून साखर किंवा मध यांची योजना करावी. साखर खडीच घालावी.

११. **औषधाच्या सेवनाचें प्रमाण**:—संपूर्ण धातूंचीं भस्में, किंवा रसायनें, देणें असतील तेव्हां प्रत्येक वेळेस एका गुंजेपासून दोन गुंजांपर्यंत द्यावीं. काढा देणें असेल तेव्हां मोठे मनुष्यास चार तोळे पर्यंत व लहानास तीन माशांपासून एका तोळ्यापर्यंत द्यावा. चूर्ण द्यावयाचें असेल तेव्हां मोठ्यास सहा माशांपासून एक तोळ्या पर्यंत व लहानास एक माशापासून तीन माशांपर्यंत द्यावें. कल्क देणें असेल तेव्हां मोठ्यास एक तोळ्यापासून दोन तोळेपर्यंत द्यावा. औषध देण्याच्या संबंधानें जरी कितीही गोष्टी सांगितल्या तरी त्याच्या सेवनाचें प्रमाण निश्चयेंकरून सांगतां येत नाहीं, याजकरितां जठराग्नि, देश, काल, रोगाचें बलाबल, घेणाराची शक्ति, वय इत्यादि गोष्टींचा विचार करून आपल्या बुद्धीनें प्रमाण ठरवावें.

१२. **सर्वसाधारण अनुपानें**:—अजीर्णास कागदी लिंबाचा रस किंवा बाळहरडे **अतिसार**:—कुड्याचे पाळांच्या सालीचा रस किंवा मध आणि साखर, किंवा तांदुळांचे धुवणांत कुड्याचें पाळ उगाळून तें. **आमवातास**:—एरंडेल **आमांशास**:—तांदुळांचें धुवण किंवा कुड्याचे पाळांचा काढा. **अपस्मारास**:—ब्राह्मीचा रस आणि मध व वेखंडाची पूड. **उचकीस**:—मोरांच्या पिसांची राख कागदीलिंबाचा रस आणि खडीसाखर एकत्र करून तें. **उपदंशास**:—विड्याचे पानाचा रस, किंवा त्रिफळेचा काढा, किंवा चंदनी तेल. **ज्वरास**:—ज्वरोक्त काढा, किंवा तुळशीचा रस मध आणि खडीसाखर. **खोकल्यास**:—अडुळशाचा रस, बेहड्याचा काढा, किंवा संठ मिरीं पिंपळी यांचा किंवा कांटेरिंगणीचा काढा. **जीर्णज्वरास**:—

वर्धमान पिंपळी ( ज्वर प्रकरणांतील जीर्णज्वरावरील सदर पहा ). किंवा मध पिंपळी किंवा जिरें गूळ किंवा जिरें खडीसाखर. **पांडुरोगास**:—त्रिफळा तूप आणि मध; किंवा त्रिफळा आणि खडीसाखर किंवा वावडिंगांची पूड आणि मध. **प्रदरास**:— तांदुळाचें धुवण, किंवा जिरें आणि खडीसाखर, किंवा असाणी आणि कुंभ्या यांचे समभाग सालींचा रस ( रस न येईल तर दूध घालून वाटून काढावा ), किंवा डाळिंबाचा पाक. **बाळंतरोगास**:—आल्याचा रस आणि खडीसाखर. **गुल्म व उदर यांस**:— गोमूत्र, एरंडेल, किंवा त्रिफळेचा काढा. **मेहास**:—मध व पाणी. **मूळव्याधीस**:— चित्रक, बिबा, लोणी, आणि खडीसाखर, किंवा त्रिफळा. **वातरोगास**:—आल्याचा रस आणि खडीसाखर, आल्याचा रस खडीसाखर आणि मध, किंवा रास्ना काढा. ( यादी नंबर ६१, ६२, ६३, पहा ). **रक्तपित्तास**:—अडुळशाचा रस किंवा मनुका. **शूलास**:—तूप आणि हिंग, किंवा आल्याचा रस खडीसाखर व मध. **संग्रहणीस**:—ताक. **क्षयास**:—लोणी मध आणि खडीसाखर, किंवा मध आणि खडीसाखर, किंवा शीतोपला चूर्ण. ( यादी नंबर ८८ पहा )

१३. **अनुपानाकरितां औषधें घेण्याचें प्रमाण**:—गोमूत्र, दूध, ताक, काढा, तांदुळाचें धुवण, किंवा असेच पातळ पदार्थ २—४ तोळे. आल्याचा रस, मध, खडीसाखर तूप, ३—६ मासे. त्रिफळा किंवा दुसरें असेंच एखादें चूर्ण ३—६ मासे. हिंग अर्धामासा, हळद, तमालपत्र, जिरें, ओंवा, दालचिनी, बडीशेप, यांपैकीं एकाद्याचें चूर्ण १ मासा, एरंडेल १—२ तोळे, लिंबाचा रस, डाळिंबाचा रस, लोणी व मोरांवळा ६—१२ मासे.

१४. या पुस्तकांत कितीएक ठिकाणीं "रोगोक्त अनुपान योजावें" असें लिहिलें आहे. रोगोक्त अनुपान म्हणजे ज्या रोगाला जें योग्य तें. कोणत्या रोगास कोणतें अनुपान योग्य तें या प्रकरणांतील कलम १२ यांत लिहिलें आहे.

१५. औषधें तयार करितांना पारा गंधक बचनाग अफू इ० पदार्थ शुद्ध केल्याशिवाय वापरावयाचे नाहींत. प्रकरण ६ "धातु व इतर पदार्थ यांची शुद्धि पा।"

१६. **औषधाचे भक्षणाचा काल**:—मुख्यत्वें दिवसांतून दोन वेळां औषध घ्यावें. १ प्रातःकाळीं सूर्योदयाचे सुमारास २ सायंकाळीं सूर्यास्तापूर्वीं एक घटका. अंगरस, कल्क आणि काढे, विशेषेंकरून प्रातःकाळींच घ्यावे. औषधें भक्षण करण्याचे एकंदर पांच काळ सांगितले आहेत ते. १ किंचित् सूर्योदय झाला असतां औषध घेणें. २ दिवसास भोजन समयीं औषध घेणें. ३ सायंकाळीं भोजन समयीं औषध घेणें. ४ वारंवार औषध घेणें. आणि ५ रात्रीचे ठायीं औषध घेणें.

१७ **पथ्य**:—पथ्य ह्मणजे हितावह खाणें व आचरण करणें. रोग असो किंवा नसो नेहमीं पथ्यानें वागावें. पथ्यानें वागलें ह्मणजे निरोगी माणसास बहुधा रोग होणार नाहीं व रोगी मनुष्याचा रोग बरा होईल.

मागें हवा पाणी अन्न इत्यादिकांविषयीं लिहिलें आहे त्याप्रमाणें वागणुक ठेवावी.

पुढें प्रकरण ५ यांत बहुतेक रोगांस पथ्य अपथ्य सांगितलें आहे तसें करावें. ज्या रोगांस पथ्य अपथ्य लिहिलेलें नाहीं तेथें "साधें जेवण" जेवावें. साधें जेवण यांत वरणभात तूप दूध साखर भाकर पोळी गोडताक पडवळ पांढरा-भोंपळा भेंडा सुरण चाकवत यांची भाजी इ० रोजच्चे खाण्यांतील पदार्थांचा समावेश होतो असें समजावें. ( स्वभावानें अहितकर व त्या रोगाला बाधक असे पदार्थ खावयाचे नाहींत.)

कितीएक पदार्थ व कृत्यें स्वभावानेंच अहितकर असतात जसें—तेल, खोबरें, गुळ, नवें अन्न, दहीं, आंबटताक, पावटा, उडीद, मठ, भूयमूग, हिंग, मोहरी, कुळीथ, पोकळा, कांकडी, कलिंगड, तांबडा भोंपळा, चिबूड इ० पदार्थ; व फार तिखट खाणें, फार श्रम करणें, फार जागरण, फार स्त्रीसंग, उन्हांत फिरणें इ० कृत्यें अहितकर म्हणून वर्ज ठेवावीं.

**विशेष सूचनाः**—प्रकृतिमानाप्रमाणें व औषध घेत असतां त्या औषधास व रोगास योग्य असें पथ्य करण्याविषयीं विशेष खबरदारी घ्यावी.

## औषध घेण्यासंबंधीं वगैरे विशेष अगत्याच्या सूचना.

१ पहिल्यानें सर्व पुस्तक वाचावें. निदान प्रकरण २।३ व चालू प्रकरण संपूर्ण लक्षपूर्वक वाचावें. आणि त्यांत लिहिल्याप्रमाणें व खालील सूचनांकडे विशेष लक्ष देऊन काळजीपूर्वक वागावें.

२. प्रकृति बिघडतांच रोग झाला असें आपणास वाटेल त्या रोगाचे सदराखालील सर्व मजकुर वाचून रोगाचें निदान ठरवावें. निदान ठरवितांना कोणतेहि रोगाचीं सर्व लक्षणें जमलीं नसलीं तरी तो रोग नव्हे अशी कल्पना करूं नये. संपूर्ण लक्षणें जमलीं म्हणजे तो रोग पूर्ण स्थितींत आला असें समजावयाचें. निदान ठरवितांना देश, काल, वय प्रकृति आणि वागणूक इत्यादि कारणांचाहि विचार करून निदान ठरवावें. औषधापासून गुण आला नाहीं म्हणजे कितीएक लोक त्या औषधाबद्दल गैरसमज करून घेतात, परंतु गुण न येण्याचें मुख्य कारण रोगाचें निदान चुकणें हें होय. आतां निदान खरें असलें तरी प्रकृतिमानानें एकच औषध सर्वांस लागू पडत नाहीं; याकरितांच एका रोगावर अनेक औषधांची योजना करावी लागते. एकंदरींत मुख्य गोष्ट रोगाचें निदान बरोबर ठरलें पाहिजे. जेव्हां रोग अमूकच आहे असा निश्चय आपणास होत नाहीं, तेव्हां तशा प्रकारच्या साधारण रोगावर चालणारें औषध द्यावें. जसें अमूकच प्रकारचा ज्वर आहे हें न समजलें तर सर्व ज्वरांवर सांगितलेलें औषध द्यावें. अमूकच प्रकारचा वायू आहे हें न समजलें तर सर्वसाधारण वायूवर चालणारें औषध द्यावें.

३. रोगाचें निदान ठरल्यावर लागलाच उपाय सुरू करावा. वेळेवर उपाय झाला नाहीं तर रोग असाध्य होतो. मग कितीहि उपाय केले तरी ते व्यर्थ होतात.

कितीएकांची अशी समजूत असते कीं, आयुष्य असेल तर रोगाचें कांहीं चालणार नाहीं; परंतु ही मोठी चुकी आहे. सर्वांनीं हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, आयुष्य संपलें तर रोगी वाचणार नाहीं ही गोष्ट खरी, परंतु आयुष्य असतां रोगावर उपाय झाले नाहींत तर समयीं तो रोगी असाध्य होऊन मरतो. जे रोगी रोगावर उपचार करीत नाहींत, त्यांचे ते रोग साध्य असतांहि याप्य होतात, याप्य असतात ते असाध्य होतात, व असाध्य रोग प्राणनाश करितात; ह्मणून रोग होतांच उपाय केला पाहिजे.

४. रोगी जोंपर्यंत श्वास सोडित आहे तोंपर्यंत औषधी उपचार करण्याचें सोडूं नये. कारण दैवयोगानें तसाहि मनुष्य वांचतो हें पक्कें लक्षांत ठेवावें.

५. एक औषध दिल्यावर लागलेंच दुसरें औषध देऊं नये. पहिल्या औषधाचा परिणाम समजल्यावर दुसरें द्यावें, परंतु पहिल्या औषधापासून प्रकृति जास्त झाली असें वाटेल तर ताबडतोब दुसरें सुरू करावें.

६. औषधापासून गुण येण्यास रोग्याची औषधावर श्रद्धा असल्यापासून चांगली मदत होते, याकरितां ती राहण्यास होईल तितका प्रयत्न करावा. रोग्यास औषधाचें नांव सांगूं नये. औषधाचें नांव समजलें ह्मणजे श्रद्धा कमी होण्याचा विशेष संभव असतो.

७. जरी आपणास असें वाटलें कीं हा रोगी असाध्य आहे, तरी ही गोष्ट कधींहि रोग्यास समजूं देऊं नये. रोग्यास बरें होण्याची आशा नाहीं असें भासणें हें फार घातक होतें.

८. पथ्याविषयीं विशेष काळजी घ्यावी. रोग्यास केव्हांहि रात्रीचे १०।११ वाजल्यानंतर जेवण घालणें प्रकृतीस हितावह नाहीं, परंतु विशेष प्रसंगीं घालावें.

९. औषधाची योजना करणें ती फार विचारानें करावी. औषधाचें प्रमाण ठरविणें तें रोगाचें मान देश काल व वागणुक इत्यादि गोष्टींकडे लक्ष देऊन ठरवावें. अल्प विकारावर मोठी क्रिया करूं नये, किंवा मोठ्या विकारावर अल्प क्रिया करूं नये. गुण येण्यास जास्त दिवस लागले तरी चिंता नाहीं, परंतु प्रकृति जास्त न बिघडेल असें तरी निदान झालें पाहिजे.

प्रकृति उष्ण पत्करते. थंड प्रकृति फार भयंकर आहे. याकरितां या गोष्टींकडे विशेष लक्ष पुरवावें.

१० कोणत्याही विकारांत मलशुद्धि साफ होणें हें फार फायदेशीर आहे. मलशुद्धीकरितां एकादें चूर्ण रात्रीं निजतांना घेत जावें. ( यादी नंबर ८४ पहा. ) मलशुद्धीचें औषधहि रोज घेण्याची वहिवाट ठेवूं नये, मधून मधून घेत असावें. नाहींतर आहाराप्रमाणें तें औषध होऊन त्याचा उपयोग होत नाहीं. इतर औषधांचे संबंधानेंहि असेंच आहे.

११. कोणतेहि रोगांवर औषध देत असतां शक्ति कमी न होईल अशी तजवीज ठेवावी, ह्मणजे रोगास न वाढविणारें व शक्तिवर्धक असें औषध दिवसांतून

एकदां सुरू ठेवावें. अशा कामास सुवर्णमालिनी वसंत, लोह, मंडूर, चंद्रप्रभा, व वर्धमान पिंपळी, किंवा एखादा पाक अशांची योजना करावी.

१२. प्रकृति बिघडण्यास वात पित्त आणि कफ हे कारण होतात. हे तिन्ही दोष कमी होण्याचा यत्न करावयाचाच, परंतु वात कमी होण्याविषयीं अगोदर प्रयत्न करावा.

१३. कफ विकार अतिशय वाढला असल्यास पोटांत औषध देऊन तो विकार मोडण्यास अवधि लागणार याकरितां अशा वेळेस वांतीचें किंवा जुलाबाचें औषध देणें फार फायदेशीर होतें. वांति किंवा रेच होऊन दोष दूर होतात, व मनुष्य लवकर मोकळा होतो. एकादे मुलास डबा होऊन घशाशीं घुरघुरत असल्यास तें मूल तांबडतोब वरील उपचारानें मोकळें होतें. एखाद्यास पोटांत अकस्मात कळ उठली तर तांबडतोब रेचक द्यावें. २।३ जुलाब झाले ह्मणजे मग लागलीच कळ बसते. अशा कामास रेचक इच्छाभेदी ( यादी नंबर १२० पहा. ) किंवा नाराचरस द्यावा, ( यादी नंबर ८५ पहा. ) वांति होण्यास रेवाचिनीचा शिरा देणें चांगलें. ( यादी नंबर २२० पहा)*

१४. अकस्मात् एकादे इसमास वायु होऊन तो बेशुद्ध होतो. अशा वेळेस मात्रा, वगैरे पोटांत द्यावीच, परंतु मनुष्य लवकर शुद्धीवर येण्यास नाकांत औषध घालावें ( यादी नंबर २२२ पहा ), व अंजन करावें ( यादी नंबर १९२ पहा. )

१५. पित्त विकार अति वाढला असल्यास रेचकापासूनही फायदा होतो; परंतु अशा कामास तीव्र रेचक कधीं देऊं नये. गुलाबकळी, निशोत्तर किंवा एरंडेल यांचा उपयोग करावा. ज्यास पित्ताचा विकार असेल त्यांनीं दूध मुरांवळा मनुका लिंबू महाळुंग डाळिंब आणि कवठ यांचा खाण्यांत विशेष उपयोग करावा.

१६. पुढें यांत हिंवतापावर औषधें सांगितलीं आहेत, तरी त्याचा उपयोग लवकर होत नाहीं, या कामास क्विनाइन् विशेष उपयोगी पडतें तें द्यावें. ( यादी नंबर १९९ पहा. )

१७. उदर जरंडी कवळू वगैरे प्रकारच्या एकादे रोगाचा प्रारंभ झाला म्हणजे विशेष समजण्यांत येत नाहीं, परंतु अगोदर बरेच दिवस मळशुद्धि साफ होत नाहीं. ( खडी होऊं लागते) व चढण चढतांना श्वास लागतो, व अशक्तता वाटते, जेवल्यावर पोटास तडस लागतात, आणि उत्साह नष्ट होतो. तसें होऊं लागलें ह्मणजे पोटांत बहुधा प्रारंभ झाला असें समजावें. अशा विकृतीवर कुमारीआसव, वज्रक्षार, योगराज, गुग्गुळ, रास्ना काढा ( यादी नंबर ६१।६२।६३ पहा ), लोह, गोमूत्र, व रेचक औषधें यांचा उपयोग होतो. अशा विकृतीवर एकदा परीक्षक पाहून डाग द्यावा.

---

* अत्यंत क्षीण, वृद्ध अंतर्गळाचा रोगी, गरोदर स्त्री यांना वांतीचें औषध देऊं नये.

डागापासून बहुधा चांगला परिणाम होईल, निदान तोटा तरी होणार नाहीं.

१८. उपदंश, मूळव्याध, धातुविकार, नेत्ररोग, बाळंतीण, आणि गरोदर स्त्री, यांस कधींहि तीव्र औषध देऊं नये. गरोदर स्त्रीस कडक औषध दिलें तर समयीं गर्भपात होण्याचा संभवअसतो.

१९. विशेष माहितीशिवाय कडक औषधें वापरूं नयेत. सौम्य औषधें वापरावीं. सूतशेखर, पंचामृतपर्पटि, प्रवाळ, सुवर्णमाक्षिक, मंडूर, चंद्रप्रभा, गुग्गुळ, सुवर्णमालिनी वसंत, लघुमालिनी वसंत, हीं औषधें अशा कामास चांगलीं. सोमली मात्रा किंवा कडक मात्रा विशेष प्रसंगाशिवाय वापरूं नयेत, वापरणें तर थोडक्या प्रमाणानें व सारासार विचार करून वापराव्या. अशा मात्रा समीरपन्नग, मल्लसिंदूर हेमगर्भ वगैरे.

२०. क्षयाचें पूर्वरूप बरेच दिवस अगोदर दृष्टीस पडतें (राजयक्ष्मा प्रकरण पहा) तें पडलें ह्मणजे लागलाच उपचार करावा. हा रोग एकदां वाढला ह्मणजे मोठी पंचाईत पडते.

२१. अलिकडे पुष्कळ वेळां असें नजरेस येतें कीं, पुरुषाचें वय १६।१७ वर्षांचें झालें ह्मणजे त्यास धातुविकार उत्पन्न होतो, व पुढें त्याची प्रकृति क्षयावर जाते अशी स्थिति नजरेस पडली तर तावडतोब उपचार करावे. (राजयक्ष्मा प्रकरण पहा)

२२. रेचक औषधांनीं बद्धकोष्ठ बरा होत नाहीं. बद्धकोष्ठ बरा होण्यास औषधच घेतलें पाहिजे. या करितां रेचक घेऊन मग एखादें औषध घ्यावें. रेचक औषधाची संवई पडली ह्मणजे मग त्यावाचून शौचास साफ होत नाहीं हेंहि लक्षांत ठेवावें.

२३. कोणतेंहि रोगाबद्दल काळजी बाळगूं नये काळजी केल्यानें रोग बरा होण्यास अडचण पडते इतकेंच नव्हे तर नवीन रोगहि उत्पन्न होतो.

---



# प्रकरण ५.

## व्याधींचीं नांवें, त्यांचीं कारणें, लक्षणें, उपचार. पथ्य इत्यादि.

**वि० सूचनाः**—औषध देण्यापूर्वी रोगाचें निदान बरोबर झालें पाहिजे. ही गोष्ट पूर्णपणें लक्षांत ठेवावी.

काढ्यांत औषधें किती घालावीं, साखर व मध किती घालावा, अनुपानाकरितां आल्याचा रस वगैरे किती घ्यावा, पथ्य कसें करावें इ० माहिती प्रकरण २–३–४ यांत सांगितली आहे ती संपूर्ण वाचून तशी व्यवस्था ठेवावी.

### अजीर्ण.

**अजीर्णाचें कारण व लक्षणः**—प्रमाणाहून अधिक खाणें. फार पाणी पिणें, अकाळीं जेवणें, मल मूत्रादिकांचा वेग रोध करणें, दिवसास निजणें, ह्या कारणांनीं अन्नाचा परिपाक होत नाहीं; त्याला अजीर्ण ह्मणतात. कफ, पित्त आणि वायु या तीन दोषांनीं क्रमानें आम, विदग्ध, आणि विष्टब्ध, असे अजीर्णाचे मुख्य तीन प्रकार आहेत.

**आमाजीर्णः**—या अजीर्णामध्यें अंगाला जडता, मळमळ, गाल आणि डोळे यांस सूज, आणि जसें अन्न खावें तसा ढेंकर येणें इत्यादि विकार होतात.

**उपचारः**—१–वेखंड व सैंधव यांचें चूर्ण प्रत्येकीं २–२॥ मासे, ऊनपाण्याशीं घ्यावें. २–लवंगा २ मासे व हरितकी ६ मासे यांचा काढा सैंधव घालून द्यावा. ३–गुळाबरोबर सुंठ किंवा पिंपळी अथवा हरितकी अथवा डाळिंब भक्षण करावें. ४–सुंठ, मिरीं, पिंपळी, दांतीमूळ, तेड, चित्रक, पिंपळमूळ, यांचें चूर्ण गुळाबरोबर खावें.

**विदग्धाजीर्णः**—यामध्यें भ्रम, तृष्णा, मूर्च्छा, पित्तापासून नानाप्रकारच्या ओषचोषादिक पीडा आणि धुरकट व आंबट असा ढेंकर, घाम व दाह इत्यादि विकार होतात.

**उपचारः**—थंडपाणी प्यावें, रेचक द्यावें.

**विष्टब्धाजीर्णः**—यामध्यें शूल, पोट फुगणें, वातवेदना, मळ आणि वायु यांची बंदी, व अंग ताठल्यासारखें होणें, मोह आणि आमवायूच्या कळांसारख्या कळा लागणें, इत्यादि विकार होतात.

**उपचारः**—१–पोट शेकावें २–दररोजच्या स्वाभाविक अजीर्णाच्या पचनार्थ भोजनानंतर शतपावली करून डाव्या बाजूवर निजावें. ३–पाण्यांत थोडें मीठ घालून तें पाणी प्यावें.

**सर्व प्रकारच्या अजीर्णावर उपचारः**—१–यादी नंबर ४०।८३।८६।८७ १८९।१९० या औषधांपैकीं प्रकृतिमानानें योग्य तें द्यावें. २--लसूण, सुंठ, मिरीं, पिंपळी आणि पादेलोण हीं समभाग घेऊन वाटून ३।४ गुंजांची गोळी, नित्य एक तोळा तुपांतून भोजनापूर्वी घ्यावी. ३–कोष्टकोळिंजन ताकांत उगाळून द्यावें. ४--पिंपळेच्या अंगावरील सुक्या सालीची राख निजते वेळेस ६ मासे घेऊन, वर ऊन पाणी घोटभर घ्यावें. ५--हरीतकी किंवा सुंठ, गुळाशीं किंवा सैंधवाशीं नित्य नेमानें भक्षण केली तर अग्निदीपन करणारी आहे. ६--हरीतकी, करंजाची साल, चित्रक, पिंपळमूळ, मिरीं, पिंपळी आणि साखर यांचें समभाग चूर्ण एकत्र करावें आणि घ्यावें. हें अजीर्णावर पाचन आहे. ७--घोड्याची लीद ताकाचे निवळींत कोलून फडक्यावर गाळून त्यांत ६ मासे ओंवा वाटून पुन्हा फडक्यावर गाळून ठिकरी देऊन घ्यावें. ८--सोडावाटर द्यावें. ( यादी नंबर २२९ पहा. ) ९--लंघन करावें.

**कोणते पदार्थांचे अजीर्णावर काय द्यावे तेंः**—अळवाचे भाजीस तांदुळांचें धुवण. अंबाड्यास शिळेंपाणी. अंब्यास संचळ किंवा दूध. आंवेस सुंठ व धने. उदकाचे अजीर्णास मध किंवा सुवर्ण आणि रुपें सातवेळां तापवून पाण्यांत विझवून तें पाणी. उसास आलें. क्षारोदकास आलें. उडदांस एरंडमूळ अगर धोत्रा. उष्णास शीत. केळ्यांस तूप. कोहळ्यास कांकडी. हरकास कुष्मांडरस आणि गूळ यांचें मिश्रण. खजुरास सुंठ व मिरीं. खिचडीस सैंधव. खिरीस मुद्गयूष. गव्हांस कांकडी किंवा धोत्रा. घारग्यास ओंवा किंवा पिंपळमूळ. घृतास ईडलिंबू, पिंपळी किंवा ताक. चाकवतास, ताकाचें पाणी. चिंचेस तिळेल अगर चुना. जांभळास सुंठ. द्विदल धान्याचे डाळीस कांजी. तादुळांस क्षीर किंवा पाणी. साठके तांदुळांस दधिजल. ताकास कडुनिंबबीज. तिखटास तूप, तेल किंवा दूध. डाळिंबास बकूळें. म्हशीचे दुधास सैंधव. गाईचे दुधास शंखभस्म. दुध्याभोंपळ्यास शिरस किंवा पळसाचा क्षार. द्राक्षास भद्रमोथा. नारळास तांदळांचें धुवण. नारिंगास गूळ. नारळाचे पाण्यास समुद्रफळ. पडवळास पांढरे शिरस. पिष्टान्नास पाणी. पिंपळीस ओंवा. पिष्टास लवण, कांजी व तूप. पोह्यांस ओंवा. फणसास केळें किंवा आंब्याची कोय. बोरास उष्णोदक. भोंपळ्यास करंजबीज. मधास हरीतकी. महाळुंगास बकुळें किंवा लवण. मुगांस धोत्रा. मुळ्यांस पांढरे शिरस. लसणीस दूध. लाह्यांस बकुळीचें मूळ. वऱ्यांस शिरस किंवा दधिजल. वड्यास वेसवार किंवा लिंबू. वमनास साखर. वाटाण्यास धोत्र्याचीं पानें. साखरेस भद्रमोथा. सुरणास गूळ. सुपारीस लसूण किंवा पाणी. हरभऱ्यांस धोत्रा. क्षारास आम्ल.

**अजीर्णापासून उपद्रवः**—मूर्च्छा, बडबड, ओकारी, तोंडाला पाणी सुटणें, ग्लानी आणि भोंवळ हीं होतात. अजीर्णापासून विषूचिका ( मोडशी--तरळ ) होते.

**विषूचिकाः**—( मोडशी ) ज्या अजीर्णांत सुयांनीं टोंचल्यासारखी वायूची पीडा होऊन मूर्च्छा, ढाळ, ओकारी, शोष, शूळ, भोंवळ, पायांना पेटके येणें, जांभया, दाह, कापरें, उरांत दुखणें, मस्तकशूल, इ० विकार होतात, त्यास विषूचिका ह्मणतात.

**महामारीः**—( पटकी ) हा विषूचिकेचा एक प्रकार आहे.

**विषूचिका व महामारी यांजवर उपायः**—१--कापूर, अफू आणि जायफळ प्रत्येकीं एकेक तोळा, व जुना गूळ ६ तोळे, असे जिन्नस घेऊन सर्वांचा एकत्र चांगला खल करून, मोठ्या मनुष्यास लहान सुपारीएवढी, व लहानास हरभऱ्याएवढी गोळी तुपांतून द्यावी, आणि वर चांगला उंची पांढरा चंदन सुमारें दोन मासे २।३ तोळे पाण्यांत उगाळून द्यावा. २-हरभऱ्याएवढा कापूर, खडीसाखर चार तोळे, आणि पाणी १०।१२ तोळे, असें एकत्र करून द्यावें. ३—यादी नंबर ८६ चें चूर्ण द्यावें. ४-१॥-२ मासे शुद्ध केलेला आंवळ्यागंधक, किंवा २।३ गुंजा केशर, लिंबाचें रसांत द्यावें. ५-चिंच ९ भाग व बिबवे ८ भाग एकत्र वाटून पांढऱ्या कांद्याच्या रसांत कालवून गाळून तो रस घ्यावा, ह्मणजे ओकारी व ढाळ हें बंद होतील. ६-पटकीचे पेटक्यांवर एक जायफळ घेऊन त्याचें चूर्ण करून तिळाचें तेल ७ तोळे घेऊन त्यांत कालवावें, आणि तें तेल कढवावें; आणि पेटके येतील त्या जागीं चोळावें ह्मणजे तावडतोब गुण येतो. ७-अफू सुंठ व कापूर हीं समभाग घेऊन आल्याचे रसांत खलून हरभऱ्यापेक्षां जरा मोठ्या अशा गोळ्या करून प्रत्येक वेळेस गोळी एक थंड पाण्याबरोबर द्यावी. ८-मोडशीवर कुंभ्याचे झाडाचा अगदीं कोंवळा पाला ( आंकऱ्या ) खावा. ९-काजऱ्याचे झाडाची साल लहानास तुरीचे डाळीएवढी व मोठ्यास २।३ मासे विड्याचे पानांतून खावयास द्यावी.

**विशेष सूचनाः**—महामारीचा उपद्रव झाला असतां तावडतोब वरील नंबर १।२।७ यांपैकीं एकादें औषध दिलें तर बहुधा मनुष्य दगावणार नाहीं

**विषूचिकेचें असाध्य लक्षण**....दांत ओंठ व नखें काळीं, स्मृति थोडी, ओकारी, डोळे लाल, शब्द खोल, हातापायांचे संधि ढिले, इत्यादि.

**पथ्य**—मंदाग्नि, अजीर्ण, विषूचिका आणि भस्मक हे जर श्लैष्मिक आहेत, तर पूर्वीं वमन द्यावें, पित्ताधिक्य आहेत तर मृदु रेचक द्यावें, आणि वातजनित आहेत तर स्वेदन करावें, ह्मणजे ते ते विकार कमी होतात. याशिवाय नानाप्रकारचा व्यायाम, दीपन, लघु व फार दिवसांचे तांबड्या भाताचे तांदूळ, मृगांचा रस, चाकवत, कोंवळा मुळा, लसूण, जुना कोहळा, ताजें केळें, शेवग्याच्या शेंगा, पडवळ, वांगें, कांकडी, कारेतें, जांबूळ, आलें, चुका, आवळे, सुंठ, डाळिंब, महाळुंग, लोणी, तूप, ताक, कांजी, तिखट, तेल, हिंग, लवंग, ओंवा, मिरीं, मेथी, धने, जिरें, दहीं, तापलेलें पाणी, कडू, व तिखट असे रस, हे मंदाग्नीवर व अजीर्णावर पथ्यकारक आहेत.

**अपथ्य:**—रेच, मळ व मूत्र यांचे वेगांचें धारण, भोजनोत्तर लागलेंच अतिरिक्त अन्न भक्षण करणें, जागरण, द्विदल धान्य, जलपान, जड पदार्थ भक्षण, इत्यादि.

## अतिसार.

**अतिसाराचें कारण**:—प्रमाणापेक्षां अधिक किंवा स्वभावत: जड, अति स्निग्ध, तीक्ष्ण, अति उष्ण, अत्यंत पातळ, असे पदार्थ खाणें किंवा पूर्व दिवसाचा आहार जीर्ण झाल्यावांचून जेवणें, अपक्व अन्न खाणें, रोजची जेवणाची वेळ सोडून अन्य वेळीं थोडें किंवा फार पाणी पिणें, नासकें पाणी पिणें, मळ मूत्रादिकांचा रोध, कृमीचा उपद्रव, इत्यादि कारणांनीं अतिसार होतो.

**अतिसाराचे प्रकार**:—१ वातातिसार, २ पित्तातिसार, ३ कफातिसार, ४ सन्निपातातिसार, ५ शोकातिसार, ६ आमातिसार.

**अतिसाराचें पूर्व स्वरूप**:—हृदय, नाभी, गुद, पोट, कुशी इतक्या ठिकाणीं सुया टोंचल्यासारखी पीडा, हातपाय गळणें, अपान वायूचा रोध, मलावरोध, पोट फुगणें, अन्नाचा पाक बरोबर न होणें, हीं लक्षणें अतिसार व्हावयाचा असला म्हणजे होतात.

**वातातिसार लक्षण**:—वायूनें अतिसार झाला असतां तांबडें, फेंसयुक्त, रुक्ष, थोडें आणि वारंवार व अपक्व असें पुरीष (विष्टा) पडतें, व ढाळ होते वेळीं शब्द होतो, आणि पोटांत मुर्डा होतो.

**उपचार:**—१-यादी नंबर ४४ चा काढा द्यावा. २-मेण अफू व केशर समभाग घेऊन एके ठिकाणीं खलून **तांदुळभर** गोळी द्यावी. ३ सुंठ, धायटीचीं फुलें सांवरीचा चीक व ओंवा यांचें चूर्ण ताकाशीं द्यावें. ४ भाजलेल्या भांगेचें चूर्ण १॥-२ मासे रात्रीं मधाशीं द्यावें. ५ गंधक रसायन द्यावें (यादी नंबर १२४ पहा). शुंठ्यादि चूर्ण द्यावें. (यादी नंबर ९८ पहा).

**पित्तातिसार लक्षण:**—पित्तापासून पिवळें, निळें किंवा थोडेंसें तांबडे पुरीष (मळ) होतें, आणि तहान, भोंवळ, सर्वांगाचा दाह, गुदाचे ठिकाणीं पुरळ हीं लक्षणें होतात.

**उपचार**:—१ इंद्रजव, कुड्याची साल व अतिवीष याचें चूर्ण तांदळाच्या धुणांत मध घालून द्यावें. यादी नंबर ४५।४३ यांपैकीं प्रकृतीमानानें एकादा काढा द्यावा.

**कफातिसार–लक्षण**:—पांढरें, घट्ट, कफमिश्रित, आमगंधी आणि थंड असें पुरीष पडतें; व त्या मनुष्याच्या अंगावर रोमांच उभे राहतात.

**उपचार:**—१-यावर प्रथम लंघन व पाचन हितकारक आहे. २- यादी नंबर

४५ किंवा ४६ चा काढा द्यावा. ३ पहाडमूळ, वेखंड, सुंठ, मिरीं, पिंपळीं, कोष्ट कटुकी यांचे चूर्ण ऊन पाण्याबरोबर द्यावें.

**सन्निपातिक अतिसारलक्षण**—डुकराच्या चरबीसारखा, अथवा मांस धुतलेल्या पाण्यासारखा, आणि वातादि त्रिदोषांचे लक्षणांनीं युक्त असा मल होणें. हा कष्टसाध्य जाणावा.

**उपचार.** १—यादी नंबर ४३ किंवा ४७ चा काढा द्यावा. ५. कटुकी, बेलफळाचा मगज. आणि गुळवेळ यांचें चूर्ण मधाशीं द्यावें.

**शोकातिसारलक्षण**—धन, बंधु इत्यादिकांचे नाशानें शोक करणारा व भीति बाळगणारा आणि त्यामुळें ज्याचें अन्न तुटलें आहे, अशा मनुष्याचे कोठ्यांत शोकजन्य व इतर उष्मा शिरून अग्नीला व्याकूळ करून त्याचे रक्ताला क्षोभवितो; मग तें रक्त गुदावाटे बाहेर पडतें व त्याचा रंग तांबड्या गुंजेसारखा असून तें मलमिश्रित किंवा मलरहित किंवा दुर्गंधयुक्त असें असतें. हा अतिसार वातपित्तजन्य आहे असें बहुतेक ह्मणतात.

**उपचारः**—हर्षकारक पदार्थ अथवा उमेद देणें इत्यादिकेंकरून शोक नाहींसा होण्याचा उपाय करावा. आणि वातातिसारावरचीं औषधें द्यावीं.

**आमातिसारः**—( आमांश ) अन्न न जिरल्यामुळें दोष ( वात, पित्त, कफ ) स्वमार्ग सोडून कोष्ठांत जातात, आणि त्याचा क्षोभ करून रक्तादिधातु, आणि पूरीषादि मळ वारंवार गुदावाटे बाहेर सारितात. ह्याचा रंग तऱ्हेतऱ्हेचा असतो व त्यांत मुरडा फार होतो.

**कारणें**—थंडी व सरदी हीं आमांश होण्याचीं मुख्य कारणें आहेत. कित्येक वेळां मळावरोधापासून आमांश होतो. जडान्न अथवा कच्चें अन्न खाण्यांत आलें तर उपासमर झाल्यानें किंवा दूषित हवा ( सांथ ) आणि पाणी या पासूनही आमांश होतो.

**लक्षणें**—आमांशांत पोटांत मुरडून येऊन शौचास होतें. शौचाचे वेळीं फार कुंथावें लागतें व शौचांतून श्लेष्म, रक्त पांढरी अगर तांबडी आंव पडते. आमांश दोन प्रकारचा असतो तीक्ष्ण व दीर्घ. तीक्ष्ण आमांशांत ताप, लघवी लाल, भूक कमी होणें, जिभेवर पांढरा थर, चेहरा उतरणें, पायांत कळा येणें वगैरे लक्षणें होतात. दीर्घ आमांश तीन चार आठवडे राहिला ह्मणजे तबेत बरी होते परंतु आम मात्र थोडथोडा अनेक दिवस पडतो; परंतु पोटांत मुरडा किंवा दुखावा फार कमी होतो.

**उपायः**—अन्न साधें व हलकें द्यावें. दूध, भात, साबुदाण्याची खीर, तवकीराची लापशी द्यावी. पोटांत फार दुखत असेल तर मोहोरीचें प्लास्टर लावावें. गरम पाणी बाटलींत घालून शेक घ्यावा. अथवा आळशीचें पोटीस लावावें.

**उपचारः**–१–अन्न पचन होण्याची क्रिया करावी, व लंघन करावें. बलवानें आमातिसाऱ्याला लंघनावाचून दुसरें औषध नाहीं. लंघन मनुष्याच्या वाढलेल्या दोषांना शमवून पाचन करितें. २–धने व सुंठ यांचा काढा पाचन द्यावा, किंवा यादी नंबर ४२ किंवा ४३ चा काढा द्यावा. ३–डाळिंब पोखरून त्यांत अफू व जायफळ भरून कुम्याचीं पानें सभोंवार बांधून मुंबरांत भाजून मग खल करावा, आणि हरभऱ्याएवढ्या गोळ्या करून सावलींत वाळवाव्या, व प्रत्येक वेळेस गाईचे अदमुऱ्यांतून एक गोळी द्यावी. एका डाळिंबास अफू सुमारें ३।४ मासे व एक तोळा जायफळ असे जिन्नस घ्यावे. ४--खारीक फोडून तींतील बी काढून टाकावी. नंतर एका अर्धांत एक गुंज अफू, व दुसऱ्या अर्धांत राहील तितका देवकापूर भरून दोन्हीं अर्धे जुळवून त्यांचे सभोंवार कुंम्याचीं पानें लावून मुबरांत भाजावें. मग कुटून त्याच्या हरभऱ्या एवढ्या गोळ्या करून ठेवाव्या आणि लहानास १ गोळी व मोठ्यास २ गोळ्या प्रत्येक वेळेस थंड पाण्यांतून द्याव्या. ५--खडू ११ भाग, दालचिनी ४ भाग, साखर २५ भाग, जायफळ ३ भाग, केशर ३ भाग, लवंगा १॥ भाग, आणि वेलचीदाणे १ भाग घेऊन सर्वांचें वस्त्रगाळ चूर्ण करून दुधांतून द्यावें. हें फार चांगलें औषध आहे. ६--लिंबाचे रसांतून तुरटीचे लाहीची पूड द्यावी. ७--सुंठ बडिशेप व खसखस हीं अर्धवट भाजून वस्त्रगाळ करून तें चूर्ण साखरेंतून द्यावें. ८--बेलफळ भाजावें आणि त्याचे गरांत गूळ घालून वाटून गोळी करून द्यावी. किंवा ऊन पाण्यांत सरबत करून द्यावें. ९--बाभळीचे सालीचा किंवा पानांचा रस दह्याबरोबर द्यावा. १०--तुपांतून जायफळ द्यावें. ११-कुड्याचें पाळ, सुंठ व बेलफळ ऊन पाण्यांत उगाळून एकत्र करून तें द्यावें. किंवा गोड्या आंब्याची व जांबळीची साल प्रत्येकीं ३ मासे घेऊन २ तोळे दह्यांत उगाळून २ गुंजा चुना घालून द्यावें. १२--आल्याचा रस ६ मासे, कांद्याचा रस ६ मासे व तुरटीचे लाहीची पूड ३ मासे असें एकत्र करून प्रत्येक वेळेस द्यावें. ३।३ तासांनीं हें औषध द्यावें. १३--डाळिंबाची साल २ भाग, जायफळ १ भाग, आणि मेथी २ भाग याप्रमाणें जिन्नस घेऊन प्रत्येकीं अर्धे भाजून मग भाजलेले व हिरवे एकत्र करून वाटून गाईचे अदमुऱ्यांतून प्रत्येक वेळेस लहानशा सुपारीएवढें मिश्रण द्यावें. १४--गंधक रसायन द्यावें. (यादी नंबर १२४ पहा) यादी नंबर ९७।९८ यांपैकीं एखादें चूर्ण द्यावें. १५-इसबगोल अर्धातोळा दिवसांतून तीन वेळां देणें, याची काफी घ्यावी अगर पाण्यांत कांहींवेळ घालून घेणें.

**रक्तातिसारः**—हा पित्तातिसाराचाच एक प्रकार आहे. याची लक्षणें पित्तातिसाराप्रमाणेंच होतात. पित्तातिसार झाला असतां किंवा व्हावयाचा असतां पित्तकारक पदार्थ पुष्कळ आणि निरंतर खाल्ले तर रक्तातिसार होतो.

**उपचारः**—१–जांबूळ, आंबा, व आंवळी, या तीन झाडांचे पानांचा आंगरस समान भाग घेऊन त्यांत त्याच भागानें तूप, मध व दूध घालून तें द्यावें, ह्मणजे मोठाहि रक्तातिसार असला तरी दूर होतो. (एखादे पाल्याचा आंगरस न आल्यास दूध घालून वाटून रस काढावा.) यादी नंबर १९७।१९८ चें औषध द्यावें. २–उंबराचा चीक १५।२० थेंब, आणि खडीसाखर ६ मासे, असें एकत्र करून द्यावें. हें औषध उत्तम पैकीं आहे. ३–नारळ माडाचे पोइचीं कोंवळीं फुलें काढून, तीं ६ मासे फुलें व जिरें ३ मासे एकत्र वाटून गोळी करून द्यावी. हें औषध फार चांगल्यापैकीं आहे. ४–गुळाबरोबर बेलफळाचा मगज खावा. ५–शतावरीच्या मुळयांचा रस २ तोळे आणि ७।८ तोळे दूध एकत्र करून कढवून शेष दूध राहिल्यावर द्यावें.

**सर्वांतिसारावर उपचारः**—१–यादी नंबर ४३ किंवा ४७ चा काढा द्यावा. २–यादी नंबर ९७।१९८।१२४।१२८।१९७ यांपैकीं प्रकृतिमानानें एकादें औषध द्यावें. ३–अफू व केशर समभाग घेऊन आल्याचे रसांत खल करून गुंजेगुंजेच्या गोळ्या बांधाव्या आणि प्रत्येक वेळेस तांदळाचें धुवण २।३ तोळे घेऊन त्यांत अर्धें किंवा ¼ जायफळ उगाळून ५।६ थेंब मध घालून त्यांतून एक गोळी द्यावी; ह्मणजे ताबडतोब गुण येतो. हें औषध व अनुपान फार अनुभवाचें आहे. वरील गोळी नुसत्या मधांतून, किंवा वरील विकारावरचे एखादे काढ्यांतून, निदान ऊन पाण्यांतून दिली तरी गुण येतो. मात्र जायफळ उगाळावें. ४–मागें अतिसारावरील लिहिलेले नंबर ३।४।५।६।९ चे औषधांपैकीं एखादें द्यावें.

**अतिसाराचें असाध्य लक्षणः**—पिकलेल्या जांबळाच्या रंगासारखें, काजळासारिखें, पातळ, तूप, तेल, चरबी, मज्जा, वेसवार, दूध, दहीं आणि मांस धुतलेलें पाणी, ह्यांच्या रंगासारखें, निळ्या व शेंदरी रंगाचें, मृदंगाच्या शाईसारखें, नानाप्रकारच्या रंगाचें, तुळतुळीत, मोराचे पिसाऱ्यावर जसे चांदवे असतात तसे धातुस्नेहाचे चांदवे त्यावर असणें, घट्ट, मुडद्याचे दुर्गंधाचें, व पुष्कळ असें पुरीष पडणें, व रोग्यास तृषा, दाह, अन्नद्वेष, दमा, उचकी, बरगड्यांच्या हाडांस ठणका, अस्वास्थ्य, गुदाच्या वळ्या पिकणें व बडबड, हे विकार होतात.

**दुसरें असाध्य लक्षणः**—ज्याचे गुद मिटत नाहीं, क्षीण झालेला, अत्यंत आध्मानानें युक्त, शोषादि उपद्रवानें व्याप्त, आणि अंग गार पडलें आहे व ज्याचा अग्नि नष्ट झालेला आहे तो, असे असाध्य होय.

**तिसरें असाध्य लक्षणः**—श्वास, शूळ, व तहान यांनीं पीडिलेला, क्षीण, ज्वराने पीडिलेला, आणि वृद्ध, असा रोगी असाध्य होय.

**अतिसार जाण्याचें लक्षणः**—ज्याला मूत्र होते वेळीं मळ होत नाहीं, आणि ज्याचा अपान वायू चांगला सरतो, आणि अग्नि प्रदीप्त असून कोष्ट हलका होतो, त्याचा अतिसार गेला असें समजावें.

**पथ्यः**—वांति, लंघन, निद्रा, जुन्या तांदळाचा भात, मसुरा, तुरी, गाईचें तूप, दूध, ताक, लोणी, केळफुल, मध, जांभूळ, आलें, सुंठ, बेलफळ, डाळिंब, चुका, भांग, पिंपळी, जिरें, धने, संपूर्ण तुरट पदार्थ, पाणी तापवून दशांश किंवा षोडशांश ठेवून तें थंड केलेलें, इत्यादि.

**अपथ्यः**—स्नान, अभ्यंग, जड स्निग्ध असें भोजन, व्यायाम, नवान्न, मैथून, चिंता, घाम काढणें, अंजन, रक्त काढणें, जागरण, धूम्रपान, गहूं, उडीद, चाकवत, पावटे, मध, आंबा, पांढराभोंपळा, जडान्न, विडा, पुरणपोळी, कोंहळा, ऊंस, गूळ, लसूण, नारळ, संपूर्ण पत्रशाका, कांकडी, आंबट पदार्थ, इत्यादि.

**विशेष सूचनाः**—आमांशाचा विकार होतांच एरंडेल सुंठीचे काढ्यांतून प्रथम द्यावें, म्हणजे आमांशाचा झाडा होऊन औषध लवकर लागू पडतें. कितीएक लोकांस आमांशाचा आरंभ होतांच पहिल्यानें जुलाब होऊं लागतात, असें असेल तर एरंडेल देऊं नये.

आमांशांत मुख्य गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे ती ही कीं, आमपचन करण्याची क्रिया झाली पाहिजे; ह्मणून दिवसांतून दोन वेळां निदान एकदां तरी यादी नंबर ४७ चा काढा द्यावा. ज्या औषधांत अफू आहे असें औषध दिवसांतून दोन वेळांपेक्षां जास्त वेळ कधींही देऊं नये.

आमांश सुरू होतांच सर्वातिसारावरील नंबर ३ चें औषध प्रथमच द्यावें, ह्मणजे विकार वाढणार नाहीं.

## अपस्मार. ( फेपरें )

मज्जातंतु–क्षोभानें अंधारांत बसल्यासारिखें होणें, डोळे वांकडे होणें, ज्ञान नष्ट होणें, पेटके वगैरे न येतां एकदम बेशुद्ध पडणें, तोंडास फेंस येणें, कांपरे भरणें, क्वचित मोठ्यानें आरोळी मारून पूर्णपणें वाटेल तेथें बेशुद्ध पडणें, इत्यादि लक्षणें ज्या रोगांत होतात, त्यास अपस्मार असें ह्मणतात. व थोड्या वेळानें ( १०।१५ मिनिटांनीं ) हळू हळू मनुष्य शुद्धिवर येऊं लागतो. शुद्धिवर आल्यावर शरीर गळलेलें दिसतें परंतु बराच वेळपर्यंत रोगी **घोणटलेला ( घोंटाळलेला )** असून कांहीं वेळ झोंप घेतल्यावर पूर्ण स्थितीवर येतो.

अपस्माराचे झटके दिवसा अथवा रात्रीं, जागेपणीं किंवा झोंपेंत तसेंच दिवसांतून अनेक वेळांही येतात. लहानपणीं अथवा मोठेपणींही हा विकार होतो. हा विकार आनुवंशिकही असूं शकतो.

**तात्कालिक उपायः**—रोग्यास वायु झालेला दिसल्याबरोबर त्याला चांगला बिछाना घालून सारखा निजवावा. दांत सारखा चावत असेल तर दोन्ही दातांमध्यें भेंडाचें बूच अगर अन्य पदार्थ घालून ठेवावे ह्मणजे जीभ चावणार नाहीं. आंगांस

कोट असल्यास त्याचे बंद सोडून रोग्यास चांगला गार वारा घालावा. नाकाशीं तांबडा खाण्याचा कांदा आणून तो आडवा कापून धरावा. तसेंच तोंडावर व मानेवर थोडथोडें पाणी शिंपडावें.

वात, पित्त व कफ या तीन दोषांपासून तीन, व तिन्ही दोष मिळून होणारा एक, असे अपस्माराचे चार प्रकार आहेत.

१ **वातापस्मारः**—याचें लक्षण–अंगाला कंप, तोंडाला फेंस, दांत खाणें, व मोठमोठ्यानें श्वासोश्वास टाकणें, आरक्त व कृष्णवर्ण अशा प्रकारचीं रूपें पाहणें, इत्यादि.

२ **पैत्तिक अपस्मारः**—याचें लक्षण--रोग्याचे डोळे, तोंड आणि अंग हीं पिवळीं होणें, व पिवळें आणि तांबडें असें रूप पाहणें, इत्यादि.

३ **कफापस्मारः**—याचें लक्षण–तोंडाला पांढरा फेंस, हात पाय तोंड व डोळे हे शुभ्रवर्ण, शरीर थंड, शरिराचे ठायीं रोमांच, व पांढरीं रूपें पाहणें इत्यादि.

४ **सन्निपातापस्मारः**—याचें लक्षण–वात, पित्त, कफ, या तीनहि दोषांचीं लक्षणें होणें.

**असाध्य** लक्षणः—वारंवार कंपयुक्त होणें, क्षीण भृकुटी चाळविणें, आणि डोळे वेडेवांकडे करणें इ.

**सर्व प्रकारचे अपस्मारांवर उपचारः**— वातापस्मार बस्ति धर्मांनीं, पैत्तिक विरेचनानें, आणि कफापस्मार वमनानें, जिंकावा. अपस्मारानें बेशुद्ध होतांच कांदा चिरून नाकाशीं धरावा, ह्मणजे त्याचा दर्प नाकांत जाऊन मनुष्य लवकर शुद्धीवर येतो. २ हत्तीला मस्ती येते तेव्हां त्याच्या मस्तकावर फडकें चोळून भिजवून सुकवून ठेवावें; आणि फेपरें येईल त्या वेळेस त्या फडक्याची वात करून पेटवून त्याची धुरी नाकांत द्यावी, ह्मणजे सावध होईल. सावध झाल्यावर एका घटिकेनें पुन्हां धुरी द्यावी. याप्रमाणें केलें ह्मणजे फेंपरें जातें. ३–हत्तीची लीद ओली आणून पिळून तिचा रस काढून त्यांत कुचल्याची बी उगाळून तो रस नाकांत घालावा, अथवा ओढण्यास द्यावा. ४–वेखंडाचें १--२ मासे चूर्ण मधाबरोबर द्यावें, व दूधभात जेवावा. ५--ब्राह्मीचा रस ६ मासे, वेखंडाचें चूर्ण २ मासे आणि मध २ मासे एकत्र करून रोज प्रत्यहीं द्यावें. ६--कोहळ्याचे गिराचे रसांत जेष्टमध उगाळून द्यावा. ७- निर्गुंडीच्या रसांत अक्रोड उगाळून नस्य किंवा अंजन करावें. ८--ढेकणाच्या रक्तांत फडकें भिजवून वाळवून ठेवावें, आणि गाढवाचे मूत्रांत भिजवून तीन दिवस नाकांत नस्य करावें, ह्मणजे फार दिवसांचाहि अपस्मार जाईल. ९--ब्राह्मीचे रसांत वेखंड उगाळून द्यावें. १०–तूप १ तोळा, सैंधव १ तोळा, हिंग १ तोळा, आणि

गोमूत्र १० तोळे, याप्रमाणें एकत्र करून पचन करावें. आणि शेष तूप राहिलें म्हणजे उतरून गाळून ठेवावें आणि तें प्रत्यहीं शक्तिमानाप्रमाणें द्यावें.

**पथ्यः**—तांबड्या साळी, मूग, गहूं, जुनें तूप, धमाशाचें पाणी, दूध, वाळा, वेखंड, पडवळ, जुना कोहळा, चाकवत, गोड डाळिंब, शेवगा, द्राक्षें, आंवळा, इ०.

**अपथ्यः**—चिंता, शोक, क्रोध, भय, मद्य, विरुद्धान्न, तिखट उष्ण व जड असें अन्न, अति स्त्रीगमन, संपूर्ण पत्रशाका, तोंडलें, उडीद, तुरी, इत्यादि.

**विशेष सूचनाः**—हा विकार झालेल्या माणसांनीं कोणतेंहि औषध सुरू असतां दूधभात प्रत्यहीं जेवावा. दूध प्यावें. ब्राह्मीचा रस नित्य घ्यावा. ब्राह्मी व दूध हीं या विकृतीवर उत्तम आहेत. तसेंच ज्यास हा विकार उत्पन्न होईल त्यांनीं ताबडतोब हवेचा पूर्णपणें बदल होईल अशा व चांगल्या हवेच्या ठिकाणीं जाऊन रहावें. जसें कोकणांतून देशांत; अगर देशांतून कोंकणांत. असें केल्यानें केव्हां केव्हां विकार जातो. हा विकार जडल्यावर हयगय करूं नये; कारण तो वरेच दिवस अंगांत राहिला म्हणजे जाण्यास कठीण पडतो.

## अरोचक.

क्षुधा असतां जेवणाला समर्थ नसणें याला अरुचि किंवा अरोचक म्हणतात. अन्नाचें स्मरण, श्रवण, दर्शन आणि वास यांनीं त्रास येणें--त्याला अन्नद्वेष म्हणतात. याचाहि अरोचकांमध्यें संग्रह करितात. याचे वातारोचक, पित्तारोचक, कफारोचक, सन्निपातारोचक इ. ८ प्रकार आहेत.

**सर्व प्रकारच्या अरोचकांवर उपचारः**—१--सुंठ, मिरी, पिंपळी, दालचिनी, जायपत्री, वेलची, नागकेशर, तालिसपत्र, जिरें, धने, बडिशेप, आंवळकटी, आणि सैंधव, समभाग घेऊन चूर्ण करून खारकेंतील बिया काढून त्यांत हें चूर्ण भरावें; आणि त्या खारका सुतानें बांधून प्रथम लिंबाचे रसांत टाकाव्या, रस वाळला म्हणजे काढून आल्याचे रसांत तीन भावना द्याव्या, नंतर मधांत १ भावना देऊन, त्यांपैकीं रोज १।२ खारका खाव्या. आल्याचे रसाच्या व मधाच्या भावना दिल्या नाहीं तरी गुण येतो. परंतु दिल्यास विशेष चांगलें. २--यादी नंबर १५३।१५८ १५९ यापैकीं एखादें औषध द्यावें. आंवळकटी चित्रक बाळहरडे पिंपळी व सैंधव समभाग घेऊन त्यांचें वस्त्रगाळ चूर्ण करून द्यावें. म्हणजे ज्वर व अरुचि जाऊन अग्नि प्रदीप्त होतो. व कफ दूर होतो. ३--मीठ व आलें खावें. अग्नि प्रदिप्त करणारीं व अजीर्णनाशक औषधें सेवन करावीं. ४--महाळुंगाचे केसर, सैंधव आणि मध यांचे बरोबर खावे, म्हणजे तोंडाची विरसता जाईल. ५-डाळिंब आणि मध खावा. ६--आंवळकटी, चिंच, द्राक्षें, डाळिंब, जिरें, पादेलोण, गूळ, व मध, हे सर्व पदार्थ अरुचीचा नाश करितात. ७-डाळिंबाच्या रसांत वावडिंगाचें चूर्ण घालून तोंडांत

धरण्याकरितां द्यावें. तें रुचि उत्पन्न करितें. ८--लिंबाचा रस एक भाग व साखरेचें पाणी ६ भाग घेऊन त्यांत मिरीं व लवंगा यांची पूड घालून पन्हें करावें, आणि तें द्यावें. हें वातनाशक, अग्निप्रदीप्त करणारें, रुचिकारक, व सर्व आहाराचें पाचक असें आहे. ९--यादी नंबर ८८।८९।९५ यांपैकीं एखादें चूर्ण द्यावें.

पथ्य:—रेचन, वमन, औषधांचा कवळ मुखांत धरणें, कडूकाष्टानें दांत घासणें, गहूं, तुरी, साळी, तांबडा भोंपळा, कोंवळे मुळे, वांगें, शेवगा, केळें, डाळिंब, पडवळ, सैंधव, दूध, तूप, लसूण, सुरण, द्राक्षें, आंबा, वाहणारें पाणी, कांजी, मध, दहीं, ताक, आलें, कंकोळ, खजूर, पिकें-कवठ, साखर, हरीतकी, ओंवा, मिरीं, हिंग, गोड, आंबट व कडू हे रस, स्नान इत्यादि.

अपथ्य:—तहान, ढेकर, क्षुधा आणि रोदन ह्यांच्या वेगाचें धारण, अप्रिय अन्न, क्रोध, लोभ, भय, शोक, दुर्गंध, विद्रूप पदार्थ दर्शन, इत्यादि.

## अश्मरी ( मुतखडा. )

जेव्हां वायु बस्तींतलें शुक्रयुक्त किंवा पित्तयुक्त मूत्र किंवा कफ यांना शोषितो तेव्हां त्या बस्तीमध्यें शुक्रादिक गोठून खडा होतो, त्यास अश्मरी ह्मणतात.

पूर्वरूप:—बस्ती फुगणें व त्याच्या आसमंतांत अतिशूल, मूत्र होत असतां तिडीक, आणि कष्टानें मूत्र होणें.

सामान्य लक्षण व प्रकार:—नाभी आणि बस्तीचें अग्र यांच्या ठिकाणीं शूल, अश्मरीनें मूत्रमार्ग कोंडला ह्मणजे मूत्राची धार फाटणें, मूत्र स्वच्छ गोमेद मण्यासारखें, अश्मरीपासून बस्तीमध्यें क्षत झालें तर रक्तमिश्रित मूत्र होणें व मूत्र होण्यास जोर केला तर फार क्लेश होणें, इत्यादि. याचे ४ प्रकार आहेत.

वाताश्मरीचीं लक्षणें:—अत्यंत पीडा, दांत खाणें, कफ, शिश्न व नाभी यांस हस्तानें पिळवटणें, कुंथणें, थेंबथेंब मूत्र होणें, अश्मरी कांट्यासारखी खुपणें इत्यादि.

उपचार:—१ शेवग्याचे मुळांचा काढा करून तो गरम असतां द्यावा. २ सुंठ, ऐरण, पाषाणभेद, कोष्टकोळिंजन, वायवर्णा, गोखरूं, हिरडा, आणि बहाव्याचे शेंगेचा मगज, यांचा काढा करून त्यांत हिंग, जवखार आणि सैंधव, यांचें चूर्ण घालून द्यावा.

पित्ताश्मरीचीं लक्षणें:—बस्तींत आग होणें, बस्ती उष्ण असणें, अश्मरी भिलाव्याचें आंतल्या बीजाएवढी व रक्तवर्ण, पीतवर्ण किंवा कृष्णवर्ण अशी असणें इत्यादि.

उपचार:—पाषाणभेदाचा काढा शिलाजीत व साखर घालून द्यावा.

कफाश्मरीचीं लक्षणें:—बस्तीमध्यें पीडा, अश्मरी थंड, जड व मोठी असून तिचा वर्ण मधासारिखा किंवा पांढरा असणें इत्यादि.

**उपचारः**—१–शेवग्याची साल व वायवर्ण्याची साल यांचा काढा जवखार घालून द्यावा.

**शुक्राश्मरीची उत्पत्ति व लक्षणें:**—मैथुनाचे वेळेस स्थानापासून सुटलेलें शुक्र, पुरतें मैथून न मिळाल्यामुळें न पडलेला शुक्रधातु आपल्या स्थानापासून निघून शिश्नाचे व वृषणाचे मध्यभागीं आला म्हणजे, वायु कुपित होऊन शुक्रधातूचें शोषण करून त्यास ग्रंथीरूप करितो, त्यास शुक्राश्मरी म्हणतात. त्याचीं लक्षणें–बस्तींत शूळ, उन्हाळे, वृषणाला सूज, इत्यादि.

**उपचारः**—सर्व प्रकारचे अश्मरींवर खालील उपचार करावे.

**असाध्य लक्षणः**—नाभी आणि वृषण सुजणें, मूत्र गुतणें, फार वेदना इ.

**सर्व प्रकारचे अश्मरींवर उपचारः**—१–ओव्यास ताकाच्या २१ भावना द्याव्या, नंतर त्याचें बारीक चूर्ण करून ताकांतून द्यावें; ह्मणजे मूत्रद्वार विस्तीर्ण राहून मुतखडे पडतील २–२।३ तोळे ताकांत १।२ मासे जवखार द्यावा. ३–कोहळ्याचे रसांत सु. ४।५ गुंजा भाजलेला हिंग व १ मासा जवखार मिळवून द्यावा. ४–वाटोळे तिळांच्या झाडाची राख १ तोळा, गाईच्या दुधांतून द्यावी. ५–चिभडाचें ६ मासे मूळ शिळ्या पाण्यांत वाटून सकाळचे वेळीं ३ दिवस द्यावें. ६–उंबराचे मुळांचा ४।५ तोळे रस साखर घालून द्यावा, व या झाडाची मुळी गाईचे दुधांत उगाळून शिश्नावर लेप करावा. ७–कुड्याची साल दह्यांत उगाळून द्यावी. ८–सुंठीचा काढा हळद व गूळ घालून द्यावा. ९–शतावरीच्या मुळ्यांचा रस व गाईचें दूध समभाग करून द्यावें.

**पथ्यः**—मूग, गहूं, कुळीथ, तांदुळजा, वमन, लंघन, स्नान, इत्यादि.

**अपथ्यः**—मूत्र, मळ आणि शुक्र यांच्या वेगाचा रोध, जडान्न इत्यादि.

## अर्श (मूळव्याध.)

**मूळव्याधीचें स्वरूप व प्रकारः**—वातादिदोष, त्वचा, मांस आणि मेद ह्यांना, आणि त्या ठिकाणचे रक्ताला दूषित करून, गुदस्थानीं नाना प्रकारच्या आकृतीचे मांसाचे अंकुर उत्पन्न करितात, त्या अंकुरांस अर्श ह्मणजे मूळव्याध ह्मणतात. हिचे प्रकार ६ आहेत तेः—१ वातार्श, २ पित्तार्श, ३ कफार्श, ४ सन्निपातार्श, ५ रक्तार्श, आणि ६ सहजार्श (संसर्गार्श).

**वातार्शाचें कारणः**—तुरट, तिखट, कडू, अतिरुक्ष, अतिशीत आणि अतिलघु असे पदार्थ खाणें, उशिरां जेवण, तीव्र मद्यपान, अत्यंत मैथुन, उपवास, फार वाऱ्यांत व उन्हांत फिरणें, इत्यादि.

**वातार्शाचें लक्षणः**—मोड सुके (स्रावरहित), चिमचिम वेदनेनें युक्त, निर्जिव, श्याम व अरुणवर्ण, ताठर, बुळबुळित नसणारे, खरखरीत, (गाईच्या जिभे-

सारिखे), वांकडेतिकडे, अणकुचिदार, तोंडली बोर किंवा खारीक ह्यांच्या आकृतीचे असून त्यायोगें डोकें, बरगड्या, खांदे, कंबर, मांड्या, आणि आडसंधी हे फार दुखतात; व शिंका, ढेंकर, मलावरोध, अरुचि, खोकला, श्वास, अन्न कधीं चांगलें पचणें, कधीं न पचणें हे विकार होऊन, दगडासारखा कठीण, थोडा शब्दयुक्त, कुंथून शूळ फेंस व चिकटा यांसह अडकत अडकत असा मळ होतो, व त्वचा, नखें, विष्ठा, मूत्र, डोळे आणि तोंड हीं काळीं होतात.

**उपचार**:--१--सैंधव, चित्रक, इंद्रजव, बीडलोण, बेलफळ व कडुनिंब, यांचे समभाग चूर्ण घालून ७ दिवस मठ्ठा (ताक) घ्यावा. २--मिरीं, पिंपळी, कोष्टकोळिंजन, सैंधव, जिरें, सुंठ, वेखंड, हिंग, वावडिंग, हरीतकी, चित्रक, आणि ओंवा समभाग घेऊन, त्यांचें चूर्ण करून, चूर्णाच्या दुप्पट गूळ घालून प्रत्येक वेळेस एक तोळा खावें; व मागून ऊन पाणी घ्यावें. ३--गरुडवेलीचें सत्व, पारा, गंधक हीं समभाग व तिप्पट रक्तबोळ, असें एकत्र करून, सांवरीच्या सालीच्या रसांत खल करून, मधाशीं द्यावें. ४--योगराज गुग्गुळ द्यावा ( यादी नंबर १५० पहा ). तीळ, लालरातालू बीज, व नागकेशर यांचें चूर्ण साखरेबरोबर खावें.

**पित्तार्शाचें कारण**:—तिखट, आंबट, खारट आणि उष्ण असे पदार्थ खाणें, व्यायाम, अग्निजवळ किंवा उन्हांत बसणें, श्रम, उष्ण देश, क्रोध, मद्यपान, दाह करणारीं तिखट व उष्ण अशीं पानें, अन्न आणि औषधें सेवन करणें, इत्यादि.

**पित्तार्शाचें लक्षण**:—मोड निळ्या अग्राचे, व तांबडा, पिंवळा किंवा काळा अशा रंगाचे असून, पातळ रक्तस्राव होणें, त्यांस आंबूस घाण येणें, व ते बारीक कोमळ आणि शिथिल असणें, त्यांचा आकार पोपटाची जीभ, काळीज आणि जळवाची तोंडें ह्यांसारिखा असणें, व त्यापासून आग, गुदपाक, ज्वर, स्वेद, तृषा, मूर्च्छा, अरुची आणि मोह होणें, व त्यांस हात लाविला असतां कढत लागणें, आणि पातळ; निळा, उष्ण, पिंवळा, तांबडा आणि आमयुक्त असा मळ होणें, रोग्याचीं नखें आणि नेत्र हिरवे, पिंवळे किंवा हळदिवे होणें, इत्यादि.

**उपचार**:--१--तीळ आणि बिबवे यांचा काढा द्यावा, किंवा इंद्रजवांचा काढा मध घालून द्यावा. पथ्याला मुगाचें काट आणि भात द्यावा. २--बिबवे, तीळ आणि हरीतकी समभाग घेऊन त्यांचें चूर्ण करून गुळाशीं एक तोळा द्यावें.

**कफजअर्शाचें कारण**:—मधुर, स्निग्ध, शीत, खारट, आंबट आणि जड असें भोजन, व्यायाम न करणें, दिवसास निजणें, पहाटेस पूर्वेकडचा वारा घेणें, थंड देश, थंड काल, इत्यादि.

**कफजअर्शाचें लक्षण**:—मोड महामूल ह्मणजे खोल जाणारे, कठीण, पीडा करणारे, पांढरे, लांबलांब, तुळतुळीत, ताठर, वाटोळे, जड, बुळबुळीत, ओलसर,

मण्याप्रमाणें गुळगुळीत, कंडू फार करणारे, गाईच्या सडासारखे, गुद बस्ति आणि नाभी यांस ओढल्यासारखी पीडा करणारे, श्वास, कास, मळमळ, अरुचि, अग्निमांद्य, आणि मस्तकाला जडत्व करणारे, असे असून, चरबी व कफमिश्रित असा पुष्कळ मळ पडणें, व नेत्र, नखें आणि त्वचा हीं पांढरीं होणें इ.

**उपचारः**—१-सुरण, हळद, चित्रक, टांकणखार व गूळ समभाग घेऊन कांजींत एकत्र वाटून गुदाला लेप करावा, किंवा ओली कडू भोपळी, कांजींत वाटून त्यांत गूळ घालून गुदाला लेप करावा, म्हणजे मोड नाहींसे होतात किंवा गळून पडतात. २- हरीतकी, सुंठ, पिंपळी व चित्रक यांचें चूर्ण प्रत्येकीं ४ तोळे, व दालचिनी, तमालपत्र व वेलची यांचें चूर्ण प्रत्येकीं एकेक तोळा, व गूळ ४० तोळे, हीं सर्व एकत्र करून त्यांची १० माशांची गोळी खावी. ३-आल्याचा काढा द्यावा.

**सन्निपात अर्शांचें कारणः**—वात, पित्त आणि कफ या तिहींचीं लक्षणें असणें.

**उपचारः**—कणीक चार तोळे, हिंग २ मासे, व बिबवे ४, एकत्र कुटून गुदाला धुरी द्यावी. या प्रकरणांत सर्व प्रकारचे मूळव्याधींवर सांगितलेले उपचार करावे.

**रक्तार्शांचें लक्षणः**—दाहादिक पित्ताचीं लक्षणें होऊन ज्यांमध्यें अधिक रक्त पडतें, व रक्ताचे कोपेंकरून गुदाचे मांसरूपी मोड वडाच्या पारंब्याच्या अंकुरांसारखे व गुंजेसारखे व पोंवळ्याच्या काड्यांसारखे असतात, व ते जेव्हां कठीण मळानें अत्यंत दाटले जातात, तेव्हां त्यांतून दुष्ट व ऊन ऊन रक्त अकस्मात गळूं लागतें, व तें रक्त फार गळालें म्हणजे पर्जन्य काळच्या बेडकासारखा रोगी पिंवळा होतो, आणि त्याच्या शरिराचा वर्ण स्थूलपणा आणि उत्साह हीं नष्ट होतात, शक्ति नाहींशी होते, डोळे गढूळ होतात, श्यामवर्ण, कठीण आणि रुक्ष असा मळ होतो, आणि अपमानवायु सरत नाहीं.

**रक्तार्शांचीं वातादि भेदाचीं लक्षणें**:—मूळव्याधीचें रक्त, पातळ, अरुणवर्ण आणि फेंसळलेलें असें पडत असेल, आणि कंबर, मांड्या आणि गुद यांचे ठायीं शूल होत असेल, तर वायूचा संबंध आहे असें समजावें. ज्यामध्यें शिथील, पांढरा, पिंवळा, स्नेहयुक्त, जड आणि शीतल असा मळ होत असेल, आणि मूळव्याधीचें रक्त दाट, तंतुयुक्त आणि बुळबुळीत पडत असेल, आणि गुद बुळबुळीत दडस होत असेल, तर कफाचा संबंध आहे असें समजावें. पित्ताचा संबंध असला तर त्याचीं लक्षणें रक्तार्शासारखीं असतात.

**उपचारः**—१-निंगुडी, अश्वगंध, रिंगणी व पिंपळी समभाग घेऊन एकत्र करून त्यांची धुरी द्यावी. २-लोणी व तीळ, किंवा नागकेशर, लोणी व साखर, अथवा दह्याची निवळी, ह्यांचें सेवन करावें ३-चिंचेच्या खपल्यांचें म्हणजे बाहेरील

सालीचें वस्त्रगाळ चूर्ण करून तें ६ मासे सकाळ संध्याकाळ गाईच्या अदमुऱ्यांतून द्यावें. ४. अर्धे लिंबू घेऊन, त्यावर धोतऱ्याचे पाल्याचा रस ३।४ थेंब घालून, हरभऱ्याएवढें कुंकू घालून चोखावें, आणि घटके दीड घटकेनें दहींभात खावा, म्हणजे रक्त बंद होतें. ५-आघाड्याचें बीं, चित्रक, सुंठ, हरीतकी, नागरमोथे आणि किराईत हीं सर्व समभाग घेऊन त्यांचें चूर्ण करावें, व सर्व चूर्णाच्या समान गूळ घालावा आणि त्यापैकीं एक तोळा दररोज द्यावें. हें औषध जिरल्यावर ताकभात पथ्यास द्यावा. ६-कडुलिंबाचा व पिंपळाचा पाला एकत्र वाटून गुदाला लेप द्यावा.७वडाचीं पिकून गळलेलीं पानें जाळून त्यांची राख तेलांत खलून मोडांस लावावी. ८-आघाड्याचें बीं १॥-२ मासे घेऊन तें तांदळाचे धुणांत वाटून प्यावें. ९-कांद्याचा रस साखर व तूप घालून द्यावा. १०-इसबगोल रात्रीं पाण्यांत भिजत घालून सकाळीं कुवळून तें पाणी गाळून घेऊन त्यांत खडीसाखर घालून द्यावें.

**सर्व प्रकारचे मूळव्याधींवर उपचारः**—१-वानराची विष्टा पाण्यांत खलून मोडांस लेप करावा, म्हणजे मोड कुजून गळून पडतात. ७ दिवस हें औषध करावें. २-खारकेंतील बिया काढून त्यांत लवंगा भराव्या, आणि वर फडकें घालून वर शेण लावून, पुटपाक करून त्यापैकीं खारका दोन तोळे, आणि कापूर, सोरा व नवसागर प्रत्येकीं पाव तोळा, असे जिन्नस घेऊन, एकत्र करून, बारीक वाटून त्यांतील औषध २ मासे, लोणी ६ मासे, व खडी साखर ६ मासे, एकत्र करून दिवसांतून एक वेळ सकाळीं द्यावें. ७ दिवसांत गुण येतो. ३-सांतविणाच्या अंतरसालीची पूड करून बारीक वस्त्रांत (मलमल किंवा त्यासारिखें वस्त्र) गाळावी, आणि ती लोण्यांत खलून मोडांस लावावी, व वावडिंगाची धुरी २ घटका द्यावी; असें केल्यानें मोड गळून पडतात. आग वगैरे कांहीं होत नाहीं. ४-पपयाच्या फळांचा चीक लावावा म्हणजे मोड जळून जातील, किंवा गळून पडतील. कुमारिआसव द्यावें (यादी नंबर १७८ पहा). उशीरासव द्यावें (यादी नंबर १७७ पहा). ५—सुरण वाळवून चूर्ण करून तें बत्तीस भाग, चित्रक सोळा भाग, सुंठ चार भाग, आणि मिरीं दोन भाग, घेऊन सर्व औषधांचें वस्त्रगाळ चूर्ण करून त्यांत गूळ, साऱ्या औषधांचे दुप्पट घालून, प्रत्येक वेळेस तोळा दीडतोळा द्यावें. ६—गूळ १ तोळा, तूप १ तोळा, आणि म्हाक्याचा रस एक तोळा, प्रत्येक वेळेस घेऊन एकत्र करून ७ दिवस द्यावें. ७—बिबवे व हरडेदळ समभाग घेऊन, त्यांचे चूर्ण करून, त्यांत चूर्णाइतका गूळ घालावा, आणि प्रत्येक वेळेस एक तोळा खावें. सोरा व रसकापूर यांचा लोण्यांत खल करून मोडांस लेप द्यावा. शेवग्याचे मुळ्यांच्या रसांत सोमल उगाळून लेप द्यावा, परंतु यापासून मोडांची बरीच आग होईल. ८—खारकेची बी बारीक करून धुरी द्यावी. ९—ठणका लागल्यास शतावरीच्या मुळ्या दुधांत वाटून फडक्यावर गाळून तें ७ दिवस पिण्यास द्यावें. १०—काटेरिंगणी व इंद्रजव वस्त्रगाळ करून मोडांस धुरी द्यावी.

**साध्यासाध्य लक्षणः**—बाहेरल्या वळीवर झालेले, एक दोषोत्थण, आणि ज्यांस एक वर्ष लोटलें नाहीं, असे मोड सुखसाध्य समजावे. दोन दोषांपासून झालेले, व दुसऱ्या वळीवर असणारे, आणि ज्यांस एक वर्ष लोटलें आहे, असे कष्टसाध्य समजावे. सहज (जन्माबरोबर झालेले), त्रिदोषज, आणि जे आंतल्या वळीवर होतात, ते असाध्य समजावे. असाध्य मूळव्याध जरी असली तरी चांगल्या तजविजीनें राहून अग्नि प्रदीप्त असला तर ती शांत होते.

**पथ्यः**—दूध, भात, तूप, कुळीथ, सुरण, पडवळ, गुळवेल, लसूण, सुंठ, हरीतकी, चाकवत, पादेलोण, बिबवे, ताक, अडुळसा, लोणी, आंवळे व अग्नि प्रदीप्त करणारें अन्न व पान, इ.

**अपथ्यः**—दहीं, पीठ, उडीद, पावटे, पांढरा भोपळा, पिकलेला आंबा, संपूर्ण विष्टंभकारक व जड पदार्थ, वमन, मलमूत्रादिकांचा अवरोध, स्त्रीसंग, उकिडवें बसणें, जागरण, बाजरी, इ०.

**विशेष सूचनाः**—मूळव्याधीचा विकार होण्यास मुख्य कारण उष्णता होय. याकरितां तिखट खाणें बंद करावें. निदान अगदीं कमी प्रमाणानें तरी खावें. इतर उष्ण पदार्थहि अगदीं कमी खावे. गुदद्वारांतून मलशुद्धीचे वेळेस रक्त पडूं लागलें ह्मणजे तो मूळव्याधीचा बहुधा प्रारंभच असें समजावें. तसें दिसतांच उपचार करावे. ते केले नाहींत तर पुढें मोड येऊन फार इजा सोसावी लागते. या विकारास दररोज सकाळीं १–२ तोळे नुसतें तूप खाल्ल्यानें बराच उपयोग होतो. जेवणांतहि तुपाचें मान जास्त ठेवावें, व दररोज मलशुद्धि होईल, अशी व्यवस्था ठेवावी.

## अस्थिभंग ( हाड मोडणें, तुटणें किंवा निखळणें )

शरिरास अकस्मात धक्का लागल्यानें, कमजास्ती मार बसल्यानें किंवा घसरून पडल्यानें किंवा अन्य आकस्मिक कारणानें अस्थिभंग होतो. हाड मोडलें आहे किंवा नाहीं हें समजण्याचीं सामान्य चिन्हें १–दुखावा होऊन सूज चढते. २. मोडलेल्या अवयवाच्या आकारांत फरक होतो, व दुसऱ्या अवयवाशीं ताडून पाहतां समजतो. ३. मोठी खूण अशी आहे कीं मोडलेल्या ठिकाणीं हाड हालतें. अवयवास बरोबर धरून हालवून पाहिला असतां कटकट असा आवाज होतो.

**उपायः**—हाड मोडलें किंवा निखळलें आहे, हें एखादे चांगले वैद्यास किंवा डाक्टरास दाखवून त्याजकडून उपाय करवावे. निखळलें असल्यास सांधा नीट बसवून किंवा मोडलें असल्यास नीट सरळ करून पट्टा बांधावा.

**उपचारः**—१–एखाद्या कारणानें शरिराचें हाड मोडलें अगर दुखावलें तर त्यावर पहिल्यानें थंड पाणी बरेच वेळां शिंपून हळुहळु थोपटावें, आणि मग तांबडी माती पाण्यांत कालवून लेप द्यावा. २–सांबरशिंगाची साल ठेंचून दुखावलेल्या हाडावर

३ दिवस बांधावी. हें औषध अति उत्तमपैकीं आहे. ३—शंभर वेळां थंड पाण्यानें धुतलेलें तूप व तांदळांचें पीठ एकत्र करून तें मळून वर बांधावें. ४—बाभळीच्या सालीचें १ तोळा चूर्ण मधाशीं द्यावें. ५-पिठीसाखर व हळद खाण्यास द्यावी. ६—यादी नंबर १७३ चें तेल लावावें.

**पथ्य**:—गहूं, तांदूळ, मूग, तूप, दूध, लसूण, शेवगा, नागली (नाचणें), तुरी, इत्यादि.

**अपथ्य**:—मीठ, तिखट, तेल, आंबट, ऊन, मैथून, संपूर्ण वातूळ पदार्थ, इत्यादि.

## अंडवृद्धि (वृषण विकार).

**उत्पत्तिः**—दूषित झालेला खालीं जाणारा व सूज आणि शूल उत्पन्न करणारा वायु, कुक्षीमध्यें शिरत असतां आडसंधीतून अंडांत येऊन त्याची बाठ आणि पिशवी यांच्या वाहणाऱ्या नाडीस दुष्ट करून दोहोंकडची किंवा एका बाजूची वृद्धि करितो, त्या विकारास अंडवृद्धि किंवा अंतर्गळ असें ह्मणतात. त्याचे सात प्रकार आहेत त्यांपैकीं खालीं कांहीं सांगतों.

वृषणाची वृद्धि ही निरनिराळ्या खालीं लिहिलेल्या रोगांमुळें होते. १ वृषणाचे दाहामुळें, २ वृषणांत पाणी भरल्यामुळें, ३ रक्तसंचय जाहल्यामुळें ४ नाडी अथवा शीर फुगल्यानें, ५ वृषणांत गांठ झाल्यानें, ६ वृषणांत अर्बुद झालें असतां अथवा त्वचा जाड झाल्यानें, किंवा ७ पिशवींत अंतरगळ उतरला असतां वृषणाचा आकार वाढतो. वातज-लक्षण वायूनें भरलेली पिशवी जशी हातास लागते तसा हा लागतो व कारणावांचून दुखूं लागतो.

**उपचार**:—आल्याचा रस मध घालून घ्यावा. २ दूध आणि एरंडेल एकत्र करून महिना दोन महिने घ्यावें.

**२ पित्तज आणि रक्तजः**—काळ्या फोडानें व्याप्त व ज्यांत पित्ताचीं लक्षणें आहेत, तो पित्ताचा व रक्ताचा समजावा. **उपचार**—वड, पिंपळ, उंबर, पायरी, नांदरुखी, आणि वेत यांच्या सालींचा काढा घ्यावा. पित्तशामक उपचार करावे.

**रक्तजवृद्धीवर**:—जळवा लावून रक्त काढावें.

**३ मेदजः**—कफवृद्धीसारखा मृदु व पिंवळा आणि वाटोळा असतो तो.

**उपचारः**—दारूहळदीचा काढा गोमूत्र घालून घ्यावा. मेद वाढलेल्या जाग्यावर वाफारा देऊन निर्गुडीचे पाळांचा लेप द्यावा, किंवा याच झाडाचा पाला बारीक वाटून ऊन करून बांधावा.

**४ अंत्रवृद्धिः**—दूषित झालेला वायु लहान आंतड्याचा एक भाग घेऊन स्वस्थानापासून जेव्हां खालीं येतो तेव्हां गांठीसारिखी सूज उत्पन्न होते तो. यावर खालीं लिहिलेले सर्व प्रकारचे अंडवृद्धींवर उपचार सांगितले आहेत ते करावे.

**सर्व प्रकारचे अंडवृद्धींवर उपचारः**—१--कळीचा भिजलेला चुना १ तोळा व डंची तंबाखू २ तोळे घेऊन, तंबाखू बारीक करून चुन्यांत खलून लेप द्यावा, आणि वर विड्याचें पान लावून पट्टा चांगला बांधावा. कदाचित् वांति होईल. फार वांति झाल्यास लेप धुऊन टाकावा. २--सुंठ रक्तबोळ व काजूची बी पाण्यांत उगाळून त्यावर लेप द्यावा, आणि वर कागदाची पट्टी बसवावी व वर घट्ट लंगोटी नेसावी. ३--वेखंड आणि शिरस वाटून त्याचा लेप द्यावा. ४- गोमूत्र आणि एरंडेल यांतून पारा आणि गंधक यांची कज्जली द्यावी. ५--पायाच्या आंगठ्यास मधोमध त्वचेचा भेद होईपर्यंत डाग द्यावा. ( उजवीकडे वृद्धि असेल तर डावेकडील आंगठ्यास, व डावेकडे वृद्धि असेल तर उजवेकडील आंगठ्यास. ) ६--तंबाकूचें पान पाण्यांत भिजवून त्यावर शिलारस घालून त्याची पट्टी द्यावी. ७ चिकण्याचे काढ्यांतून एरंडेल द्यावें. ८—पिंपळी जिरें कोष्टकोळिंजन बोर आणि वाळलेलें शेण हे जिन्नस कांजींत वाटून लेप द्यावा. ९—गजग्याचा पाला मनुष्याचे मूत्रांत वाटून लेप द्यावा. १०--यादी नंबर २२५ चें औषध लावावें. " ११--खुरचाफा (पांढरी फुलें असलेला ) अगदीं हातभर शेवटचा कोवळा अंकूर घेऊन तो चांगला बारीक चिरून पाणी घातल्याशिवाय शिजवावा, व आंतील पाणी संपल्यावर गरम गरम वृषणांवर बांधावा, अगर पोटळी घेऊन शेकवा. १२--बेंबीचे खालीं सुमारें चार आंगळावर पोटाशीं समांतर दोन आंगळें रुंदीचा बिबा घालावा व वर कळीचा चुना जाडसर सारवावा.

**पथ्यः**—रेचक, लेप, स्वेद, तांबड्या साळी, एरंडेल, गोमूत्र, शेवग्याच्या शेंगा, पडवळ, तांदुळ, हिरडा, लसूण, मद्य, ऊनपाणी, ताक, मडक्यांतील तूप, इ.

**अपथ्यः**—दहीं, उडीद, पिष्टान्न, जड पदार्थ, शुक्रवेगाचा रोध, वेगानें मारणें, धाव घालणें, पाठीवर बसून जाणें, व्यायाम, उपवास, इ.

## अंग बाहेर येणें.

मलद्वाराचे आंतील भाग बाहेर येतो, त्यास अंग बाहेर येणें असें म्हणतात. हा विकार उष्णतेपासून, आमांशापासून अगर अशक्ततेपासून होतो. अंग तेल लावून हाताच्या दोन्ही अंगठ्यानीं मलद्वारांत दाबून बसवावें व एक लहान गुदद्वारावर गादी ठेवून लंगोटी घालावी. यास उपचार--१--मदनीचा पाला दह्यांत वाटून लेप लावावा. २-- दररोज सकाळीं १--१॥ तोळा तूप खावें. ३--पित्तशामक पदार्थ खावे. ४—उपरसाळीचें पाळ दुधांत उगाळून द्यावें. ५--प्रवाळ भस्म द्यावें. ( यादी नंबर ११२ पहा. )

**पथ्यः**—तूप, दूध, भात, गव्हांची पोळी, सांजा, तुरीचे डाळीचें किंवा मुगाचे डाळीचें वरण, भाकरी, पडवळ, पांढरा भोपळा, साखर इ०

**अपथ्यः**—नारळ, गूळ, तिखट, तेल, दहीं, संपूर्ण उष्ण व वातकर पदार्थ, जागरण, उन्हांत फिरणें इ०.

**वि० सू०**—हा विकार ज्यास असेल त्यांनीं तूप व दूध यांचें जास्त सवन करावें ( सोसेल त्या मानानें. )

## आमवात.

वातादि दोषांचा प्रकोप होऊन जठराग्नि मंद झाला असतां, अन्नाचा रस अपक्क राहतो त्यास आम म्हणतात. तो आम वायूनें प्रेरित होऊन कफाच्या आमाशयादि स्थानाप्रत जातो, आणि त्या कफानें दूषित होऊन तो शिरांचे द्वारा सर्व शरीरांत व्याप्त होऊन, त्यापासून मस्तक व संपूर्ण गात्रें यांस पीडा होते, व कफ आणि वायु एका काळीं कंबरेचे संधीत जाऊन, ते संपूर्ण गात्रें स्तब्ध करितात; त्या व्याधीस आमवात म्हणतात.

**सामान्य लक्षण व प्रकार**—अंग दुखणें, ज्वर, अरोचक तहान, अंगाला जडपणा, आहाराचा पाक न होणें, सर्वांगास सुजेनें धोंड्यासारखा जडपणा, इत्यादि विकार होतात. हा विशेष वाढला असतां हातपाय मस्तक गुडघे आणि मांड्यां यांच्या संधीमध्यें वेदनायुक्त सूज उत्पन्न करितो, आणि ज्या ज्या ठिकाणीं तो आम जातो त्या त्या ठिकाणीं विंचवानें नांगी मारल्यासारखी वेदना होते व अग्नीमांद्य, तोंडाला पाणी सुटणें, दाह, शूल, ओकारी, ऊर दुखणें, मलशुद्धि न होणें इत्यादि विकार होतात. याचे प्रकार ४ आहेत. १. वातजन्य आमवात. ह्यांत विशेष शूल असतो. २. पित्तजन्य आमवात. यांत विशेष दाह असतो. ३. कफजन्य आमवात. यांत निश्चळपणा, जडपणा व कंडू हे विकार फार असतात. ४. सन्निपातजन्य आमवात. यांत वात पित्त आणि कफ यांचीं वरील लक्षणें होतात.

**सर्व प्रकारचे आमवायूंवर उपचारः**—१—सुंठीचे काढ्यांत समभाग एरंडेल घालून द्यावें. एरंडेल हें आमवात घालविण्यास अप्रतिम आहे. २—यादी नंबर ६२ किंवा ६३चा काढा द्यावा. हे काढे या विकारावर अति उत्तम आहेत. योगराज गुग्गुळ द्यावा ( यादी नंबर १५० पहा ) ३—दशमुळ्यांच्या काढ्यांत एरंडेल घालून तो द्यावा. ( यादी नंबर १६ पहा. ) ४— यादी नंबर ११२ चें चूर्ण द्यावें.

**पथ्यः**—लंघन, जुन्या साळी, कुळीथ, पडवळ, ऊन पाणी, शेवगा, वांगें इ०

**अपथ्यः**—दहीं, गूळ, उडीद, जागरण, दूध इ०

## आम्लपित्त.

शिळें, आंबलेलें, दाह करणारें, आंबट आणि पित्त वाढविणारें, असें अन्न किंवा पान सेवन केल्यानें, वर्षादिऋतूंच्या ठायीं स्वकारणांनीं सांचलेलें पित्त नासतें त्यास आम्लपित्त ह्मणतात.

**लक्षणः**—अन्न न पचणें, आयासावांचून श्रम, मळमळ, कडू व आंबट ढेकर, जळती लागणें, अन्नद्वेष,इत्यादि लक्षणें होऊन, तें पित्त, तहान, दाह, मुर्च्छा, भ्रम यांना उत्पन्न करितें; व हिरवें, पिवळें, काळें, तांबडें असें नानावर्ण, दुर्गंधयुक्त, तोंडावाटें व गुदावाटें बाहेर निघतें. अधोगत झालें असतां तृषा, दाह, मूर्च्छा, घेरी, मळमळ, अग्निमांद्य इत्यादि विकार होऊन, गुदावाटें काळें, तांबडें व दुर्गंधयुक्त असें पडतें. उर्ध्वगत झालें असतां हिरवें, पिवळें, निळें, काळें, तांबूस, लाल अत्यंत आंबट मांस धुतलेल्या पाण्यासारखें, अत्यंत बुळबुळीत, स्वच्छ, कफमिश्रित, खारट, तुरट वगैरे रसयुक्त असें तोंडावाटें पडतें. कधीं कधीं कडू, आंबट अशी ओकारी होते, व ढेकरही येतो, व गळा कुशी आणि ऊरहि जळजळतात.

आम्लपित्त हा रोग नवा असला, तर यत्नानें साध्य होतो. बहुत दिवसांचा असला तर याप्य होतो. पथ्यानें वागलें तर फार दिवसांचा असला तरी कष्टसाध्य होतो. एकंदरींत पथ्यानें वागलें तर हा रोग कमी कमी होऊन नाहींसा होईल. याला उत्तम पथ्य म्हटलें तर दूधभात व पित्तशामक पदार्थ खाणें हेंच होय. दिवसांतून शेर अदशेर तरी दूध पोटांत जाई असें करावें; व पित्तनाशक पदार्थ खावे. असें केल्यानें याची इजा होणार नाहीं.

**उपचारः**—१—उर्ध्व आम्लपित्ताला वांति व अधोगताला रेचक द्यावें. २—यादी नंबर ६४ चा काढा द्यावा. ३ -कडू पडवळ, कडूनिंब, व गेळफळाचा मगज यांचा काढा सैंधव घालून दिला असतां वांति होऊन पित्त पडेल. ४—पिंपळाचीं फळें १--१॥ तोळा बारीक वाटून मधांतून द्यावीं. ५--त्रिफळेचा काढा करून त्यांत ६ मासे निशोत्तराचें चूर्ण व १--१॥ मासा मध घालून द्यावा, म्हणजे रेच होऊन पित्त पडेल. ६—द्राक्षें आणि बाळहरडे समभाग, व त्याचे दुप्पट खडीसाखर घेऊन एकत्र वाटून, त्यांतील १--१॥ तोळा औषध दररोज रात्रीं निजते वेळीं द्यावें. ७--कडूपडवळ, अडुळसा, गुळवेल, पित्तपापडा, आणि म्हाका यांचा काढा मध घालून द्यावा. ८—कंवठाचा गीर १ भाग, आणि आल्याचा रस २ भाग, यांचा एकत्र खल करून बोराच्या आठोळीप्रमाणें गोळ्या कराव्या, आणि रोज एक गोळी नारळाच्या पाण्यांतून किंवा आल्याचा रस आणि खडीसाखर यांतून द्यावी. ९--सूतशेखर द्यावा. ( यादी नंबर १४४ पहा. ) १०—दररोज निजते वेळेस ६।७ तोळे दूध, व पैसा भार खडीसाखर एकत्र करून त्यांत तुपांत तळलेलीं ३।४ मिऱ्यें उगाळून द्यावीं. ११—"पित्तविकार" या प्रकरणांत पित्तशमनास सांगितलेले उपाय करावे. १२--यादी नंबर २१६ चें औषध द्यावें. हें फार चांगल्यापैकीं आहे. १३--कोहाळेपाक द्यावा. ( यादी नंबर १६३ पहा. )

**पथ्यः**—जुन्या साळी, यव, मूग, गहूं, साखर, गाईचें दूध, द्राक्षें, बदाम,

तापवून निवालेलें पाणी, चाकवत, पडवळ, डाळिंब, केळें, तूप, खजूर, कंवट इ.

**अपथ्यः**—वांतीचा वेग धारण, तेल, तिखट, आंबट, हुलगे, तीळ, शेळीचें दूध, मठ, दहीं, चवळ्या, पावटे, उडीद, जागरण इ.

## इसब ( खरजवा ).

त्वचेवर पाण्यानें भरलेला बारीक बारीक पुरळ ( पुटकळ्या ) उठतो. त्यास फार खाज सुटते; व खाजविल्यावर त्यांतून चिकट पाणी निघतें, आणि त्या पुटकळ्या फुटल्यावर त्यांतील लस सुकली ह्मणजे खपल्या धरतात; व त्या खपल्यांतून थोडी थोडी लस वाहते त्या रोगास इसब ह्मणतात. हा होण्याचीं कारणें:—वाईट प्रकारचें अन्न खाणें किंवा पचन व्यापारांत बिघाड होणें, रक्तदोष, मलीनपणा, इत्यादि.

**उपचारः**—१–प्रथम जळवा लावून नासकें रक्त काढावें, नंतर चार दिवसांनीं त्या जाग्यावर लोणी लावून मांजराकडून चाटवावें. २–कबाबचिनी, गेरू, कोष्ट, मोरचूत, आणि गोपिचंदन, समभाग घेऊन वस्त्रगाळ पूड करून पाण्यांत कालवून लावावी ३--राळ १ तोळा, गंधक १ तोळा, आणि मोरचूत २ मासे घेऊन, तुपांत खल करून तें लावावें. ४–मोरचूत आणि कळीचा चुना समभाग घेऊन, एकत्र करून लेप द्यावा. ५–कंवठीचा पाला आणि कडू जिरें एकत्र वाटून लेप द्यावा. ६--गाजरें किसून शिजवून कढत कढत वर बांधावीं. पहिले दिवशीं पाय सुजतो, परंतु पुढें खपल्या पडून पाय बरा होतो. ७ जिरें, आंबेहळद, मिरें, शंखजिरें, हळद, गंधक, शेंदूर, मनशीळ व पारा हीं सर्व औषधें एक एक तोळा, घेऊन, पहिल्यानें पाऱ्याची व गंधकाची कज्जली करून बाकीचीं औषधें वस्त्रगाळ करावीं; व त्यांत गंधकाची कज्जली मिश्र करून तुपांत खलून लावावी.

**सूचनाः**—इसबाची जागा रोज साबु लावून स्वच्छ धुऊन पुसून मग औषध लावावें.

## उचकी.

**उपचारः**—१–मेथ्या चिलमींत घालून ओढाव्या. धुर येईल तो पोटांत घ्यावा. २--सालीसकट वेलदोडे आणि लवंगा समभाग घेऊन, विस्तवावर भाजून चूर्ण करून प्रत्येक वेळेस सुमारें १ मासा चूर्ण मधांतून घ्यावें. ३--उडदाचें पीठ चिलमींत घालून ओढावें, धूर पोटांत घ्यावा. ४--कापशीच्या पाल्याचा रस मधांतून घ्यावा. ५--तूप पातळ करून थोडथोडें द्यावें. ६--उडीद, हळद आणि ताग, समभाग घेऊन थोडें कुटून चिलमींत घालून ओढावें. धूर पोटांत घ्यावा. ७--महाळुंगाचा रस मध घालून द्यावा. ८--यादी नंबर १९६ चें औषध करावें.

## उदर ( जलोदर )

**उदराचें कारणः**—जलोदराचीं कारणें पुष्कळ आहेत. परंतु त्याचे मुख्य दोन भाग आहेत. एक शरिरांत जे स्वाभाविक रुधिराभिसरण होतें त्यास कोणत्याही तऱ्हेनें अडचण जाहल्यानें जलोदर होतें. दुसरें रक्तांत बिघाड झाल्यानें किंवा इतर विषारी व दूषित पदार्थांचें मिश्रण झाल्यानें जलोदर होतें. जलोदर होणें ह्मणजे रक्ताचा जास्त संचय होऊन रक्तांतील पाणी शरिराच्या भागांत पाझरतें. उपाय करितांना, १ पांडुरोग, २ रक्ताशयाचे रोग, ३ यकृताचे रोग, व ४ मूत्राशयाचे रोग हीं जलोदराचीं मुख्य चार कारणें लक्षांत ठेविलीं पाहिजेत. पांडुरोगापासून जलोदर असल्यास प्रथम पायावर सूज येते व नंतर जांघ, शिश्न यांवर येऊन पोट मोठें होतें. २ रक्ताशयापासून असल्यास छातींत धडधड, विशेष चालल्यानें श्वास लागणें, छाती उडणें, व रोगी धापा टाकितो. व पायांवर व पोटावर सूज येते. ३ यकृताचे विकारामुळें असल्यास प्रथम पोट घागरीसारखें मोठें होतें, व शरीर वाळून गेल्यासारखें दिसतें. ४ मूत्र पिंडाच्या रोगांत हात, पाय, चेहरा आणि पोट इतके सुजतात कीं, रोग्यास उठण्या बसण्यास अडचण पडते, लघवीस फार वेळां जावें लागतें, लघवींतून रक्त पडतें व ती लाल अथवा काळ्या रंगाची असते.

**सामान्य स्वरूपः**—आध्मान ( पोट फुगणें ), चालण्यास शक्ति नसणें, दुर्बलता, अग्निमांद्य, सूज, अंगग्लानि, वायूचा व मलाचा अवष्टंभ, दाह, तंद्रा, इत्यादि.

**याचे प्रकार ८ आहेतः**—जन्तोदर, पित्तोदर, कफोदर, सन्निपातोदर, प्लीहोदर, बद्धोदर, क्षतोदर, आणि जलोदर.

सर्व प्रकारचीं उदरें जन्मतः प्रायः अत्यंत कष्टसाध्य असतात. मोठ्या प्रयत्नानें क्वचित एखादा रोगी यांतून बरा होतो.

**सर्व प्रकारचे उदरांवर उपचारः**—१ चवक, चित्रक, सुंठ, देवदार, आणि बाळहरडे, यांचा काढा करून त्यांत निशोत्तराचें चूर्ण किंवा गोमूत्र मिळवून द्यावा ह्मणजे रेच होऊन रोग बरा होईल. सर्व उदरांवर रेचक हेंच उत्तम औषध आहे. २—हत्तीच्या लेंड्या पिळून त्यांतील पाणी २।३ तोळे घेऊन, त्यांत बडिशेप, जिरें, साखर आणि लवंगा समभाग घेऊन, एकत्र करून त्यांचें वस्त्रगाळ चूर्ण अर्धा तोळा घालून द्यावें. ३--पळसाची बी काड्याहुऱ्याचे चिकांत वाटून मिऱ्याएवढी गोळी करून द्यावी; ह्मणजे ढाळ होतील व रोग बरा होईल. उतार तूपभात. यास पथ्य कुळयाचें काट आणि भात. ४--यादी नंबर ८६ चें चूर्ण द्यावें. ५--खडसांबळीचें पाळ गोमूत्रांत उगाळून ७ दिवस द्यावें. प्रथम वातुळ वर्ज ६--वज्रक्षार द्यावा. ( यादी नंबर १३९ पहा ). ७--कुमारीआसव द्यावें. ( यादी नंबर १७८ पहा ).

८--चित्रकमूळ आणि देवदार यांचा कल्क दुधाशीं द्यावा.

**पथ्यः**—रेच; लंघन; कुळथी; ताक; लसूण; तांबडे भात; पडवळ; पुनर्नवा चित्रक; शेवगा; दूध; इत्यादि.

**अपथ्यः**—धूम्रपान, अति पाणी पिणें, वांति, प्रवास, दिवसाची निद्रा, सर्व प्रकारच्या पालेभाज्या, तीळ, जडान्न, इत्यादि.

## उपदंश.

अतिसंगापासून किंवा दूषित जननेंद्रियापासून शरिरांत एक प्रकारचें विष उत्पन्न होऊन त्यापासून शरिरावर जे परिणाम घडतात, त्यास उपदंश ह्मणजे गरमी असें ह्मणतात. यांतच परमा, चट्टे, बद यांचाहि समावेश होतो.

**उत्पत्तिः**—एकाच स्त्रीशीं अनेक पुरुषांचा संग झाला ह्मणजे पुरुषाचें रेत योनीच्या अंतर त्वचेंत जमून त्यापासून लस वाहूं लागते. नंतर ती लस एकाची दुसऱ्यास, दुसऱ्याची तिसऱ्यास, अशा परंपरेनें लागून त्या लसेपासून जननेंद्रियावर फोड किंवा चट्टा पडतो. याशिवायहि अति संगानें क्षोभ होऊन त्यापासूनहि चट्टा उत्पन्न होतो, परंतु या क्षोभापासून जे चट्टे होतात त्यांचे योगानें बहुधा अनेक प्रकारचे व्याधि उत्पन्न होत नाहींत. केव्हां केव्हां बद मात्र होतात.

वर लिहिलेल्या कारणांवांचूनहि अनेक प्रकारांनीं उपदंशाची उत्पत्ति होते. एकाच्या जननेंद्रियावरील चट्टा दुसऱ्याच्या जननेंद्रियास घासला गेल्यानें, अथवा दुसरी कोणतीहि जागा घांसली गेल्यानें, किंवा त्याची लस कोणत्याहि प्रकारानें शरिरांत शिरल्यानें, रोगाचें विष दुसऱ्याचे शरिरांत जाऊन, त्यास हा रोग उत्पन्न होतो. किंवा एकाच स्त्रीशीं थोड्या अवकाशांत पुष्कळ पुरुषांचा व्यवहार होऊन, तिचें इंद्रिय अस्वच्छ असतांच वारंवार आणखी हा व्यवहार घडला असेल तर त्यामुळें, किंवा जननेंद्रिय न धुतल्यानें, किंवा संभोगानंतर अति उष्ण पदार्थांचे सेवनानें, किंवा रजस्वला, बाळंतीण किंवा रोगी अशा स्त्रीशीं संग केल्यानें, शक्तीपेक्षां जास्त रति केल्यानें, किंवा इंद्रियाचे ठिकाणीं कठीणपणा येण्याकरितां किंवा जास्ती वेळ रतिसुख मिळण्याकरितां इंद्रियांस अनेक प्रकारचे लेप केल्यानें हा विकार उत्पन्न होतो. हा रोग स्पर्शसंचारीहि आहे. त्याची गतीहि फार त्वरित असते. उपदंशपीडित मनुष्याचें उच्छिष्ट भक्षण केल्यानें, किंवा त्याचें नेसलेलें वस्त्र परिधान केल्यानें, किंवा अशा मनुष्यानें लघवी केली असेल, त्या ठिकाणीं लघवी केल्यानें व अशाच स्पर्श संचारी अनेक कारणानीं हा रोग उत्पन्न होतो. मग अशा पुरुषांशीं स्त्रीचा, किंवा स्त्रीशीं पुरुषाचा, संबंध झाल्यावर रोग उत्पन्न होईल, यांत आश्चर्य कोणतें ?

**उपद्रव आणि परिणामः**—जननेंद्रियावर चट्टा पडणें, मांडीच्या वरच्या

बाजूस जांघेत गांठ उत्पन्न होणें ( यास बद ह्मणतात. ) शिश्न गळून पडणें किंवा सडणें अगर त्यांत क्षतें पडणें, नाक सडणें, सर्व अंगावर चट्टे पडणें; मुख विद्रूप होणें, टाळूस भोकें पडून त्यांतून पू वगैरे येणें व त्यामुळें तोंडास फार दुर्गंधि येणें, घशांत क्षतें पडणें, वृषण सुजणें, अंगावर भेंगें पडणें, व अनेक प्रकारचे पुरळ किंवा चकदणें उठणें, इत्यादि.

वर लिहिलेल्या प्रकारचे उपद्रव होतात. त्यावरून विचार केला ह्मणजे, या रोगाचा परिणाम किती भयंकर आहे, याची सहज कल्पना होईल. हा विकार एकदां अंगांत मुरला ह्मणजे पुढें यापासून अनेक तऱ्हेचे रोगहि उत्पन्न होतात. हें विष एकदां अंगांत शिरलें, ह्मणजे कितीहि उपाय केले, तरी त्याचा समूळ नाश होण्याची मोठी पंचाईत पडते; इतकेंच नव्हे, तर तें समूळ नाहींसें होत नाहीं, असें ह्मटलें तरी चालेल. हा विकार एकदां जडला आणि तो मनुष्य पुढें जरी औषधोपचारानें बरा झाला, तरी त्यास थोडा क्षोभकपणा प्राप्त झाला, ह्मणजे पुन्हां प्रकृति बिघडण्याचा फारच संभव असतो. याकरितां या विकारापासून प्रकृति सुधारली असें जरी वाटलें, तरी खाणें पिणें व इतर वागणूक यांचा व्यवस्थितपणा ठेविला पाहिजे.

हा रोग परंपरेनें पुढील संततीसही घातक होतो. ज्यास हा विकार आहे त्यास कधीं कधीं संतति होत नाहीं. झाली तर त्या मुलाचे अंगावर केव्हां उपदंशासारखे विकार ( चकदणें, व्रण ) उठतात, कितीएक प्रसंगीं तर अल्पकाळांतच तीं मुलें मरण पावतात, किंवा त्यांस पुढें गंडमाळा, कफ, क्षय, वगैरे अनेक व्याधि उत्पन्न होतात. उपदंश असलेल्या मनुष्याचे संततीस रोग उत्पन्न होतात इतकेंच नव्हे, तर परंपरेनें पुढील संततीसहि हे विकार जडतात.

वरील विवेचनावरून हा रोग किती भयंकर आहे हें समजेल; व हा रोग भयंकर आहे हें पुष्कळांस माहितहि आहे, परंतु असें असतांहि या रोगाच्या सपाट्यांत अनेक मनुष्यें सांपडतात याचें आश्चर्य नव्हे काय ?

असो. याबद्दल विशेष लिहित नाहीं, परंतु एवढें लिहितों कीं, परस्त्रीचा अभिलाष करण्याचें मनांत आणूं नये, कदाचित एकादे प्रसंगीं चुकून गोष्ट घडली तर पुन्हां तरी सावध रहावें, कदाचित उपदंश विकार जडला, तर औषध घेऊन प्रकृति सुधारावी, तसें न केलें तर पुष्कळ दुःख होईल.

**उपदंशाच्या अवस्थाः**—उपदंशाचे संबंधानें पाहिलें तर त्याच्या तीन अवस्था मानितां येतील.

**पहिली अवस्थाः**—जननेंद्रियावर पुटकुळी किंवा चट्टा होणें अगर बद ( जांघेंत गांठ ) होणें. कातडी झाजरली असतां, किंवा त्या ठिकाणीं भेग पडली असतां दूषित जननेंद्रियाची लस लागून त्या ठिकाणीं व्रण ( चट्टा ) पडतो, किंवा

कातडी चांगली असली, तरी त्या ठिकाणीं दूषित जननेंद्रियाचें विष, लागून तेथें त्याचें शोषण होतें, मग त्या ठिकाणीं पुटकुळ्या उठून त्या फुटतात, मग तो चट्टा होतो. हे चट्टे संभोगानंतर ८।१० दिवसांचे आंतच बहुधा होतात. या चट्ट्यांचा पृष्ठभाग फार कठीण असून, त्याच्या कोरा कापल्यासारख्या असतात, व त्या चट्ट्यांतून पुवाचा स्राव होतो. चट्ट्याच्या जवळील गांठी थोडक्या सुजतात, व या अवस्थेंत थोडा ज्वरही समयीं येतो.

**दुसरी अवस्थाः**—उपदंशाचा विकार सर्व शरिरावर होणें—पहिल्या अवस्थेंत सांगितलेला विकार उत्पन्न झाला, आणि त्यास उपचार झाले नाहींत, तर तो विकार वाढून शरिरावर ताम्रवर्णाच्या पुटकुळ्या किंवा चकदणें उठणें, नेत्रांचा दाह होणें, संधींत दुखणें, ज्वर येणें वगैरे विकार होतात. या अवस्थेंत रक्तद्वारा दुसऱ्यास हा रोग होतो, व पुरुषाच्या संभोगानें स्त्रीस किंवा संततीसहि हा रोग होतो.

**तिसरी अवस्थाः**—यांत उपदंश विषाचें सर्व शरिरभर शोषण होतें. तोंडांत व नाकांत क्षतें पडून तीं पसरतात, टाळूला भोंक पडतें, नाक बसतें, हातपायाच्या नळ्यांचे अस्थि सुजतात व दुखतात, शरिरावर व्रण पडतात, जननेंद्रिय सडतें व कधीं कधीं त्यांत कृमि पडतात, व मज्जा आणि अस्थि यांस विकार होतो. वर लिहिलेल्या तीन अवस्थांपैकीं पहिल्या दोन अवस्थेंत रोग असतां स्पर्शानें वाढतो.

वातपित्तादिदोषानें याचे ५ भेद मानितात तेः—

१ **वातोपदंशः**—शिस्नावर फोड काळे त्यांस टोंचणी व फूट असतें तो.

२ **पित्तोपदंशः**—फोड पिंवळे येऊन त्यांतून फार पाणी वाहतें तो.

३ **रक्तोपदंशः**—मांसा सारखे तांबडे फोड येतात तो.

४ **कफोपदंशः**—पांढरे व मोठाले फोड येऊन कंडू सुटते व सूज येऊन दाट पू वाहतो तो.

५ **संन्निपातोपदंशः**—ज्यांत नानाप्रकारचे स्राव व वेदना होतात तो.

## उपदंशाचा विकार आहे किंवा काय याची परीक्षा.

मागें सांगितलेला चट्टा उत्पन्न झाल्यावर बदाच्या गांठीहि दुखूं लागल्या ह्मणजे खास समजावें कीं, हा चट्टा उपदंश विकारापासूनच आहे. याशिवाय, चट्टा उत्पन्न झाल्यावर कांहीं दिवसांनीं अंगावर ताम्रवर्णाच्या पुळया उठल्या, व त्याबरोबर गळ्यांत दुखूं लागलें ह्मणजे समजावें कीं, हा विकार उपदंशाचाच आहे. आणखी त्याची परीक्षा अशी आहे कीं, उपदंशापासूनच जर अंगावर पुळया किंवा त्वचेवर चट्टे किंवा क्षतें पडलीं असतील तर त्यांत बहुधा अंगास कंडू सुटणार नाहीं. उपदंशा-

शिवाय अन्य विकाराच्या पुळ्या व क्षतें असतील तर त्यांत बहुधा कंडू असावयाचीच. तसेंच शरिरावर व तोंडांत किंवा अन्य ठिकाणीं क्षतें पडलीं असतील, आणि तीं उपदंशापासून असतील तर त्यांपासून विशेष वेदना होणार नाहींत. अन्य कारणा-पासून असल्यास वेदना होतील हें मुख्यत्वेंकरून लक्षांत ठेवावें.

वरील गोष्टींचा विचार करून किंवा वैद्यलोकांस प्रकृति दाखवून कोणता विकार आहे हें ठरवावें; नाहीं तर पुढें समयीं भयंकर परिणाम होतो. ह्मणून रोगाचें खरें स्वरूप समजण्याकडे दुर्लक्ष होऊं देऊं नये.

## उपदंशाचा विकार असलेल्या स्त्रियांचीं लक्षणें.

तोंडावर पिंवळेपणाची छाया असून थोथली असणें, मुखावर निस्तेजपणा, डोळ्याच्या पापण्याखालीं किंचित् काळ्या रंगाची छाया दिसणें, तोंडावर काळे किंवा जांभळे डाग असणें, इत्यादि. याशिवाय मागें जे उपदंश विकार सांगितले आहेत ते पाहून अनुमान करावें.

## बाळउपदंश.

गरमीचा रोग संततीस लागतो व किती वर्षेपर्यंत उपदंश संततीस लागण्याचा संभव असतो तें सांगवत नाहीं. तथापि पूर्वीं उपदंश झाल्यानंतर वर्ष सहा महिने पर्यंत गर्भावर त्याचा परिणाम होण्याची जास्ती संधि राहते. मातापितरांस गरमी असेल तर त्यापासून मुलांसही गरमी होते. मूल जन्मल्यानंतर आईस उपदंश झाला तर पाजण्यानेंहि मुलांस उपदंश होतो. उपदंश झालेलें मूल निरोगी स्तन पिईल तर स्तनास उपदंश होण्याचा संभव आहे.

बाळउपदंश तीन प्रकारांनीं प्रकट होतो. १—गर्भावस्थेंत प्रकट होतो त्यामुळें कित्येक स्त्रियांचा गर्भपात होतो. २—जन्म झाल्यावर मुलाच्या अंगावर उपदंशाचीं चिन्हें दिसून येतात. ३—मूल जन्मल्यावर कांहीं चिन्हें नसलीं तरी थोडे आठवडे, महिने अथवा वर्षांनंतर उपदंश प्रकट होतो.

उपदंश असलेल्या आईबापांपासून झालेलें मूल जन्मतःच अशक्त, हातपाय गळलेले, मुरदाडासारखें असतें. त्वचेस सुरकुत्या पडलेल्या असतात. त्याचें नाक पडशासारखें वाजत असतें व नंतर ढुंगणावर आणि पायावर गरमीचे लाल चट्टे निघतात. तोंड येतें, ओंठावर क्षतें पडतात, अशा मुलांस दांत येतात, त्यापैकीं पुढचे दोन चार दांत चमत्कारिक असतात, ते बोंथट असतात, त्यांचेमध्यें फट असते व ते लौकर पडून जातात. जे कायम दांत येतात तेही तसे असतात व त्यांचेवर एक खळगा असतो.

**उपाय:**—पारा हें गरमीवर विशिष्ट औषध आहे हें, संततीस झालेल्या गरमीवर त्याचा परिणाम होतो, ह्यावरून स्पष्ट दिसून येतें. ज्या स्त्रीस गरमीमुळें गर्भपात होत असेल, तिचें पाऱ्यानें तोंड आणलें ह्मणजे गर्भाचे वार्धक्यास मुळींच हरकत येत नाहीं. शिवाय जें मूल जन्मेल त्यासदेखील गरमी होणार नाहीं. जें मूल जन्मल्यानंतर त्यास थोड्या दिवसांत गरमी दिसेल, त्या मुलाच्या आईस गरमीचें औषध द्यावें. अथवा मूल थोडें मोठें जाहलें असेल तर त्यास पाऱ्याचें मलम लावावें ह्मणजे गरमी नाहींशी होईल. मुलास चाक व पारा देतात अथवा लिंटवर पाऱ्याचें मलम चोपडून तें लिंट मुलाच्या पायावर अथवा पाठीवर बांधून ठेवावें, याप्रमाणें उपदंश नाहींसा होईपर्यंत करीत राहावें. उपदंश जाहलेल्या मुलास स्तन पाजण्याच्या ऐवजीं अलग दूध पाजून वाढवावें.

## सूचना.

उपदंश ह्मणजे गरमी, व तिच्याच चट्टे, बद, परमा ह्या अवस्था आहेत असें मागें सांगितलेंच आहे. आतां ह्या प्रत्येक प्रकाराबद्दल उपचार खालीं लिहिले आहेत. कोणतेहि प्रकारचे उपदंशावर उपचार करितांना खालील गोष्टींकडे अवश्य लक्ष पुरवावें.

१ औषध सुरू करण्यापूर्वी प्रथम रेचक ( दुधांतून एरंडेल ) द्यावें. आणि मग मूत्रजुलाब ( यादी नंबर २१८ पहा. ) द्यावा.

२ रोगाचें निर्मूळ झाल्याशिवाय औषध सोडूं नये.

३ चट्टे आणि बद या विकारांवर निरनिराळीं औषधें लावावयाचीं सांगितलीं आहेत. तीं लावून गरमीवर लिहिलेले औषधापैकीं प्रकृतीचें अनुमान करून योग्य वाटेल तें औषध पोटांत घ्यावें, व चट्टे रोज काढ्यानें धुवून (यादी नंबर ७९ अ पहा.) ते फडक्यानें पुसून टाकून कोरडे झाल्यावर त्यांस औषध लावावें.

४ आपली प्रकृति पाहून वाटेल तें औषध ठरवून सुरू करावें. ८।१० दिवसांनीं कांहीं गुण न वाटेल तर दुसरें औषध घ्यावें.

५ औषध लिहिलें आहे त्या ठिकाणीं पथ्य सांगितलें असल्यास असेल तसें करण्यास चुकूं नये. तेथें पथ्य सांगितलें नसल्यास या प्रकरणाचे अखेरीस पथ्यापथ्य सांगितलें आहे, त्याप्रमाणें करावें.

६ पुढें जीं औषधें सांगितलीं आहेत, त्यांत रसकापूर, पारा, गंधक वगैरे औषधांचा उपयोग करणें असेल, त्यांची शुद्धि केल्यावांचून करूं नये. कोणते औषधांची कशी शुद्धि करावयाची तें प्रकरण ६ यांत सांगितलें आहे.

## उपदंशावर उपचार.

१ यादी नंबर ८२—८३ हे काढे घ्यावे. हे रक्तशुद्धीवर उत्तम आहेत. अंगांत मुरलेले गरमी, किंवा गरमीपासून रक्तपित्तीसारखा विकार केव्हां केव्हां

होतो, तो या काढ्यांपासून मोडतो. उपदंशावर कोणतेंहि औषध सुरू असतां दिवसांतून एकदां तरी यांपैकीं एकादा काढा घेतला तर चांगला उपयोग होतो. अंगांत मुरलेल्या गरमीवर तर हे काढे उत्तम आहेत हें लक्षांत ठेवावें. नवीन उपदंशाचा विकार जडला तर अन्य औषध घेतलेंच पाहिजे. अंगांत मुरलेल्या गरमीवर वांकेरीचें भातें हेंहि उत्तम औषध आहे. ( यादी नंबर २२१ पहा ). गंधक रसायन द्यावें. ( यादी नंबर १२४ पहा ).

२—लवंगा १ तोळा, जायफळ १ तोळा, जायपत्री अर्धा तोळा, कस्तुरी २ गुंजा, आणि रसकापूर २ गुंजा, असे जिन्नस घ्यावे. नंतर रुईचें पाळ पाऊण तोळा घेऊन, थंड पाण्यांत उगाळून, त्यांत रसकापुराचा चांगला खल करावा. ( त्यास वास न येईल इतका ) नंतर त्यांत बाकीचे जिन्नस बारीक कुटून मिळवून जरूर लागल्यास थंड पाणी थोडें घालून सर्वांचा एके ठिकाणीं चांगला खल करून १४ गोळ्या बांधाव्या, आणि दररोज सकाळीं १ व सायंकाळीं १ गोळी खडीसाखरेचे पाकांतून घ्यावी. गोळी घेतल्यावर लागलेंच ऊन पाणी घोटभर घ्यावें.

पथ्यापथ्यः—दूध, भात, तुरीचे डाळीचें वरण, गव्हांची पोळी, तूप आणि साखर हें खावें, मीठ खाऊं नये. थंड पाणी पिऊं नये. डोकीस तेल वगैरे घालून स्नान करूं नये. खात्रीनें गरमी जाईल.

३—पारा, हिंगूळ, बचनाग आणि मोरचूत प्रत्येकीं ४ गुंजा, कस्तुरी ८ गुंजा, रसकापूर, केशर, गोरोचन आणि काडीखार प्रत्येकीं एकेक तोळा, लवंग, पत्री, जायफळ आणि वेलची दाणे प्रत्येकीं तीन तोळे, असे जिन्नस घेऊन आल्याचे रसांत खल करावा. ( आल्याचा रस ३२ तोळे जिरेइतका खल करावा. ) आणि गुंज प्रमाणाच्या गोळ्या करून ठेवाव्या. १६ पासून वीस वर्षांचे आंतील मनुष्यास दररोज दोन गोळ्या, यापेक्षां जास्त वयाचे मनुष्यास दिवसांतून ४ गोळ्या, याप्रमाणें देत जाव्या. गोळ्या देणें त्या तुपांतून द्याव्या. पथ्यः—तूप, भात, गव्हांची पोळी, साखर, तुरीचे डाळीचें वरण, हळद, आलें, ऊन पाणी पिणें, याप्रमाणें करावें. स्नान करूं नये. मीठ खाऊं नये. ( जरूर लागल्यास सैंधव थोडें खावें. ) औषध ७ किंवा १४ दिवस घ्यावें. औषध घ्यावयाचें बंद झाल्यावर स्नान करावें. पुढें १०।१२ दिवस पथ्यानें वागावें.

४—लवंग, पत्री, जायफळ हे जिन्नस एकेक तोळा, आणि रसकापूर तीन मासे घेऊन, बारीक कुटून पिकलेलें केळें चवथा भाग घेऊन त्यांत घालून खल करून १४ गोळ्या कराव्या, आणि सकाळ संध्याकाळ एकेक गोळी पिकलेल्या ¼ केळ्यांतून द्यावी. केळें लहान असल्यास अर्धें द्यावें.

५—लवंग, पत्री आणि जायफळ प्रत्येकीं अर्धा तोळा, केशर ३ मासे, रसकापूर १ तोळा, आणि कस्तुरी १ मासा, असे जिन्नस घेऊन, तुंब्याच्या ( शेतवड )

पाऱ्याचे रसांत खलून, हरभऱ्याएवढ्या गोळ्या करून ठेवाव्या, आणि दररोज सकाळी संध्याकाळ एकेक गोळी पिकलेल्या ¼ केळ्यांतून द्यावी. केळें लहान असल्यास अर्धे द्यावें. तोंड आल्यास तेल्याटांकणखाराची लाही १ गुंज मधांतून द्यावी. व हीच लाही मधांत घालून खलून जिभेस चाटण लावावें, व थुंका बाहेर टाकावा.

६–हिंगूळ, सोनामुखी, मुरदाडशिंग, काळें जिरें व तुरटी प्रत्येकीं एकेक तोळा, मोरचूत ४ मासे, व खापरसूत ६ मासे, असे जिन्नस एकत्र करून कुटून त्याच्या १४ पुड्या कराव्या; आणि त्यांतील एक पुडी घेऊन तिची धुरी तोंडास द्यावी. याप्रमाणें ७ दिवस करावें ह्मणजे तोंड येईल व तोंडांतून पुष्कळ लाळ वगैरे पडून रोग बरा होईल. उतार--विड्याचीं पानें खावीं. पथ्य—१४ दिवस गव्हांची पोळी आणि तुरीचे डाळीचें अळणी वरण, किंवा सोनफळाचे तांदुळाचा भात खावा.

७–हिंगूळ १ तोळा, लवंग १ तोळा, जायपत्री १ तोळा व जायफळ १ तोळा एकत्र करून कुटून रात्रीचे चार प्रहरांस चार चिलम्या ओढाव्या व जागरण करावें, आणि दुसरे दिवशीं दुधभात खाऊन निद्रा करावी. या औषधानें तोंड येईल व तोंडांतून लाळ गळून रोग कमी होईल. कदाचित तोंड न आलें तरी रोग कमी होईल.

८–पारा १ भाग रसकापूर २ भाग, व गंधक १ भाग यांची कज्जली करून कोंबड्याच्या अंड्यांत भरून, पांच मात कापडें करून, त्यास १ दिवस वालुकायंत्रांत अग्नि द्यावा. आणि निवाल्यावर तें ३।४ गुंजा नागवेलीच्या पानाबरोबर द्यावें; ह्मणजे उपदंशाचा नाश होतो. यास व्याधिहरण ह्मणतात.

९–तुरीचे डाळीएवढा मोरचूत घेऊन, तव्यावर लोखंडी वरवंट्यानें घोटावा. मग त्यांत अर्धा तोळा चिकणीसुपारी व अर्धा तोळा कात घालून तूप घालून घोटावें. घट्ट झाल्यावर १४ भाग करून ७ दिवस सकाळ संध्याकाळ घ्यावें.

पथ्यः—अळवणी ( मीठ घालून केलेले पदार्थ न खाणें. )

१०–मायफळची वस्त्रगाळ पूड ६ मासे व पिठीसाखर ३ मासे एकत्र करून प्रत्येक वेळीं घ्यावें, आणि वर घोटभर पाणी प्यावें; नंतर ३।४ घटका गेल्यावर जेवावें. पथ्यः—तूप, साखर, गव्हांची पोळी, याशिवाय कांहीं खाऊं नये. जरूरच तर एखादें वेळेस दूधभात जेवावा. परंतु चालेल तोंपर्यंत भात खाऊं नये. स्नान करूं नये. ऊन पाणी प्यावें. श्रम करूं नये. या औषधापासून कदाचित एकाद्यास रेच व वांति होते. तसें झालें तरी भिऊं नये. हें औषध १४ दिवस तरी घ्यावें. उष्णतेसंबंधाचे सर्व विकार बरे होतात. परमाहि बंद होतो.

११–पिंपळाची साल, खैराची साल, लवंग, पत्री, वेलची, जायफळ आणि रसकापूर, एकेक तोळा घेऊन पूड करून चिलमींत घालून ७ दिवस गुडगुडी ओढा-

वयास द्यावी. **पथ्यः**—दूध भात १४ दिवस. या औषधापासून बहुधा तोंड येईल. तसें झालें तरी भिऊं नये. तोंडांतून लाळ जाऊन त्यांतून रोग जाईल.

१२—एक तोळा रसकापूर, २ तोळे लोण्यांत चुलीवर ठेऊन पचन करावा. आणि मग रसकापूर घेऊन त्यांत रुईमंदाराचा कोळसा ५ तोळे घालून दोहोंचा कांटे धोतऱ्याचे रसांत खल करावा. आणि गुंजप्रमाणें गोळी बांधावी, व सकाळ संध्याकाळ साखरेंतून एकेक गोळी घ्यावी.

**पथ्यः**—दूधभात, गव्हांची पोळी, तूप, साखर, मीठ खाऊं नये.

१३—मिरीं १ तोळा, आंबेहळद १ तोळा, व मुरदाडशिंग २ तोळे घेऊन सर्वांचें चूर्ण करून मध घालून ७ गोळ्या कराव्या, आणि दररोज सकाळीं १ गोळी घ्यावी.

**पथ्यः**—वातुळ व हिंग वर्ज. गुण उत्तम येईल.

१४—मुरदाडशिंग २ तोळे, लवंग १ तोळा, मिरीं १ तोळा, हळद २ तोळे, व जायफळ १ तोळा, असे जिन्नस घेऊन वस्त्रगाळ करून चांगला खल करावा आणि १४ भाग करून सकाळ सायंकाळ एकेक भाग घ्यावा.

**पथ्यः**—तूप आणि गव्हांची पोळी. मीठ खाऊं नये.

१५—आपट्याचा पाला बारीक वाटून त्याचा गोळा सुमारें २ तोळे, मिरीं पाव तोळा व सोललेली लसूण पाव तोळा, असे जिन्नस घेऊन बारीक वाटून थंड पाण्यांत कालवून घ्यावे. **पथ्यः**—७ दिवस दूधभात, गव्हांची पोळी, सांजा, तूप, साखर हे पदार्थ खावे. मीठ खाऊं नये. स्नान करूं नये. त्यानें गरमी व चट्टे नाहींसे होतात.

१६—आंवळकटी, लकडी रेवाचिनी, व शीतलचिनी समभाग घेऊन बारीक करून कोरफडीच्या रसांत चार प्रहर खलून एकेक वालाच्या गोळ्या कराव्या, आणि रोज एकेक गोळी खडीसाखरेचे पाकांतून घ्यावी.

१७—बाळहरडे चार तोळे व मोरचूत अर्धा तोळा घेऊन लिंबाच्या रसांत सात दिवस खल करून एकेक वालाच्या गोळ्या कराव्या, आणि रोज एकेक गोळी ऊन पाण्यांतून द्यावी.

१८—तांबड्या गुंजेच्या पाल्याचे रसांत ३ मासे जिऱ्याची पूड व खडीसाखर ६ मासे घालून तो सात दिवस द्यावा. **पथ्य**—गव्हांची पोळी व तुरीचें अळणी वरण.

## चट्टे.

चट्टे ह्मणजे काय व ते कसे उत्पन्न होतात हें मागें “ उपदंशाची उत्पत्ति ” या सदरांत सांगितलेंच आहे.

जननेंद्रियास चट्टे पडण्याच्या संबंधानें विचार केला, तर त्याचे दोन प्रकार आहेत. एक आंतील भागास चट्टा पडणें व दुसरा बाहेरील भागांस चट्टा पडणें. या-

शिवाय अंगांत गरमी मुरली ह्मणजे शरिरावरहि निरनिराळ्या प्रकारचे चट्टे उत्पन्न होतात.

ज्या योनीमध्यें किंवा फुलास चट्टे पडलेले असतात, त्या योनी--संभोगापासून पुरुषाचे जननेंद्रियास लस लागून त्याचा पुढील भाग सुजतो, इंद्रियाचा मणी तांबडा लाल होतो, मूत्र कोंडतें, मण्याच्या कड्या सुजतात, आणि बाहेरून तांबड्या रंगाच्या पुटकुळ्या उठून पुढें त्यांचाच चट्टा होतो.

वर लिहिल्या प्रकारानें चट्टे उत्पन्न झाल्यावर ते आंतल्या आंतच कुजतात व त्यापासून मूत्र होतांना फार इजा होते, दुर्गंधी येते लघवीच्या द्वारें दाट रेंद पडतें. बाहेरून झालेले चट्टेहि पुवळणास येऊन त्यांतून स्राव होतो, व पुढें उपचार झाले नाहींत तर त्यांत कृमि पडतात व जननेंद्रिय सडतें. आतां खालीं चट्ट्यांचे प्रकार व उपचार सांगतों.

**सूचनाः**—प्रत्येक प्रकारचे चट्ट्यावर ठिकठिकाणीं उपचार सांगितले आहेत. परंतु त्यानें गुण न येईल, तर पुढें सर्व प्रकारचे चट्ट्यांवर उपचार लिहिलेले आहेत ते करावे.

**प्रकार १ ला**—हा संभोगानंतर ५।६ दिवसांचे आंतच शिस्नाचे मखमालीसारख्या भागावर किंवा त्याचे खालचे आंगास जो तंग बंदासारखा भाग असतो व ज्याला शिवण असें ह्मणतात तेथें उत्पन्न होतो. हा वाटोळा असून मऊ असतो. या चट्ट्यापासून विशेष इजा होत नाहीं. केव्हां केव्हा शिस्न मात्र सुजतें, व कातडी मागें सरकत नाहीं. या चट्ट्यापासून अन्य प्रकारचे रोग उत्पन्न होत नाहींत.

**उपचारः**—१—कांशाचे ताटांत सुमारें तीन तोळे गाईचें लोणी घेऊन, त्यांत ३ मासे रसकापूर बारीक करून घालून काशांचे वाटीनें खलावें. चांगला खल झाल्यावर त्यांत चिकणीसुपारी, शंखजिरें, व पांढरा कात, प्रत्येकीं अर्धा तोळा घेऊन वस्त्रगाळ पूड करून घालून पुन्हा चांगला खल करावा; ह्मणजे मलम तयार झालें. मग तें चट्ट्यास लावावें. हें फार चांगलें आहे.

२—रसकापूर, मुरदाडशिंग, शंखजिरें, मायफळ, चिकण्यासुपारीची राख, (चिकणीसुपारी नसेल तर दुसरे प्रकारची घ्यावी.) आणि पांढरा कांत, हीं औषधें समभाग घेऊन दुधांत चांगला खल करून तें चट्ट्यांवर लावावें.

**प्रकार २ राः**—हा बोटानें दाबून पाहिला असतां कठीण लागतो, व त्यांतून पाण्यासारखी लस वाहते, परंतु यापासून वेदना होत नाहीं. उपचारानें किंवा एरवीं हा कधीं कधीं बरा होतो. परंतु कांहीं दिवसांनीं पुन्हा उत्पन्न होतो. यापासून बद व अन्य शारिरीक रोग उत्पन्न होतात. हे चट्टे संभोगानंतर १५।२० दिवसांचे आंतच उत्पन्न होतात.

**उपचार**—१—हिंगूळ, शंखजिरें, कापूर व पांढरा कात समभाग घेऊन प्रत्येकाची वस्त्रगाळ पूड करून एकत्र करून ती चट्ट्यांवर बसवावी. २--मोंगली एरंडाचा चीक

लोखंडी तव्यावर घेऊन, त्यांत पारोसा थुंका ( सकाळीं निजून उठल्यावर तोंड धुण्याचे पूर्वीचा ) टाकून, दोहोंचा मिलाफ करून त्यांत रसकापूर उगाळून चट्ट्यांस लावावा. ३--राळ आणि मुरदाडशिंग समभाग घेऊन, दोहोंचा काजळाप्रमाणें खल करून तें चट्ट्यांवर लावावें.

**प्रकार ३ राः**—हा चट्टा हळूहळू एकसारखा चरत असतो. याचे कांठ वांकडे तिकडे असून याचे स्रावानें वेदना होतात. हा शिस्नमण्याजवळ किंवा त्याचे खालचे बाजूस किंवा मूत्रद्वाराजवळ असतो.

**उपचारः**—पांढरा कात, मुरदाडशिंग, वेलची, कापूर आणि सफेता समभाग घेऊन त्यांचें वस्त्रगाळ चूर्ण करून लावावें.

**प्रकार ४ थाः**—यांत पहिल्यानें शिस्नमणी व कातडी सुजते व लाल होतें, नंतर काळा डाग पडून तो पसरतो व मांस गळूं लागतें. कधीं कधीं शिस्नास छिद्रें पडतात व तें सडून जात असतें.

**उपचारः**—सर्व प्रकारचे चट्ट्यांवर सांगितलेले उपचार करावे. हा चट्टा बरा होण्याचें फार कठीण पडतें, म्हणून कांतडी कापून टाकण्याची वगैरे तजवीज चांगल्या डॉक्टराकडून करावी.

**प्रकार ५ वाः**—उपदंशाचा विकार होऊन तो साफ मोडला नसेल, तर अपथ्य सेवनानें किंवा अन्य प्रकारानें त्याचा क्षोभ होऊन, सर्व अंगावर व विशेषें-करून बगलेंत व दोन्ही मांड्याचे खांचांत ठिकठिकाणीं चामडी लाल होते, केव्हां केव्हां पुरळ उठतो, त्या ठिकाणीं स्पर्श सहन होत नाहीं व पुढें सर्व अंगावर चट्टे उठतात.

**उपचारः**—चट्ट्यांस रिंग्यांचा किंवा साबूचा फेंस लावून, २।३ घटका गेल्या नंतर ऊन पाण्यानें ती जागा स्वच्छ धुऊन पुसून, शंखजिरें तुपांत उगाळून लावावें किंवा मोंगली एरंडाचा चीक आणि लोणी एकत्र खलून लेप द्यावा.

**प्रकार ६ वाः**—उपदंशविकार फार दिवस अंगांत मुरला तर त्यांपासून रक्त दूषित होऊन वृषण, मस्तक, तळहात आणि तळपाय यांवर पाहिल्यानें लहान लहान डाग उत्पन्न होतात, त्यांचा रंग पहिल्यानें थोडा तांबडा असून पुढें काळसर होतो. हे डाग पुढें वाढत जाऊन रक्तपित्ती झाल्यासारखे दिसतात.

**उपचारः**—१—वृषण खेरीज करून इतर ठिकाणीं असलेले, चट्ट्यांस जळवा लावून रक्त काढावें. मग जळवा लाविलेली जागा सुकल्यावर चट्ट्यांवर सांगितलेले उपचार करावे. जळवा लावणें त्या रोगाचा जोर पाहून त्या मानानें एकेक महि-न्याच्या अवकाशानें व कमजास्त प्रमाणानें लावाव्या. यादी नंबर ८२।८३ हे काढे अवश्य घ्यावे. २—शतधृत ४ तोळे घेऊन त्यांत तुरटीचे लाहीची पूड १ तोळा

घालून खलून ठेवावें आणि चट्ट्यांचे जागीं दररोज चोळीत जावें. हा उपचार १।२ महिने करावा. ( शतघृत कसें करावयाचें तें अखेरीस कोशांत पहा. )

**कथली गरमीः**—उपदंशाचा विकार अंगांत फार दिवस मुरल्यानें रक्त दूषित होऊन, एक प्रकारचे चट्टे उत्पन्न होतात, त्यास कोणी कथली गरमी असें ह्मणतात. प्रथम हातापायांचे बोटांस किंवा जननेंद्रियावर पुटकुळी उठते, आणि ती खाजविल्यावर पसरते व त्यांतून स्राव होऊं लागतो, आणि तिचाच चट्टा होतो. कधीं कधीं सर्वांगावर पुटकुळ्या उठतात. या पुटकुळ्यांचा रंग प्रथम तांबडा असतो, व पुढें काळसर होत जातो. पुढें त्यांचेच चट्टे होतात व ते गजकर्णाप्रमाणें दिसतात.

वर लिहिलेल्या प्रकारचे चट्टे फार त्रासदायक आहेत. फार दिवस उपचार केल्यावांचून बहुधा बरे होत नाहींत.

**उपचारः**—१–यादी नंबर ८२।८३ हे काढे घ्यावे आणि पुढील उपचार करावे. २–शंखजिरें तुपांत खलून लेप करावा. ३–उपर साळीचीं पाळें ६ मासे घेऊन गाईचे दुधांत उगाळून आंत १ तोळा खडीसाखर घालून तें दररोज घेत जावें. हीं पाळें ताजीं मिळतील तर केळीचे किंवा एरंडाचे पानांत बांधून तीं फोपाट्यांत थोडीं भाजून कुटावीं, आणि त्यांत जिरें आणि खडीसाखर प्रत्येकीं ६ मासे व एक लहानसा पांढरा भाजलेला कांदा घालून सर्व एका जागीं कुटून त्यांत १–१॥ तोळा तूप घालून सकाळ संध्याकाळ घ्यावें. ४ वांकेरीचें भातें घ्यावें. ( यादी नंबर २२१ पहा. ) गंधक रसायन घ्यावें. ( यादी नंबर १२४ ). ५ सोनाखेल या नांवाच्या वेलीची मुळी ३–४ मासे घेऊन गाईचे ५–६ तोळे दुधांत उगाळून १ तोळा खडी साखर घालून दररोज दोन वेळां घ्यावी.

**सर्व प्रकारच्या चट्यांवर उपचारः**—१–" उपदंशावर उपचार " या सदराखालीं मागें औषधें सांगितलीं आहेत. त्यांतील नंबर १।३।४।५।८।१५ यापैकीं एकादें औषध पोटांत देऊन खालीं चट्ट्यांवर लावावयाचीं औषधें सांगितलीं आहेत तीं लावावीं. बाहेर औषध लाविलें तरी अंगांतील रोग मोडत नाहीं, ह्मणून पोटांत औषध घेणें जरूर आहे. २–चट्टे, दुःख, परमा यांस मोरचुताचें भस्म—कांसाळूचीं पानें छटांक वाटून त्यांत मोरचुताचा तोळाभर खडा ठेऊन, मातकापड करून पाटीभर शेणींत पूट द्यावें. शुभ्र भस्म होतें, तें प्रत्येक वेळेस लोण्यांतून १ गुंज द्यावें. ३–मुरदाडशिंग तुपांत खलून चट्यांचे जागीं लावावें. किंवा राळ आणि मुरदाडशिंग समभाग घेऊन काजळाप्रमाणें पूड करून चट्यांवर लावावी किंवा गोपीचंदन पाण्यांत उगाळून लावावें. ४–तिळांचें तेल ५ तोळे, कापूर १ तोळा, सफेता २ तोळे व मेण ५ तोळे एकत्र मिळवून मलम करावें आणि

लावावें. लवकर गुण येतो. ५—गोड्या एरंडाची मुळी पाण्यांत उगाळून त्यांत रसकापूर घालून लावावी. खडीसाखर १ तोळा, पांढरा कात १ तोळा, गंधक १ तोळा, वंशलोचन १ तोळा आणि मुरदाडशिंग अर्धा तोळा घेऊन एकत्र करून बारीक काळजासारखें करून त्या सर्वांचा मधांत खल करून मलम तयार करावें; व तें लावावें. ह्मणजे असाध्य स्थितींत जरी उपदंशसंबंधीं पीडा असली तरी निःसंशय बरी होते. पांढरा कात, मुरदाडशिंग, वेलची, कापूर व सफेता ह्यांचें समभाग चूर्ण एकत्र करून लावावें. ६—पारा १ तोळा, गंधक १ तोळा, त्रिफळा जाळून त्याची राख १ तोळा, याप्रमाणें जिन्नस घेऊन गाईचे लोण्यांत खलून नंतर थोडा मध घालून तें रेशमी कपड्यावर लावून ७ दिवस पट्टी बसवावी. ७—वडाच्या पानाची राख, पारा, गंधक, मुरदाडशिंग, मोरचूत आणि चिकणी सुपारी असे जिन्नस समभाग घेऊन, पारा आणि गंधक यांशिवाय सर्व बारीक कुटून, तांब्याचे भांड्यांत घालून तांब्याचे पंचपात्रीनें काळ्या विड्याचे पानाचे रसांत खलावें; नंतर पारा आणि गंधक यांचा दगडी खलांत चांगला खल करून, त्यांत ते जिन्नस घालून विड्याचे पानाचे रसांत खल करून, गोळ्या करून ठेवाव्या; आणि ती गोळी तुपांत उगाळून लावावी. ८—तूप १४ भाग, कुचल्याच्या बिया १०, राळ १५ भाग, मेण १५ भाग आणि मुरदाडशिंग ५ भाग, असे जिन्नस घेऊन कुचल्याच्या बिया थोड्या कुटून, सर्व जिन्नस त्या तुपांत पक्क करून तें गाळून ठेवावें आणि लावावें. ९—शंखजिरें आणि आंवळीच्या पाल्याचें चूर्ण गाईच्या लोण्यांत खलून लावावें.

**सर्व प्रकारचे चट्टयांवर धुरीः**—हिंगूळ १ तोळा, मुरदाडशिंग १ तोळा, आणि केशर ½ तोळा, यांच्या १४ पुड्या करून रोज एका पुडीची धुरी द्यावी. भगें पडलीं असलीं तरी लवकर बरीं होतील. रुईचे मुळाची साल आणि कोंबड्याचे अंड्यावरील कवची यांची धुरी द्यावी.

**शिस्नावर रेघा पडल्यासः**—विड्याचे पानाचे रसांत मुरदाडशिंग उगाळून पट्टी द्यावी.

**चट्टे किंवा व्रण धुण्यास काढा**—यादी नंबर ७९ अ पहा.

## बद.

उपदंशापासून चट्टे उत्पन्न होऊन त्यांचे क्षोभानें, किंवा गरमीचें विष शरिरांत शोषण होऊन त्या योगानें, मांडीच्या वरच्या अंगास जांघेंत एक गांठ उत्पन्न होते, तिला बद किंवा वळ ह्मणतात. गरमीचे विकाराशिवायहि फार चालल्यानें, किंवा पायास आघात वगैरे झाल्यानें किंवा अतिउष्णतेनें वरील ठिकाणीं व खाकेंत किंवा गालफराखालीं वळ होतो, परंतु अशा प्रकारानें झालेल्या वळापासून विशेष इजा न होतां थोडक्या उपचारानें बरा होतो. तसें गरमीपासून झालेले वळाचें नाहीं. त्यांपासून बराच

त्रास सोसावा लागतो. गरमीपासून वळ झाला आहे, किंवा अन्य कारणानें झाला आहे, हें ज्याचें त्यास बहुधा समजणार आहे. गरमीपासून वळ झाला असेल तर त्यांस गांठ उठतांच जळवा लावून रक्त काढावें; आणि मग तो बसण्याचे उपचार करावे, ह्मणजे तो बहुधा मोडेल. परंतु तसें न होईल तर पिकण्याचीं औषधें लावून पिकून फुटला ह्मणजे मग तो भरण्याचीं औषधें लावावीं.

**बद बसण्यास उपचारः**—१--प्रथम जळवा लावून रक्त काढावें. २—कोंबडीचे अंड्यांतील बलक, शेंदूर आणि रेवाचिनीचा शिरा, एकत्र खलून त्याची पट्टी लावावी. किंवा फणसाचा डीक जाळून त्याची राख व तितकाच काळाबोळ घेऊन एकत्र वाटून बारीक चूर्ण करावें, नंतर त्यांत कोंबड्याचे अंड्यांतील बलक घालून खल करावा, आणि त्यांतील सुपारीएवढी गोळी बदावर बसवावी, आणि वर कापडाची पट्टी बसवावी. असें २।३ वेळां केलें ह्मणजे बद बसेल. ३—झाडावर असलेले अळवाची मुळी थंड पाण्यांत उगाळून त्यांत सुका चुना घालून लावावें. ४—उत्तम मध ४ भाग व तीन भाग कळीचा चुना एकत्र खलून लावावें. ५—उंबराचा चीक, धूप, गूळ आणि कळीचा चुना एकत्र करून बदावर बसवावें.

**बद पिकण्यासः**—गव्हांचें पोटीस दिवसांतून ३।४ वेळां बांधावें.

**बद फुटण्यासः**—१- बेलाचा ओला पाला वाटून तो बदावर बांधावा. २--अनंताचे झाडाचा पाला बारीक वांटून तो बांधावा. ३--चिकणा या झाडाचीं ओलीं पानें वाटून बांधावीं.

**बद फुटल्यावर बरा होण्यास उपचारः**—१--यादी नंबर ७९ 'अ' या काढ्यानें रोज बदाची जागा धुऊन मग औषध लावावें. २--यादी नंबर १८०।१८३।१८५ यापैकीं एकादें मलम, किंवा यादी नंबर १६७।१७१।१७२ यापैकीं एकादें तेल लावावें. ३—वांकेरीचें भातें पाण्यांत उगाळून लावावें व पोटांत घ्यावें. ( यादी नं. २२१ पहा. )

## परमा.

स्त्रीपुरुषाच्या दूषित जननेंद्रियापासून चिकट लसेचा, किंवा पिंवळट अगर रक्तमिश्रित पुवाचा स्राव होतो, त्यास परमा असें ह्मणतात. कितीएक लोक परमा ह्मणजे प्रमेह असें समजतात, पण हे दोन्ही विकार निरनिराळे आहेत.

हा विकार स्पर्शसंचारी आहे. स्त्री किंवा पुरुष ह्यांतून एकास हा रोग असून त्या उभयतांचा संभोग झाला असतां, दुसऱ्यास उत्पन्न होतो. या विकाराच्या माणसानें लघ्वी केलेल्या जाग्यावर थोड्या वेळांत जर कोणी लघवी करील, तर त्यासही हा विकार होतो. कधीं कधीं मलीनपणा अनियमित मैथून तीक्ष्ण धुपणी किंवा आर्तव यांपासून स्त्रीस, व सर्दी, अति ऊष्ण पदार्थ खाणें, इत्यादि कारणांनीं,

हा रोग होतो असेंहि कित्येक ह्मणतात. हा विकार स्त्रीपुरुषाच्या संभोगानंतर १५।२० तासांचे आंतच केव्हां केव्हां होतो.

**याचे उपद्रवः**—लघ्वी करितांना मूत्रद्वाराशीं, अगर मूत्रभागांत, चुणचुणल्या सारखा किंवा खाज सुटल्यासारखा भास होणें, मूत्रमार्गीचें छिद्र सुजणें व लाल होणें, शिश्न बोटानें दाबिलें असतां त्यांतून पू येणें, व त्याचा स्राव कधीं कधीं दुधासारखा कधीं पिंवळा, कधीं चिकट, कधीं रक्तमिश्रित असा होणें, लघ्वीस वरचेवर होणें, व होत असतां तिडीक लागणें, आग होणें, धार बारीक होणें, पुरुषाचे जननेंद्रियाचा क्षोभ होऊन तें बहुधा रात्रीं ताठणें, व त्यामुळें झोंप न येणें, जननेंद्रियाची चामडी सुजणें इत्यादि उपद्रव होतात. कामेच्छा कमी होते.

हा विकार जुना होत गेला ह्मणजे त्याची आग, वेदना किंवा स्राव होत नाहीं. विकार बरा झालासें वाटतें. परंतु लघ्वींतून सुताप्रमाणें तंतू पडतात, व अपथ्यानें विकार पुन्हां उत्पन्न होतो. स्राव होत असतां ठणका किंवा जळजळ नसते व त्यावरून विकार नाहींसें वाटतें. पण तशी स्थिती राहिल्यानें इंद्रियाचा आंतील भाग नासून तें सुजतें व त्यास छिद्रें पडतात. मग असाध्य स्थिति होते. याकरितां वेळीं जपावें.

वर लिहिलेले उपद्रवावरून परम्याचे कांहीं प्रकार मानितात. त्यांचीं नांवें व उपचार खालीं लिहिले आहेत. ही विकृति उत्पन्न होतांच प्रथम खालीं लिहिलेलें रेचक घ्यावें. नंतर दुसरें दिवशीं मूत्रजुलाब घ्यावा. ( यादी नंबर २१८ पहा. ) मग औषध सुरू करावें.

**परम्यावर रेचकः**—सोनामुखी ४ भाग, गुलाबकळी ४ भाग, वेलची दाणे २ भाग व भीमसेनी धापूर ‑॥‑ भाग, याप्रमाणें जिन्नस घेऊन बारीक कुटून एकत्र करून त्यांपैकीं प्रत्येक वेळेस ३ मासे घेऊन गुळांत गोळी करून घ्यावें. याप्रमाणें ८।४ दिवशीं घेत असावें.

## परम्याचे प्रकार व उपचार.

**१ पू परमाः**—मूत्रमार्गानें पुवाचा स्राव होतो तो.

**उपचारः**—१ गोपिचंदन ३।४ मासे घेऊन ४।५ तोळे पाण्यांत विरघळून गाळून घ्यावें. आणि तसेंच कांहीं वेळ ठेवून वरचें पाणी टाकून खालची रबडी व साखर ६ मासे आणि दहीं ६ मासे असें एकत्र करून दररोज सकाळीं घ्यावें. थंडी झाली असें वाटल्यास आंत १।२ मासे सुंठीची पूड घालावी. २—" उपदंशावर उपचार " या सदरापैकीं प्रथम नंबर १।३।४ यापैकीं औषध घ्यावें.

**२ तिडिक परमाः**—लघ्वीस होत असतां तिडीक लागते तो.

**उपचारः**—१—पारा १ भाग, कथील १ भाग, दालचिनी पाऊण भाग,

आणि लवंग ½ भाग, असे जिन्नस घेऊन मातीच्या भांड्यांत कथील ऊन करून तें पातळ असतां त्यावर पारा ओतावा. नंतर कथील खलांत कुटून बारीक करावें, आणि बाकीचे जिनसाचें चूर्ण करून, आंत मिसळून सर्वांचा दोन दिवस खल करावा आणि प्रत्येक वेळेस २।३ गुंजा औषध मध आणि गाईचें तूप यांतून घ्यावें. औषध ७दिवस सकाळ सायंकाळ घ्यावें. ह्मणजे परमा व धातुविकारासंबंधीं पीडा दूर होतील. **पथ्यः**—गव्हाची पोळी, तूप, साखर, ऊनपाणी पिणें. २—कंकोळ १॥ भाग, खडी-साखर १॥ भाग आणि तुरटी ४ भाग या प्रमाणानें जिन्नस घेऊन एकत्र बारीक कुटून दररोज तीन वेळां प्रत्येक वेळेस ४।४ माशांप्रमाणें घेऊन वर ५।६ तोळे दूध प्यावें. दूध न मिळेल तर थंड पाणी प्यावें. ३—उंबराची साल, रानतुळशीचीं केसरें आणि बडिशेप प्रत्येकीं एक तोळा व मिऱ्यांचे दाणे १० घेऊन एक शेर(२८ तोळे)पाण्यांत शिजवून ६ तोळे राहिल्यावर २ तोळे खडीसाखर घालून दररोज सकाळीं द्यावें. ४—काप्या आंब्याचे सालीचा रस सु. तीन तोळे व तितकाच नारळाचा अंगरस, पावतोळा जिरें बारीक वाटलेलें आणि ३ तोळे चिनीसाखर, एकत्र करून दररोज सकाळीं घ्यावें.

**३ रक्तपरमाः**—मूत्र मार्गानें रक्ताचा स्राव होतो तो.

**उपचारः**—१ प्रत्येक वेळेस खजूर ६ मासे तुपांत तळून बारीक वाटावा, आणि त्यांत २ मासे जिरें बारीक वाटून घालून सकाळ संध्याकाळ द्यावें. याप्रमाणें ७—१४ दिवस द्यावें. वर सांगितलेलें प्रमाण हें प्रत्येक वेळेचें आहे. २—लवंग, जायपत्री, जायफळ आणि केशर प्रत्येकीं अर्धा तोळा, कार्डीखार पाव तोळा, रसकापूर २ मासे, बचनाग ४ गुंजा आणि मोरचूत २ गुंजा, असे जिन्नस घेऊन आल्याचे रसांत खल करावा, आणि २ गुंजांची गोळी बांधावी. दररोज सकाळीं १ गोळी व सायंकाळीं १ गोळी गाईचे तुपांतून किंवा आंवळ्याचे रसांतून घ्यावी. **पथ्यः**—तेल, तिखट, आंबट वर्ज्य. ३—दूध ५।६ तोळे घेऊन त्यांत सराट्याची पूड ६ मासे, सफेत मिश्रीची पूड ६ मासे, आणि साखर १ तोळा, घालून शिजवावें, नंतर त्यांत वावडिंगाचे झाडाच्या मुळ्यांचें चूर्ण ३ मासे घालून घ्यावें.

**४ सूत परमाः**—लघ्वींतून कापसाचे तंतूसारखा स्राव होतो तो.

**उपचारः**—१—जांभळीचे बियाचें वस्त्रगाळ चूर्ण २ मासे, प्रवाळ १ गुंज, आणि हरणाचे शिंगाचें भस्म १ गुंज, एकत्र करून सकाळ सायंकाळ तुपांतून घ्यावें. निदान २८ दिवस तरी घेतलें पाहिजे. **पथ्यः**—तेल, तिखट आंबट वर्ज. २—रानदोडकीचें पाळ, पांढरे जासवंदीचें पाळ, आणि उपरसाळीचें पाळ पत्येकीं ६ मासे घेऊन गाईचे दुधांत उगाळून त्यांत जिरें २ मासे, आणि खडीसाखर १ तोळा घालून १४ दिवस दररोज सकाळीं घ्यावें. ( पथ्यः—गव्हांची पोळी, तूप, साखर, तुरीचें वरण, कांचाची भाजी. ) १५ वे दिवशीं ७ तोळे निरसें दूध घेऊन त्यात कागदी अर्धें लिंबू पिळून, लिंबू पिळतांच प्यावें, आणि पथ्य सोडावें.

**सर्व प्रकारचे परम्यांवर उपचार**:—१-चंदनीतेल, सोडा व बाभळीचा डीक हे जिन्नस प्रत्येकीं १ तोळा घ्यावे. पहिल्यानें डीक पाण्यांत घालून पातळ झाल्यावर एका बाटलींत चंदनी तेल घालावें, नंतर त्यांत सोडा घालावा, व मग डिंकाचें पाणी घालावें, आणि सर्वांचें चांगलें मिश्रण व्हावें, याकरितां बाटलींत एक काठी घालून कांहीं वेळ ढवळावें, चांगलें मिश्रण झाल्यावर त्यांत आणखी इतकें पाणी घालावें कीं, एकंदर मिश्रण ७ ८ तोळे होईल. नंतर दिवसांतून तें दोन वेळां घ्यावें. ह्याप्रमाणें रोज तयार करून ७ दिवस घेतलें असतां फार उत्तम गुण येतो. **पथ्य**:—गव्हांची पोळी, तूप, साखर, दूध, तुरीचे डाळीचें वरण, जरूर तर थोडा भात खावा. पाणी ऊन प्यावें. २—वंशलोचन, घांटी नीळ, लवंग, जायपत्री, आणि जायफळ येणेंप्रमाणें जिन्नस समभाग घेऊन वस्त्रगाळ करून त्यांतलि २—३ मासे चूर्ण घेऊन तें चांगलें भिजेइतकें चंदनी तेल घालून द्यावें. दिवस ७—१४. गुण चांगला येईल. ३—वंशलोचन, आंवळीचा कात, जायफळ, पाषाणभेद, तुरटी, सराटे, भीमसेनी कापूर, व शिलाजीत हे जिन्नस समभाग घेऊन वस्त्रगाळ चूर्ण करून थोडें बिवव्याचें तेल आंत घालून चंदनी तेलांत ४ दिवस खल करावा, आणि प्रत्येक गोळी ४ गुंजांची बांधावी. दररोज सकाळीं १ व सायंकाळीं १ गोळी घेऊन वर खडीसाखरेचा काढा घ्यावा. **पथ्य**:—गव्हांची पोळी, तूप, भात, साखर, तुरीचे डाळीचें वरण, ऊन पाणी, इत्यादि. **अपथ्य**:—मीठ, दूध, ताक, दहीं. ४—वंशलोचन १ भाग, वेलची दाणे १ भाग, आणि कंकोल २ भाग घेऊन सर्वांचें वस्त्रगाळ चूर्ण करून त्यांतील ३ मासे चूर्ण घेऊन तें भिजेइतकें चंदनी तेल घालून घ्यावें. आणि घोटभर पाणी घ्यावें. ५—वंशलोचन, वेलची दाणे, नागकेशर, दारूहळद आणि लकडी रेवाचिनी, समभाग घेऊन सर्वांचें वस्त्रगाळ चूर्ण करून प्रत्येक वेळेस ६ मासे चूर्ण घेऊन, तें चांगलें भिजेइतकें चंदनी तेल घालून, सकाळ सायंकाळ घ्यावें. ६—रुमामस्तकी, वंशलोचन आणि वेलची दाणे, समभाग घेऊन वस्त्रगाळ चूर्ण करून प्रत्येक वेळेस ६ मासे चूर्ण घेऊन, तें चांगलें भिजेइतकें चंदनी तेल घालून सकाळ संध्याकाळ घ्यावें. ७—आइनाच्या झाडाच्या कोवळ्या अंकुरांचा रस ६ मासे काढून त्यांत जिरें २ मासे आणि खडीसाखर ६ मासे घालून घ्यावा. २।३ तोळे कुंभ्याचे सालीचे रसांत तूप घालून घ्यावा. रस न येईल तर साल दुधांत वाटून रस काढावा. ८—कच्च्या आंब्याच्या १—२ तोळे साली, शेळीच्या १४ तोळे दुधांत वाटून फडक्यावर गाळून द्यावें. ९—हरडेदळ, बेहडेदळ, आंवळकटी, दारुहळद, नागरमोथे, व वडाचें पाळ, प्रत्येकीं ६ मासे घेऊन १ शेर पाणी घालून अष्टमांश काढा करून आंत हळदीची पूड १ मासा व चंदनी तेल ७-८ थेंब घालून घ्यावा. लवकर गुण येतो. १०—शेवरीची साल १—२ तोळे घेऊन ४—५ तोळे ताकांत वाटून फडक्यावर गाळून त्यांत २ मासे जिरें व ६ मासे खडीसाखर घालून घ्यावें. ११—सुवर्णराजवंगे-

घेर लोणी आणि खडीसाखर यांतून प्रत्येक वेळेस २--२॥ गुंजा घ्यावा. हें औषध फार उत्तम आहे. या पुस्तकांत विक्रीचे औषधांत---पुस्तकाचे शेवटीं पहा.

**सूचनाः**---वरील औषधांपैकीं बरींच औषधें चंदनी तेलांतून घेण्याविषयीं लिहिलें आहे, परंतु तसें न जमल्यास तें औषध तूप आणि साखर यांतून किंवा दुधांतून घ्यावें. मात्र चंदनी तेलांतून घेतल्यानें विशेष गुण येतो हें लक्षांत ठेवावें.

## उपदंशापासून होणारा संधिवायु.

उपदंश झालेल्या मनुष्यांचे हातापायांचे वगैरे संधि दुखतात, सुजतात व चालतां येत नाहीं, अशी स्थिति होते त्यास संधिवायु ह्मणतात. हा विकार उपदंशापासूनच झाला आहे किंवा इतर प्रकारचा वात आहे याची परीक्षा आपलीं पूर्वींचीं कृत्यें वगैरे मनांत आणून करावी.

**उपचारः**---१---यादी नंबर ८३ हा काढा दिवसांतून ३ वेळां घ्यावा. प्रथम ५--४ दिवस रोज एकदां १--१॥ तोळा एरंडेल त्या काढ्यांत घालावें. शिवाय उपदंशावर सांगितलेले उपचारांतून प्रकृतीचे मानानें एखादें औषध योजून घ्यावें. २--गंधकरसायन घ्यावें. ( यादी नंबर १२४ पहा ) हें या विकारावर फार चांगलें आहे. ३--रुई, निंब, गोडा एरंड, निर्गुडी, आणि काळा धोतरा यांचे पाल्याचा रस समभागानें घेऊन त्या सर्वांच्या ¼ तिळांचें तेल घालून कढवून तेल शिल्लक राहिल्यावर गाळून ठेवावें, आणि संधि दुखणारे जाग्यावर लावावें.

**उपदंशावर पथ्य**---तुरीचें डाळीचे वरण, तूप, गव्हांची पोळी किंवा सांजा अगर पुऱ्या, मूग, दूध, ऊन पाणी पिणें, क्वचित् भात खाणें, पडवळ, चाकवत, द्राक्षें, कवठ, इत्यादि.

**अपथ्यः**---दिवसाची निद्रा, श्रम, जागरण, उन्हांत फिरणें, मैथून, जडान्न, गूळ, नारळ, ताक, दहीं, केळें, पावटे, वगैरे संपूर्ण वातूळ पदार्थ, इत्यादि.

## उवा.

उवा तीन प्रकारच्या असतात. एका जातीची ऊ डोक्यांतील केसांत होते. दुसऱ्या जातीची काखेंत व तिसऱ्या जातीची शरिरावर होते. ह्या उवा अगर अंडीं केशमुळांना लागून असतात.

**उपाय**---दररोज स्नान करून कपडे स्वच्छ ठेवल्यानें उवा कमी होतात. (१) कॉर्बोलिक साबण डोकीला लावून केस चांगले धुवावे. (२) सिताफळीचे पाल्याचा रस केसांस लावावा व एक तासानें आंघोळ करावी. (३) पांगाऱ्याची साल आणून पाणी घालून रस काढून तो केसास लावावा, व दोन तासांनीं आंघोळ करावी. (४)

अडीच तोळे पाण्यांत १ गुंज रसकापूर घालून तें पाणी केसांस लाविल्यानें उवा व लिखा नाहींशा होतात.

## कर्णरोग.

जलामध्यें क्रीडा करणें, कान खाजवितांना दुखावणें, कानांतील मळ काढितांना कानकोरणें वगैरे बोचणें, थंड हवा किंवा पाणी कानांत जाणें, या व दुसऱ्या अशाच कारणांनीं किंवा किडलेल्या दांतांच्या क्षोभानें दोषांचा कोप होऊन, ते कर्णशिरांमध्यें प्रवेश करून, शूल, कानांतून पू वाहणें, बहिरेपणा वगैरे विकार उत्पन्न करितात, त्यांस कर्णरोग ह्मणतात. याचे प्रकार २८ आहेत. त्यांपैकीं कांहीं सांगतों.

**कर्णशूलः**—कर्णगत वायूचा कोप होऊन तो कर्णाच्या आसमंतात् भागीं फिरून कानांत दोषानुरूप शूल उत्पन्न करितो.

**यावर उपचारः**—१–दांतांचे विकारानें शूल असेल. तर दंत रोगावरील उपचार करावे. ( मुखरोग पहा. ) २ पहिल्यानें कानांत पातळ तूप घालून, मग टांकणखाराची लाही लहानशा चिमटीभर घालून, त्यावर लिंबाचा रस पिळावा. पिकलेले रुईचे पानाचे रसांत थोडें सैंधव व थोडें तिळांचें तेल घालून तें कानांत घालावें. कान शेकावा. वारा लागूं देऊं नये. ऊन पाण्याच्या पिचकाऱ्या माराव्या. ३–आल्याचा रस, मध, सैंधव आणि शिरसाचें तेल समभाग एकत्र करून तेल शेष राहीपर्यंत पचन करावें आणि तें गरम असतां कानांत घालावें. ४–लसूण, आलें, शेवगा, किंवा वायवर्णी, यांपैकीं एकाचा रस थोडा ऊन करून कानांत घालावा. ५–शेवग्याचीं फुलें एक भाग आणि काळे तिळाचें तेल दोन भाग या प्रमाणानें घेऊन एकत्र करून उकळून ( कढ येईइतकीं ऊन करून ) तें तेल गाळून ठेवावें आणि कानांत घालावें, ह्मणजे शूळ व स्राव हीं बंद होतात. ६–रुईचें पिकलेलें पान आणून, त्यास तुपाचा हात लावून विस्तवावर शेकून पिळून रस काढावा आणि तो कानांत घालावा.

**बहिरेपणाः**—वायु कफमिश्रित होऊन, किंवा एकटाच कर्णवाहिनी स्रोतसांचे आवरण करून जेव्हां राहतो तेव्हां ऐकूं येत नाहीं.

**उपचारः**—१–गाईचे मूत्रांत बेलफळें वाटून त्यांत पाणी, शेळीचें दूध व तिळाचें तेल, समभाग घालून तें पचन करावें; आणि शेष तेल राहिल्यावर तें कानांत घालावें. २–कानाचे बाहेरील बाजूस पलिस्तर मारावें, किंवा बिब्बा घालावा. सैंधव लहान मुलाचे मूत्रांत मिळवून कानांत घालावें. घोड्याची ताजी लीद आणि आल्याचा रस एकत्र कुवलून फडक्यावर गाळून तें कानांत घालावें. ३–निर्गुडी, जाईचा पाला, रुई, आका, लसूण, कापशी शेवगा, तुळस, आलें आणि कारलें या प्रत्येकाचा रस ४ तोळे व तिळाचें तेल १२ तोळे, असें एकत्र करून, त्यांत बचनाग ४ तोळे घालून पचन

करावें, आणि शेष तेल राहिल्यावर गाळून घेऊन कानांत घालावें; ह्मणजे बहिरेपणा कर्णनाद, ठणका व कर्णस्राव, यांचा नाश होतो.

**कर्णस्राव**:—कर्णनळाला किंवा कर्णास्थीला विकार झाल्यापासून किंवा कानांतील मळ काढितांना कानकोरणें वगैरे बोंचल्यापासून, किंवा डोक्यास कांहीं लागून तें हापटलें असतां, अथवा पाण्यांत बुडी मारिली असतां, वायूचा कोप होऊन कानांतून पू गळतो, त्यास कर्णस्राव ह्मणतात.

**यावर उपचार**:—१--कान दररोज ऊन पाण्यानें किंवा त्रिफळेच्या काढ्यानें किंवा गोमूत्र तापवून मंदोष्ण करून त्यानें धुवावा. २--तुरटीचे लाहीची भुकटी करून ती कानांत टाकावी व वर सबजाचे पाल्याचे रसाचे २।३ थेंब घालावे. ३--'कर्णशूल' या सदरांत सांगितलेलें शेवग्याचें तेल कानांत घालावें. ४—आंवळीचे पाल्याचे रसांत कात व मायफळ उगाळून तो रस दिवसांतून तीन वेळां कानांत घालावा, व प्रत्येक वेळेस दोन तास कानांत ठेवावा. ५- सबजाचे पाल्याचा रस प्रत्येक वेळेस २।३ थेंब सकाळीं व संध्याकाळीं कानांत घालावा. ६—पिंवळ्या कोरंटकीचे पाल्याचा रस ७ दिवस कानांत घालावा. ७—समुद्रफेणाचें चूर्ण कानांत घालावें. ८--यादी नंबर १७० चें तेल कानांत घालावें.

**सर्व प्रकारचे कर्ण रोगांवर**:—यादी नंबर १७० चें तेल कानांत घालावें. हें फार चांगल्यापैकीं आहे.

## कवलु ( प्लीहा )

उदर रोगाचाच एक प्रकार प्लीहोदर ह्मणून जो आहे, त्यास कवलु किंवा पान्थरी ह्मणतात. याचे योगानें पोट मोठें होतें व अग्निमांद्य, क्षीणता, श्वास, जेवलें ह्मणजे पोटाला तडस, पायांवर सूज, तोंड निस्तेज, इत्यादि विकार होतात. हा रोग पोटांत डावे बाजूस होतो.

**उपचार**:—१—या रोगावर उदर रोगावरील उपचार करावे. शंखवटी द्यावी. ( यादी नंबर १४१ पहा. ) पपईच्या फळांचें पोटीस करून प्लीहेवर बांधावें, व पोटांत पपईचा लहानसा १ चमचा चीक साखरेबरोबर दिवसांतून ३ वेळां द्यावा. २--सैंधव, पिंपळी, चित्रक, शिलाजित व जिरें, समभाग घेऊन एकत्र करून त्यांचें चूर्ण प्रत्येक वेळेस ३--६ मासे घेऊन शेवग्याचे सालीचे ६ मासे रसांतून द्यावें. ३--निर्गुंडीचे पाल्याचा रस २ तोळे व गोमूत्र २ तोळे एकत्र करून प्रत्येक वेळेस द्यावें. निर्गुंडीचे पाल्याचा रस न आल्यास पाणी घालून काढावा. ४—यादी नंबर ७६ चा काढा द्यावा. ५--कुमारी-आसव द्यावें. ( यादी नंबर १७८ पहा. ) ६—वज्रक्षार द्यावा. ( यादी नंबर १३९ पहा. ) ७—रक्तरोडा, हरीतकी व गोमूत्र २-३ तोळे एकत्र करून द्यावें,

## कफरोग

**उपचारः**—१–आष्टाचा चीक शक्तीमानाप्रमाणें मुलांस २।३ थेंबपर्यंत व थोर मनुष्यास ७।८ थेंबपर्यंत घेऊन गुळांत कालवून द्यावा ह्मणजे कफ पातळ होऊन पडतो. उतार तूपभात. २–आइनाचे झाडाच्या सालीची राख सुमारें २ मासे घेऊन ती मधांतून द्यावी. ३–रेवाचिनीचा २।३ गुंजा शिरा दुधांत किंवा कोरफडीचे रसांत किंवा ऊन पाण्यांत उगाळून द्यावा, ह्मणजे वांती होऊन किंवा मलद्वारानें कफ पडेल. ४–कोरफडीचा रस, खडीसाखर, हळदीची पूड व थोडा मध असें एकत्र करून द्यावें. ५–अडुळशाचा रस मध घालून द्यावा. ६–श्वास प्रकरणांत सांगितलेले उपचार करावे. ७–खातीहळद, दारूहळद, आणि मनशीळ समभाग घेऊन साधारण कुटून सकाळीं चिलमींत घालून ओढावें ह्मणजे बरें वाटतें. ८–कासकेसरी द्यावा. (यादी नं. १२३ पहा.) ९–ज्वरमुरारी द्यावा. ( यादी नंबर १२६ पहा. )

**पथ्य--अपथ्य**:--श्वास प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें.

## कामला ( कावीळ )

पांडुरोगाची उपेक्षा केली असतां, किंवा जो पांडूरोगी किंवा इतर मनुष्य अत्यंत पित्तकर पदार्थ फार खातो, त्याचें पित्त रक्तमांसाला जाळून टाकितें व पित्त वाहिनीस अडथळा येतो, आणि पित्त रक्तांत मिसळून शरिरास पिंवळेपणा येतो, त्या रोगास कामला असें ह्मणतात. याचे दोन प्रकार आहेत. १-कामला. २-कुंभकामला.

**कामलेचें लक्षण**:--डोळे, त्वचा, नखे व तोंड हीं हळदीसारखीं पिंवळीं होतात व मूत्र आणि मल लाल व पिंवळीं होऊन, पावसाळ्यांतल्या बेडकाप्रमाणें तो मनुष्य पिंवळा होतो, आणि दाह, अग्निमांद्य, दुर्बलता, अरोचक इ. विकार होतात.

**उपचारः**—या विकारावर औषधें देणें तीं पित्तघ्न असून, पांडुरोगास विरुद्ध नसावी. पहिल्यानें दूध किंवा तूप पाजून मग एरंडेल द्यावें, ह्मणजे रेच होऊन पित्तविकार कमी होईल. मग औषधी उपचार करावे. कोरफडीच्या कांद्याचा रस काढून, त्यांत तूप घालून नाकांत घालावा, ह्मणजे डोळे पिंवळे झाले असले तरी कामलेचा नाश होतो. २-गोड्या एरंडाचा २।३ तोळे पाला पावशेर दुधांत वाटून द्यावा. किंवा तांबड्या गुंजेचा पाला वाटून त्याची चिंचोक्याएवढी गोळी पावशेर दुधांतून द्यावी. **पथ्य**:—दूधभात, तूप, गव्हांची पोळी, वरण, इत्यादि ३–ह्माक्याचा रस १।२ तोळे, ६ मासे मिरपूड, व दहीं १ तोळा, असें मिश्रण, किंवा ह्माक्याचे रसांत मध २ मासे आणि खडीसाखर ६ मासे घालून तें, दिवसांतून एकदां द्यावें. **पथ्य**:-दूधभात. ४-यादी नंबर ५२ चा काढा द्यावा. ५--गाढवाची लीद १--२ तोळे घेऊन, २--३ तोळे दह्यांत वाटून पिळून फडक्यावर गाळून दिवसांत एकदां द्यावें हें महान पित्तापासून झालेली

कावीळ नाहींशी करते. ६--एक केळें घेऊन त्यांत दोन चमचे मध घालून प्रत्यहीं सकाळ संध्याकाळ तीन दिवस द्यावें. ७--मंडूरभस्म मधांतून द्यावें. ( यादी नं. ११३ पहा. ) ८--पांढरा कांदा व गूळ एकत्र वाटून त्यांत थोडी हळद घालून तें द्यावें. ९--गाईचे दुधांत सुंठ उगाळून द्यावी. १०--हळदीचें चूर्ण १ तोळा, आणि दहीं चार तोळे, एकत्र करून सकाळीं द्यावें. ११--तोळाभर चिंच घेऊन तिचा बळक थोडें पाणी घालून काढावा, आणि त्यांत पावल्या एवढा चुना घालून तें मिश्रण प्रत्येक वेळेस द्यावें. हें औषध ३ दिवस द्यावें. १२--काळ्या कुड्याच्या अंकुराचा रस प्रत्येक वेळेस २ तोळे द्यावा. हें औषध ३।७ दिवस द्यावें. **पथ्यः**--तूप, भात, दूध.

**कामलेचें असाध्य लक्षणः**--ज्याचा मळ काळा, मूत्र पिवळें, शरिराला सूज, डोळे, तोंड, वांति मळ आणि मूत्र हीं लाल, व जो वरचेवर मोह पावतो, तो किंवा दाह, अरुचि, तृषा, मूर्च्छा, अग्निमांद्य, हीं ज्यास्त आहेत तोहि असाध्य.

**कुंभकामलेचें कारण व लक्षणः**--कावीळ बहुत दिवस राहिली असतां वातादि दोष कुपित होऊन, त्यांपासून कुंभकामला होते. हिचें लक्षण--मूत्र व मळ हे कृष्णवर्ण व पीतवर्ण, अंगाला सुज, डोळे रक्तवर्ण, ओकारी, अरुचि, ज्वर, आणि खोकला, इत्यादि.

**उपचारः**--१--वर सांगितलेले कामलेवरील उपचार करावे. २--३।४ तोळे गोमूत्रांतून २।३ मासे शिळाजित द्यावें. ३--बेहड्याचे काष्टानें लोखंडाचें कीट जाळून गोमूत्रांत विझवावें, असें आठ वेळां करून नंतर बारीक खलून २।३ गुंजा चूर्ण मधाबरोबर द्यावें.

**कुंभकामलेचें असाध्य लक्षणः**--ओकारी, अरुचि, मळमळ, ज्वर, आयासावांचून श्रम, दमा, खोकला, अतिसार इत्यादि.

**पथ्यः**--ओकारी, रेच, तांबड्या साळी, गहूं, मूग, तुरी, पडवळ, कोंवळीं वांगीं, कांदे, लसूण, ताक, तूप, दूध, लोणी, आंवळे, पिका आंबा, हळद, तूरट पदार्थ इत्यादि.

**अपथ्यः**--धूम्रपान, मैथून, भूयमूग, पालेभाजा, हिंग, उडीद, विडा, मध, आम्लपदार्थ, जड व विदाही अन्न, इत्यादि.

## कास ( खोकला. )

वातादिदोष कुपित होऊन प्राणवायु तोंडांतून बाहेर येतो त्यास कास ह्मणतात.

**कारण**--नाकातोंडांतून धूर जाऊन दम कोंडणें, नाकातोंडांत धूळ शिरणें, रुक्षान्नाचें नित्य सेवन करणें, घाईघाईनें जेवतांना ठसका लागणें, मलमूत्रादिकांचा रोध, इत्यादि कारणांनीं हा उत्पन्न होतो.

**प्रकार व त्यांचीं नावें**:—१ वात कास, २ पित्तकास, ३ कफकास, ४ क्षतकास आणि ५ क्षयकास. यांजवर औषधोपचार झाला नाहीं तर त्यापासून क्षय-उत्पन्न होतो.

**पूर्वरूप**:—खोकला यावयाचा असला ह्मणजे घशांत आणि तोंडांत बारिक कांटे येतात, व गळ्यांत खवखवतें, आणि अन्न जात नाहीं.

**वातकास लक्षण**:—हृदय, शंख, मस्तक, उदर आणि पार्श्वभाग यांच्या ठिकाणीं शूल, तोंडाला कोरड, बल, स्वर, धातु आणि तेज यांचा क्षय, वरवर खोकला उसळणें, आणि कोरडा खोकला.

**उपचार**:—१--यादी नंबर ५६ किंवा ५७ चा काढा द्यावा. २--सुंठ, धमासा, कांकडाशेंगीं, द्राक्षें. कचोरा, व साखर, याचा तेलाशीं लेह करून द्यावा. ३--दशमुळें व सुंठ ह्यांचा काढा द्यावा. (दशमुळांचा काढा यादी नंबर १६ पहा.) ४--लवंगा, पांढरीं मिऱ्यें आणि बेहेडेदळ प्रत्येकीं एकेक भाग, आणि कात २ भाग, घेऊन सर्वांचें, वस्त्रगाळ चूर्ण करून, त्याचा बाभळीचे सालीचे काढ्यांत ४।५ दिवस खल करावा, आणि वाटाण्याएवढ्या गोळ्या करून त्या खडीसाखरेबरोबर तोंडांत धराव्या, आणि त्यांचें पाणी गिळावें. ५--बेहड्याची साल आणि जेष्टमध तोंडांत धरून त्याचें पाणी गिळावें.

**पित्तकास लक्षण**:—उरांत जळजळ, ज्वर, तोंडास कोरड व तें कडू, तहान फार, पिंवळी आणि तिखट वांति, व चोहोंकडून पेटल्यासारिखें होणें.

**उपचार**:—१--अडुळसा, गुळवेल व रिंगणी यांच्या काढ्यांत मध घालून द्यावा. तो पित्तकफात्मक कास, दमा, ज्वर आणि क्षय यांचा नाश करितो. २--कचोरा, वाळा, रिंगणी, व सुंठ यांचा काढा करून त्यांत २ मासे मध व ४ मासे तूप घालून द्यावा.

**कफकास लक्षण**:—तोंड आंतून कफानें सारविल्यासारिखें, ग्लानि, मस्तकास वेदना, अरुचि, शरिरास जडपण, कंडू, वरवर खोकला, आणि कफ दाट पडणें.

**उपचार**:—१--पिंपळी, जायफळ, सुंठ कांकडशिंग, भारंगमूळ, मिरीं, ओंवा निर्गुंडी, रिंगणी, अजमोदा, चित्रक, व अडुळसा यांचे काढ्यांत पिंपळीचें चूर्ण घालून तो द्यावा. २-यादी नं. ५६ किंवा ५७ चा काढा द्यावा.

**क्षतकास लक्षण**:—अति मैथून, अति भार वाहणें, अति मार्गगमन, मल्लयुद्ध इत्यादि कारणांनीं रुक्ष पुरुषाचा ऊर फुटून, वायूचा कोप होतो, आणि खोकला उत्पन्न होतो. त्या रोग्याला प्रथम नुसती ढांस लागते आणि मग रक्त पडूं लागतें. घसा फार दुखतो, ऊर फुटल्यासारिखा होतो, व तीक्ष्ण सुयांनीं टोंचल्यासारिखी

पीडा होते, स्पर्श सहन होत नाहीं, व ज्वर, श्वास, तृषा, शूल, इत्यादि लक्षणें होतात व रोगी पारव्यासारिखा घुंघु शब्द करितो.

**उपचारः**—१–बेदाणा १ तोळा, पिंपळाची लाख २ मासे, मध २ मासे व तूप ४ मासे, घेऊन एकत्र करून प्रत्येक वेळेस द्यावें. शंखजिऱ्याची पूड २ मासे, दुध ४ तोळे, व तूप ३ मासे एकत्र करून प्रत्येक वेळेस द्यावें. २–बिया काढिलेल्या मनुका ५ भाग, तूप २ भाग, व मध १ भाग याप्रमाणानें घेऊन एका बरणींत भरून तोंडास घट्ट बूच बसवून ती बरणी साळींत किंवा तांदुळाचे राशींत १५।२० दिवस पुरून ठेवावी, मग त्यांतील औषध रोज सकाळ संध्याकाळ १–१॥ तोळा द्यावें.

**क्षयकास लक्षणः**—विषम भोजन, अति मैथून, मलमूत्रादि वेग धारण, इत्यादिकांनीं अग्नि नष्ट होऊन, तीनहि दोषांचा कोप होऊन खोकला उत्पन्न होतो. मग रोग्यास गात्रशूल, ज्वर, दाह हे विकार उत्पन्न होतात. रोगी वाळूत जातो, त्याच्या शरिरांत मांसाचा लेश रहात नाहीं. व खोकतां खोकतां कफाचा जो बेढका पडतो त्यांत रक्त आणि पू असतो, त्यास क्षयकास ह्मणतात.

**उपचारः**—१ या कासाला पाचक पौष्टिक व शामक व पित्तकासाला शमविणारीं औषधें, व दुसरीं मधुर औषधें, यांनीं शमवावें. २– पिंपळी व गूळ यांनीं सिद्ध केलेलें तूप, शेळीच्या दुधाबरोबर प्यावें, ह्मणजे क्षयकासी मनुष्याचा अग्नि प्रदीप्त होईल ३–पिंपळी, पद्मकाष्ट, लाख व चांगलें पिकलेलें रिंगणीचें फळ, समभाग घेऊन एकत्र वाटून त्याचा तूप व मध याशीं लेह करून प्रत्येक वेळेस ६ मासे द्यावा. ४–अर्जुन वृक्षाचे सालीचे चूर्णास अडुळशाचे रसाच्या १०–१२ भावना देऊन तें प्रत्येक वेळेस ३ मासे घेऊन मध † तूप व खडीसाखर याच्याबरोबर थोडें खावें. ५–प्रवाळभस्म द्यावें (यादी नंबर ११२ पहा). ६–पुढें ‘ राजयक्ष्मा ’ या प्रकरणांत “ उरःक्षतक्षय ” यावर सांगितलेले उपचार करावे.

**साध्यासाध्य विचारः**—क्षयजकास क्षीण पुरुषांस घातक होतो. व बलवान् पुरुषाचा असाध्य अथवा याप्य होतो. क्षतजकासहि याप्रमाणेंच आहे. हे दोन्ही कास नवे असले तर साध्य होतात. बाकीचे तीन कास साध्य आहेत.

**सर्व प्रकारचे कासांवर उपचारः**—१–काटेरिंगणी, भारंगीचें पाळ व सुंठ प्रत्येकीं ६ मासे, बेहडेदळ १ तोळा, आणि खडीसाखर १ तोळा, यांचा काढा करून त्यांत मध घालून घ्यावा. सोसेल तर काढ्यांत थोडी पिंपळीची पूड घालावी. या काढा फार चांगला आहे. २–धोतऱ्याच्या मुळ्या सुंबरांत भाजून संध्येची अर्धी पळी रस काढून त्यांत १ तोळा खडीसाखर घालून द्यावा. सुंठ, बेहडेदळ आणि खडीसाखर एकत्र तोंढांत धरून पाणी गिळावें; ह्मणजे तावडतोब खोकला कमी होऊन

† तूप व मध समभाग घेऊं नये.

कफ सुटतो. ३--रुईच्या फुलांतील मोख व मिऱ्यें समभाग एकत्र वाटून गोळ्या कराव्या, आणि प्रत्येक वेळेस २ ३ गुंजांची गोळी खडीसाखरेबरोबर द्यावी. ४--बेहडेदळ, कांटेरिंगणी आणि खडीसाखर यांचा काढा द्यावा. ५--यादी नंबर ५६।१३६-५७।१४२।१५३।१५४ यांपैकीं एकादें औषध द्यावें. ६--काळ्या धोतऱ्याचें पंचांग ( मूळ, पत्र फूल, त्वचा, फळ ) घेऊन चिलमींत घालून ओढावें, ह्मणजे तत्काळ गुण येतो. ७--कुमारीआसव द्यावें. ( यादी नंबर १७८ पहा. ) ८--सूतशेखर द्यावा. ( यादी नंबर १४३ पहा. ) ९--पंचामृत पर्पटी द्यावी. ( यादी नंबर १३० पहा. ) बेहडेदळ २ भाग व पिंपळी १ भाग यांचें चूर्ण मधांतून द्यावें. १०--अभ्रक भस्म द्यावें. (नंबर १०९ पहा.) ११--भेल्याचें फळ व सुंठ प्रत्येकीं ३ मासे घेऊन पाण्यांत उगाळून ६ मासे खडीसाखर घालून कढवून चाटण करून त्यांतून शंखभस्म द्यावें. ( यादी नंबर ११५ पहा. ) १२--शीतोपलाचूर्ण द्यावें. ( यादी नंबर ८८ पहा. ) १३--बिब्बुल्यारिष्ट द्यावें. ( यादी नंबर १७९ पहा.) १४--कामदुधा हें औषध द्यावें. ( यादी नंबर १२१ पहा. ) १५--कासकेसरी हें औषध द्यावें. (यादी नंबर १२३ पहा. ) १६--प्रतापलंकेश्वर द्यावा. ( यादी नंबर १३१ पहा. )

**पथ्यः**—साटक्यासाळी, गहूं, मूग, कुळीथ, शेळीचें दूध, तोंडलें, तूप, वांयगें कोंवळे मुळे, महाळुंग, गोस्तनी द्राक्षे, लसूण, लाह्या, सुंठ, मिरीं, पिंपळी, ऊनपाणी, मध इत्यादि.

**अपथ्यः**—मैथून, स्निग्ध व मधुरपदार्थ, दिवा निद्रा, दूध, दहीं, पिष्टान्न, क्षीर, धूम्र इत्यादि.

**विशेष सूचनाः**—खोकला कमीं करण्यास किंवा कफ सुटत नसला तर तो पातळ होऊन सुटण्यास, कोरफडीचा रस, आडूळशाचा रस, बेहडेदळ, भारंगमूळ, हळद किंवा खडीसाखरेचा पाक, यांपैकीं एखादें औषध द्यावें; व दुसरें एखादें औषध द्यावयाचें असेल तेव्हां यांपैकींच अनुपान योजावें.

## कुष्ट ( त्वक्‌दोष )

**लक्षणः**—वातादि दोष, त्वचा, रक्त, मांस आणि उदक यांस दुष्ट करून, ते दोष शरिरावर फोड, पुळ्या, चकदर्णे वगैरे उत्पन्न करितात त्यांस कुष्ट असें ह्मणतात.

**प्रकारः**—पांढरें व तांबडें कोड, शिबें, गजकर्ण, हातापायांस भेगा पडणें, खरूज, दद्रू इ० अठरा प्रकार मानिले आहेत. यांपैकीं शिबें, गजकर्ण, खरूज आणि हातापायांस भेगा पडणें ( जाळवात ) हीं प्रकरणें या पुस्तकांत स्वतंत्र लिहिलीं आहेत तीं पहावीं.

**सर्व कुष्टांवर उपचारः**—१--महिन्यांतून एकदां रेचक औषध द्यावें. व

रक्तशुद्धिवरील उपचार करावे. २–**मंजिष्टादि काढा**–मंजिष्ट, कडुनिंब, रक्तचंदन, नागरमोथा, गरुडवेल, वृंदावन,अडुळसा, त्रायमाण, निशोत्तर, आसाणी, हळद, दारू-हळद, किराईत, पाडळमूळ, अतिवीष, खैर, हरडा, बेहेडा, आंवळकटी, कडूपडवळ, कटुकी, वावडिंग, पित्तपापडा, वेखंड, बांवची आणि कुड्याची साल, ही औषधें सम-भाग घेऊन त्यांचा काढा करून घ्यावा. ह्मणजे कंडू, खरूज, व्रण, शिबें, पांढरें कोड गजकर्ण, इ० १८ प्रकारचीं कुष्टें दूर होतील. ३–कैशोरगुग्गुळ द्यावा. ( यादी नंबर १४७ पहा ) ४–गंधकरसायन द्यावें ( यादी नंबर १२४ पहा ) ५–खैराचे सालीचा काढा द्यावा. ६–हरताळ ४ मासे व बांवच्या १६ मासे घेऊन गोमूत्रांत वाटून लेप करावा.

**पथ्यः**—यव, गहूं, भात, मूग, तूर, मसूर, मध, पडवळ, वांगें कडूलिंबाचा पाला, चाकवत, लसूण, टाकळा, बिबवा, खैर, त्रिफळा, नागकेशर, तूप, गोमूत्र इ०

**अपथ्यः**—आंबट, तिखट, खारट, दहीं, गूळ, तेल, उडीद, स्त्रीगमन, ऊंस मेहनत, मद्य, दूध, इ०

**वि० सू०**—पांढरें व तांबडें कोड हें जाणें फार दुर्घट आहे. तथापि वर उपचार लिहिले आहेत त्यांपैकीं नं. २ चा काढा किंवा प्रकरण ७ यादी नं. ८२ हा काढा बहुत दिवस द्यावा. इतर उपचारहि करून पथ्य करावें म्हणजे कदाचित् विकार जाईल.

ज्यावरील केंस पांढरे झाले नाहींत व जें पातळ असून एकमेकांस लागलेलें नाहीं, व जें नवीन आहे तें बरें होण्याची आशा आहे. पण गुह्यस्थानीं, हातावर, तळ-पायावर व ओंठावर, झालेलें कोड थोड्या दिवसांचें असलें तरी असाध्य आहे.

## कंडू.

हा विकार रक्त दोषापासून होतो.

**उपचारः**—१–यादी नंबर १८७।१८८।२०१ पहा.

२–" रक्तशुद्धी " प्रकरण पहा.

## कांजिण्या.

कांजण्या हा फार हलका रोग आहे. एक दिवस थोडासा ताप येऊन दुसरे दिवशीं छाती, पाठ, खांदे, यांवर बारिक लाल पुळ्या दिसूं लागतात. १।२ दिवसांत पाणी भरून त्या मोत्यांसारख्या होतात ६।७ दिवसांनीं खपल्या पडतात. औषधांची जरूर नाहीं परन्तु काळीं द्राक्षें व धने यांचा काढा देण्यास हरकत नाहीं. शौचास साफ होणे फक्त जरूर असतें पथ्यावर राहावें. मुलांस खाजवूं देऊं नये.

## कृमि ( जंत )

**कृमि होण्याचीं कारणें**ः—अजीर्णावर भोजन, निरंतर गोड खाणें, आंबट पदार्थ व द्रव पदार्थ फार खाणें, गुळ आणि पीठ ह्यांनीं केलेले पदार्थ फार खाणें, व्यायाम न करणें, दिवसास निजणें, इत्यादि.

**कृमि झाल्याचीं लक्षणें**ः—ज्वर, शरिराचे ठायीं निस्तेजपणा, शूल, हृदयांत पीडा, ओकारी, अतिसार, मळमळ, अस्वस्थता, अरोचक इ०

**कृमींचे प्रकार**ः—मनुष्याचे पोटांत १८ प्रकारचे कृमि होतात.

**उपचार**ः—१—लिंबाऱ्याची साल मोठ्यास सुमारें १ तोळा व लहानास पैसाभार घेऊन त्यांत ५।६ तोळे पाणी घालून काढा करावा, आणि शेष काढा १—१॥ तोळा राहिला ह्मणजे द्यावा ( अगदीं लहान मुलांस अर्ध तोळापर्यंत द्यावा. ) हा काढा अप्रतिम औषध आहे. मात्र सतत आठ चार दिवस देऊं नये. २।३ दिवस द्यावा. हा फार दिला तर समयीं अंगांत कैफ आल्यासारिखें होतें, तसें होईल तर तूप पाजावें. या झाडाचे दोन प्रकार आहेत. एक माजरा व दुसरा गोडा. गोडा असेल त्याची साल घ्यावी. माजऱ्याची साल घेऊं नये. २-इंद्रजव बिबवा आणि वावडिंग हे जिन्नस समभाग घेऊन एकत्र वाटून प्रत्येक वेळेस सुमारे १ माशाएवढां गोळी दिवसांतून दोन वेळां द्यावी. ३-पळसाची बी, चोरओंवा आणि वावडिंग समभाग घेऊन गोमूत्रांत एकत्र वाटून प्रत्येक वेळेस सुमारें एक मासा औषध द्यावें. ४-वावडिंगाचा काढा करून त्यात वावडिंगांचें चूर्ण घालून द्यावा. ५-सुंठ, मिरीं, पिंपळी, वावडिंग, इंद्रजव आणि चोरओंवा हे जिन्नस समभाग घेऊन त्यांचें वस्त्रगाळ चूर्ण करून तें भाताचे पेजेबरोबर द्यावें. ५—कापूर व केशर प्रत्येकीं सुमारें १ गुंज घेऊन एकत्र खलून गूळ घालून गोळी करून द्यावी. ७-करनाटकी घोंगडीचे तुकडे जाळून त्याची राख २।३ मासे, व २-२॥ गुंजा हिंग एकत्र करून, तें अदपाव दुधांतून प्रत्येक वेळेस द्यावें. याप्रमाणें दोन तीन दिवस करावें. ८--कडुलिंब, ओंवा, वावडिंग यांचें समभाग चूर्ण मधाशीं द्यावें. ९--डिकेमालीचें चूर्ण साखरेबरोबर द्यावें. १०—बिबवा दह्याबरोबर अगर चिंचेबरोबर द्यावा. ११-यादी नं. २०० हें औषध द्यावें.

**वि० सू०**-हा विकार उत्पन्न झाल्याचीं साधारण लक्षणें दिसत असूनहि दुर्लक्षानें केव्हां केव्हां उपचार होत नाहीं. पण तसें झाल्यानें विकार वाढत वाढत जाऊन अकस्मात फार भयंकर स्थिति होते. ताप, अंगाची फार तळमळ, अन्नद्वेष, ओकारी, शूल, आणि अतिशय शेष हे विकार एकदम होतात; आणि ४।२ दिवसांत मूल जातें, असें आह्मीं पाहिलें आहे. ह्मणून मुद्दाम सूचना करितों कीं, अशा वेळीं सँन्टोनाइन म्हणून जें इंग्रजी औषध आहे तें द्यावें. रात्रीं सँन्टोनाइन साखरेंतून देऊन सकाळीं एरंडेल द्यावें ह्मणजे जंत पडून मूल मोकळें होईल. अशा वेळीं इतर औषधांचा तात्काळिक

उपयोग होत नाहीं. सँन्टोनाइन हें औषध या विकारावर फार उत्तम आहे. याचें साधारण प्रमाण लहान मुलास $\frac{1}{6}$ गुंज व मोठ्या मुलास अर्धगुंज धरावें.

**पथ्यः**—रेच, तिखट, कडू व तुरट असे रस, कफ व कृमि यांचें नाशक आणि अग्निदीपक असें भोजन, व कफ नाशक पदार्थ, तांबडें भात, पडवळ, लसूण, चाकवत, मोहऱ्या, वावडिंग, कडूनिंबाचा पाला, दह्याची निवळी, हिंग, क्षार, अजमोदा, इत्यादि.

**अपथ्यः**—थंडपाणी, मधुररस, क्षीर, दहीं, तूप, पालेभाज्या, गोडपदार्थ, पिष्टान्न, उडीद इत्यादि.

### खरूज.

मलीनपणानें, संसर्गानें, किंवा पोटांत उष्णता जाहल्यानें खरूज उत्पन्न होते, याजकरितां या गोष्टींकडे विशेष लक्ष द्यावें.

**उपचारः**—प्रथम रेचक द्यावें ह्मणजे कोठा साफ होतो. साबण लावून किंवा ऊन पाण्यानें खरूज धुऊन टाकावी. २—चित्रकाची पाळें कुटून त्याचा रस नारळाचे रसांत घालून कढवून तेल तयार करावें व तें खरजेस लावावें. ३—शुद्ध केलेला आंवळ्यागंधक १ मासा आणि लोणी ६ मासे असें एकत्र करून लावावें. ४—कवठेल तेल घेऊन त्यांत गंधक कापूर शेंदूर आणि लिंबाचारस घालून खलून लावावें. ५—कंवठेल तेलांत चुन्याचें पाणी घालून कढवावें, आणि तें तेल लावावें ह्मणजे लहान मुलांस डोकींत वगैरे खरूज होते ती बरी होईल. ६-जिरें, शहाजिरें, हळद, आंबे-हळद, मिरीं, शेंदूर, गंधक, मनशीळ आणि पारा हीं औषधें समभाग घेऊन तुपांत खल करून लेप करावा. ७—करंदीचें पाळ पाण्यांत उगाळून लावावें. ८—पिंपळाचे सालीची राख व चुना लोण्यांत एकत्र खलून तें लावावें. ९—कंवठेल, रुईचा चीक, गोमूत्र, व हळदीची पूड, समभाग एकत्र करून तें लावावें. १०—तीन चार मासे आंवळ्या गंधक तुपाबरोबर किंवा केळ्याबरोबर द्यावा. ११—चंदनी तेल ( कोरडी खरूज असल्यास ) लावावें. १२--यादी नं. १८१—१८२ हीं औषधें लावावीं.

### गजकर्ण.

**उपचारः**—१ तुरटी, राळ, गंधक आणि टांकणखाराची लाही प्रत्येकी १ तोळा, व सोमल १ गुंज घेऊन एकत्र कुटून थंड पाण्यांत कालवून लावावें. २—यादी नंबर १६८ चें औषध लावावें, किंवा बाभ्याचा पाला बारीक वाटून गजकर्णावर चोळावा. हा पाला चोळण्याचे अगोदर गजकर्णाची जागा चाकूनें अगर गवरीनें थोडी खरवडावी. ३—कापूर गंधक कात आणि फटकी ( तुरटी ) समभाग घेऊन, लिंबाचे रसांत खल करून तें लावावें. ४—आंवळ्यागंधक व मोरचूत समभाग घेऊन

त्यांची पूड करावी, नंतर ताकांत बाभ्याचा पाला भिजत घालून वाटून त्याचा रस काढावा, आणि त्यांत वरील पूड घालून त्याचा तीन दिवस लेप करावा. ५—पपयाच्या हिरव्या फळाचा चीक लावावा. ६—हरभऱ्याची आंब आणि गजकर्णीच्या पाल्याचा रस एकत्र करून तें मिश्रण बोळ्यानें लावावें ७—यादी नंबर २०१ चें औषध लावावें.

## गर्भवति स्त्रियांचा अतिसार.

**उपचार**:—(१) यादी नंबर २०२ पहा. (२) धावशीचे फुलांचें चूर्ण एक तोळा, तांदुळाचे धुवण ४ तोळे, १ पैसाभार खडीसाखर व संध्येच्या पळीभर मध घालून देणें. दर तीन तासांनीं २ वेळां किंवा जास्त वेळ दिल्याने अतिसार थांबतो.

## गुडघी.

गुडघा दुखूं लागला ह्मणजे त्यास गुडघी ह्मणतात. हा विकार शैत्य झाल्यानें, किंवा संधिस्थानीं आघात झाल्यानें, संधि लचकल्यानें, किंवा उपदंश, आमवात, वगैरे झाल्यानें होतो.

**उपचार**:—१ उपदंश किंवा आमवात यांपासून गुडघा दुखत असल्यास त्या त्या प्रकरणांत सांगितलेले उपचार करावे. २—जळवा लावून रक्त काढावें, व मग खसखशीचे बोंडांचे काढ्यानें शेक द्यावा. ३—हरडा, बेहडा व आंवळकटी यांचे काढ्यांत गुग्गूळ घालून द्यावा. ४—फड्या निगडुंगाचें पान फुपाट्यांत भाजून वरचे कांटे काढून टाकावे, आणि त्याचे दोन तुकडे करून, वर हळद टाकून ऊन असतांच गुडघ्यास बांधावें. ५—यादी नंबर १६६ चें तेल लावावें. ६—गुडघ्यावर डांग द्यावा.

## गुल्म.

वातादि दोष कुपित होऊन ते पोटांत ग्रंथी (गोळा) उत्पन्न करितात, त्यास गुल्म असें ह्मणतात. हा गोळा चल अथवा अचल आणि वाटोळा असतो मोठा होतो व लहान होतो.

**याचीं स्थानें**:—दोन्ही पार्श्वभाग, नाभी, बस्ति आणि हृदय हीं आहेत.

याचे ५ प्रकार मानितात. त्यांचीं नांवें कारणें लक्षणें आणि उपचार खालीं लिहितों.

**पूर्वरूप**:—ढेंकर पुष्कळ येणें, मलावरोध, अन्नावर वासना नसणें, आंतड्यांत कुरकुर असा शब्द होणें, पोट दुखून फुगणें, पोट ताठणें, आणि मंदाग्नि, हीं लक्षणें झालीं ह्मणजे गुल्म होणार असें समजावें.

**याचें साधारण स्वरूप व प्रकारः**—अरुचि, मलमूत्र कष्टानें होणें, आंतड्यांत कुरकुर असा शब्द होणें, पोट फुगणें, ऊर्ध्व वायु होणें, इत्यादि. याचे प्रकार आठ आहेत. त्यांतून मुख्य मुख्य लिहितों:—

**१–वातगुल्मः**—याचें कारण व स्थान–हा वायूचें कोपानें नाभी बस्ती किंवा पार्श्व, यांचे ठायीं होतो. **लक्षणः**—एका स्थानापासून दुसऱ्या स्थानीं जाणें. एखादे वेळेस कमी व एखादे वेळेस जास्त पीडा करणें, आणि मळ व वायु यांचा प्रतिबंध, गळा व तोंड यांस कोरड, शरिराचा वर्ण निळा किंवा तांबूस, हृदय, कुशी, पार्श्व, खांदे आणि डोळे दुखणें, अन्न जिरलें असतां अधिक होणें, व जेवल्यानंतर कमी होणें इत्यादि.

**उपचारः**—१–प्रथम रेचक द्यावें नंतर औषधी उपचार सुरू करावे. पिंपळी, पिंपळमुळ, चित्रक, जिरें, आणि सैंधव समभाग घेऊन त्यांचें ३- ६ मासे चूर्ण मधाबरोबर द्यावें. २-दूध ४ तोळे, एरंडेल १ तोळा, आणि बाळहरड्यांचें चूर्ण ४ मासे एकत्र करून द्यावें. ३-आपट्याच्या पाल्याचा रस २|३ तोळे, मिऱ्यांची पूड सुमारें २ मासे व ५|६ थेंब तिळांचें तेल असें एकत्र करून द्यावें. ४-सज्जीखार, कोष्टकोलिंजन, केतकीचा क्षार, आणि तिळाचें तेल, समभाग एकत्र करून, त्यांतील मिश्रण प्रत्येक वेळेस १—१॥ तोळा द्यावें. ५-यादी नंबर ८३ चें चूर्ण द्यावें. ६-पुढें लिहिलेले "सर्व प्रकारचे गुल्मांवर उपचार" यांतील नंबर ४ चें औषध द्यावें.

**२. पित्तगुल्मः**—याचें कारण-तिखट, आंबट, उष्ण, इत्यादि पित्तप्रकोपी पदार्थांचे सेवनानें पित्ताचा कोप होऊन हा गुल्म होतो. **लक्षणें**:-याचे ठायीं ज्वर, तृषा, तोंड आणि अंग यांना लाली, अन्न जिरत असतां फार शूल, घाम येणें, गुल्माला हात लाविला असतां व्रणाप्रमाणें सहन न होणें इत्यादि.

**उपचारः**—१–त्रिफळेचा काढा करून, त्यांत निशोत्तराचें चूर्ण ४ मासेपर्यंत घालून द्यावा, ह्मणजे साधारण रेच होऊन गुल्माचा नाश होईल. २-"सर्व प्रकारचे गुल्मांवर उपचार" या सदरांतील नंबर ४ चें औषध द्यावें. ३-द्राक्षांचा रस १ तोळा, बाळहरीतकीचें चूर्ण ४ मासे, व गूळ ६ मासे एकत्र करून द्यावें. आंवळ्यांच्या रसांत चतुर्थांश तूप घालून पचन करावें, आणि शेष तूप राहिल्यावर तें प्यावें.

**३. कफगुल्मः**--याचें कारण--शीतल, जड, स्निग्ध, इत्यादि कफकारक पदार्थांचें अति सेवनेंकरून कफ कुपित होऊन त्यापासून हा गुल्म होतो. **लक्षणें**:--याचे ठायीं अंगाला ओलसरपणा, शीतज्वर, शरिराची ग्लानि, मळमळ, खोकला, अरुचि, जडत्व, शैत्य, थोडी पीडा, गुल्म कठीण असून उचललेला, इत्यादि.

**उपचारः**—१. ओंवा ४ तोळे आणि बीडलोण १ तोळा यांचें चूर्ण करून ३ मासे चूर्ण ताकांतून द्यावें. २-"सर्व प्रकारचे गुल्मांवर उपचार" या सदरांतील नंबर ४ चें

औषध द्यावें. ३-नाराचरस द्यावा. ( यादी नंबर ८५ पहा. ) ४-एरंड किंवा रुई यांचीं पानें गरम करून त्या पानांनीं पोट शेकावें.

४. **सन्निपातगुल्म**ः—जीं वातादि गुल्माचीं कारणें व लक्षणें वर सांगितलीं आहेत, तींच सन्निपात गुल्माचीं समजावीं. हा पाषाणासारखा कठीण व उंच असा असतो. व तो शरिराचा दाह करितो.

**उपचार**ः—१- चित्रक, पिंपळ मूळ, एरंड मूळ, व सुंठ यांचें समभाग चूर्ण एकत्र करून, त्यांतील ३ मासे चूर्ण मधाबरोबर द्यावें. २--बाळहरड्यांचें चूर्ण ४मासे व सैंधव आणि पादेलोण प्रत्येकीं २ मासे, असें ताकांतून द्यावें.

५. **रक्तगुल्मः**—याचें कारण व लक्षण नवीन प्रसूत झालेल्या स्त्रीनें अपथ्य भोजन केलें असतां, अथवा अपक्क गर्भपात झाला, असतां अथवा ऋतुकाळीं अपथ्य भोजन केलें असतां, वायूचा कोप होऊन तो वायु त्या स्त्रीचें रक्त ( ऋतुकाळीं स्रवतें तें ) घेऊन त्याचा गुल्म करितो. याचीं लक्षणें पित्तगुल्माच्या लक्षणासारखीं असून, हा फार वेळानें सर्व गोळाच अवयव नसतां गर्भासारख्या ढुसक्या मारितो व शूलयुक्त असतो. याचीं गर्भाच्या लक्षणासारखींच लक्षणें असतात. ( विटाळ न येणें, तोंडाला पाणी सुटणें, स्तनाच्या बोंड्या काळ्या पडणें, आणि डोहाळे लागणें इ० ) हा रक्तज-गुल्म स्त्रियांसच होतो. दहावा महिना गेल्यावर याची चिकित्सा करावी.

**उपचार**ः—१ त्रिफळेच्या काढ्यांत गुग्गुळ घालून द्यावा. २ भारंगमूळ, पिंपळी, करंजाची साल, पिंपळमूळ आणि देवदार, समभाग घेऊन त्यांचें चूर्ण करून त्यांतील ३।४ मासे चूर्ण, ३ तोळे तिळांचा काढा करून त्यांतून द्यावें. ३ पारा, गंधक, मोरचूत, जेपाळ, पिंपळी, बाळहरडे व बाव्याचे शेंगेचा मगज हीं समभाग घेऊन, काटेनिगडुंगाचे चिकांत खल करावा, आणि गुंजप्रमाण गोळ्या बांधून सोसेल त्या मानानें १ अगर २ अगर ३ गोळ्या मधांतून द्याव्या. **पथ्यः**—अदमुरें आणि भात किंवा दूध भात. ४—" सर्व प्रकारचे गुल्मांवर उपचार " या सदरांतील नं. ४ चें औषध द्यावें.

**सर्व प्रकारचे गुल्मांवर उपचार**ः—१--यादी नंबर १६ चा काढा द्यावा. २—कैशोरगुग्गुळ द्यावा. (यादी नंबर १४७ पहा.) ३—शंखवटी द्यावी. (यादी नंबर १४१ पहा. ) ४ ओंवा, जिरें, धने, मिरीं, विष्णूक्रांता आणि अजमोदा हीं औषधें एकेक भाग, भाजलेला हिंग १॥ भाग, जवखार, सज्जीखार, सैंधव, संचळखार, बीडलोण, समुद्रमीठ बांगडखार आणि निशोत्तर हीं औषधें प्रत्येकीं दोन दोन भाग, व दांतीमूळ, पुष्करमूळ, कचोरा, वावडिंग, डाळिंबसाल, बाळहरडे, आम्लवेतस आणि सुंठ हीं औषधें प्रत्येकीं चार भाग, अशीं घेऊन सारी औषधें कुटून, चूर्ण करून महाळुंगाच्या रसांत खलून, प्रत्येक गोळी माशा माशाची बांधावी, आणि वातगुल्म असल्यास मधांतून द्यावी; पित्तगुल्म असल्यास गाईचे दुधांतून द्यावी. कफगुल्म असल्यास गोमूत्रांतून द्यावी. त्रिदोष

गुल्म असल्यास दशमुळांचें काढ्यांतून द्यावी; रक्तगुल्म असल्यास उंटीणीचे दुधांतून द्यावी. ५–वज्रक्षार ऊन पाण्यांतून किंवा तुपांतून द्यावा. (यादी नंबर १३९ पहा). ६–कुमारीआसव द्यावें. (यादी नंबर १७८ पहा). ७–यादी नंबर ८६ चें चूर्ण द्यावें. ८–ज्वरमुरारी द्यावा. ( यादी नंबर १२६ पहा ). ९–योगराजगुग्गुळ द्यावा. (यादी नंबर १५० पहा). १०–जवखार, चित्रक, सुंठ, मिरीं, पिंपळी, नीळ, व *लवण पंचक, समभाग घेऊन चूर्ण करून त्यांतील ३ मासे चूर्ण तुपाशीं द्यावें. हें संपूर्ण उदरें व गुल्म यांचें नाशक आहे.

**पथ्यः**—रेच, लंघन, अभ्यंग, तांबड्या साळी, कुळीथ, साखर, दूध, डाळिंब, ताक, लसूण, कोहाळा, मुळा, सुंठ, चाकवत, शेवगा, द्राक्षें, महाळुंग, हिंग, इत्यादि.

**अपथ्यः**—गोडफळें, पावटे, चवळ्या, केळें वगैरे सर्व वातूळ पदार्थ, व सर्व प्रकारचीं शिंबी ( द्विदळ ) धान्यें, इत्यादि.

## गोवरें.

गोवरें ह्मणजे एक प्रकारचा अंगावर पुरळ उठणें. हा रोग बहुधा मुलांस होतो. **चिन्हें**–गोवरांत पहिल्यानें तापाचीं सर्व लक्षणें होतात. पडसें येतें, शिंका वरचेवर येतात, घशाची व नाकाची आंतील त्वचा लाल होते, व त्यांतून पाणी वाहत असतें, डोळे लाल व पाण्यानें भरलेले असे होतात, कोरडा खोकला लागतो, व बहुधा शौचास साफ होत नाहीं. ज्वर आल्यापासून ३।४ दिवसांनीं शरिरावर गोवरें (पुरळ) उगवूं लागतें. हा पुरळ पहिल्यानें कपाळ, तोंड, मान व छाती यांवर उठून, मग हातापायांवर पसरतो. पुरळ, पिसवा डसून जशी जागा होते त्याप्रमाणें लाल भडक रंगाचा व अर्धचंद्राकृति मंडलाप्रमाणें पसरलेला असतो. हा ५।६ दिवसांनीं मावळूं लागतो. याचा उगम हळुहळु होत जाणें, व उगम होत असतां एकाएकीं मावळणें हें चांगलें लक्षण नव्हे. अशा मुलांस भीति असते.

**उपचारः**—१–गोवर्धन सुमारें १-१॥ गुंज दुधांत उगाळून द्यावें ह्मणजे गोवरें चांगलें उगवतें. २–जेष्टमध, नागरमोथे, हरडेदळ, गुलाबकळी, आणि वाळा, यांचा काढा खडीसाखर घालून दिवसांतून दोनदां द्यावा. ३–गोवरें आलेल्या मुलांस तें मावळून १५।२० दिवस होतपर्यंत थंड हवेंतून फिरूं देऊं नये. अंगावर उबदार पांघरुण द्याव. खोकला झाल्यास खडीसाखरेचा काढा द्यावा.

## गंड ( गलगंड–गालगुंड. )

मान व गळा यांचे संधीचे ठिकाणीं ग्रंथीरूप सूज येते, तीस गंड ( गलगंड गालगुंड ) ह्मणतात.

---

*लवणपंचक—मीठ, टांकणखार, रुचक, बीडलोण, संचळ.

ह्या विकार वायु व कफ हे गळ्यांचे ठायीं दुष्ट होऊन, व कान किंवा मानेचे ठायीं दुष्ट होऊन, त्यापासून उत्पन्न होतो.

**उपचारः**—१--हुलगे व मिरीं प्रत्येकीं १ तोळा घेऊन त्यांचा काढा द्यावा. २--बचनाग लिंबाचे रसांत उगाळून लेप द्यावा. ३--हरताळ गोमूत्रांत उगाळून लेप द्यावा. ४--हिराकस आणि बिबवे रुईच्या चिकांत उगाळून लेप करावा. ५--शिरदोडी ह्मणून एक वेल आहे तिचे पाल्याचा रस लावावा. ६ धोतऱ्याचा पाला वाटून आंत चुना घालून तो लावावा.

## गंडमाला.

कफानें मेद दुष्ट होऊन त्यापासून कांख, बाहुमूल, मान, गळा, व अडसंधी यांचे ठिकाणीं लहान किंवा मोठ्या बोराएवढ्या, किंवा आंवळ्याएवढ्या अशा अनेक गांठी येतात. त्या गांठीच्या ओळीला गंडमाला ह्मणतात. त्या फार दिवसांनीं हळुहळु पिकतात.

**उपचारः**—१--बिब्याचें तेल, तिळाचें तेल, चुना आणि साबण समभाग घेऊन, एकत्र करून दोन चार घटका खल करावा, आणि तें मलम ७ दिवस लावावें; नंतर तरसाची विष्टा मनुष्याचे मूत्रांत कालवून लेप द्यावा. २--निर्गुंडीची मुळी थंड पाण्यांत उगाळून २१ दिवस लावावी. ३--हिराकस आणि बिबवे रुईच्या चिकांत उगाळून गंडमालेवर लेप करावा. ४--शेंदूर आणि शिंपीचा चुना समभाग घेऊन त्यांचे दुप्पट दहीं घेऊन एकत्र करून लेप द्यावा. ५--हुलगे व मिरीं प्रत्येकीं एक तोळा घेऊन त्यांचा काढा द्यावा. ६-यादी नंबर २०५ चें औषध करावें. ७-बचनाग लिंबाचे रसांत उगाळून लेप द्यावा. ८ कापूरभेंडीचें मूळ थंड पाण्यांत उगाळून लेप करावा. ९-भुईचांफ्याची मुळी, काजऱ्याची बी आणि बचनाग समभाग घेऊन थंड पाण्यांत उगाळून लेप द्यावा. १०-कांचनवृक्षाची साल ६४० मासे, हिरडा, बेहडा, आंवळकटी प्रत्येकी १२८ मासे, वावडिंगी ६४ मासे, आणि वेलची, दालचिनी व तमालपत्र प्रत्येकीं १६ मासे, अशा प्रमाणानें औषधें घेऊन, मग सर्वांचें वस्त्रगाळ चूर्ण करावें, आणि त्यांचे समभाग शुद्ध केलेला गुग्गुळ घेऊन वाटून त्यांत हें चूर्ण मिळवून त्याच्या गोळ्या (प्रत्येक गोळी ४ माशांची) बांधाव्या; आणि दररोज एक गोळी ऊन पाण्यांत, किंवा हरीतकीचे काढ्यांत, किंवा खैराचे लांकडाचा नार असतो त्याचे काढ्यांत द्यावी; ह्मणजे गंडमाला, गुल्म, भगंदर, कुष्ट आणि व्रण हे रोग दूर होतात. एरंडमूळ व पळसाचें मूळ तांदुळांचे धुणांत उगाळून लेप करावा.

**पथ्यः**—वांति, रेच, लंघन, जुनें तूप, मूग, पडवळ, तांबड्यासाळी, यव इ०

**अपथ्यः**—दूध, ऊन, पिष्टान्न, आंबट, मधुर, जड व कफकर पदार्थ, इ०

## घटसर्प.

छातींत किंवा गळ्यांत सर्पाच्या आकृतीसारखा एक प्रकारचा रोग होतो त्यास घटसर्प ह्मणतात. तो झाला ह्मणजे अन्नपाणी जाण्याचें बंद होतें. हा रोग लवकर वाढतो. याकरितां त्वरित उपचार करावे.

**उपचारः**—१–सर्पाची मेंग, केवड्याचा भुगा, किंवा कंवडळाचे फळाची कवची, यांपैकीं एकादें चिलमींत घालून ओढावें व धूर पोटांत घ्यावा.

**विशेष सूचनाः**—हा विकार विशेष वाढून चिलमी ओढतां येत नसेल तर दुसऱ्या माणसानें चिलमी ओढून धूर वारंवार विकार झालेल्या माणसाचे तोंडांत सोडावा.

## घाम.

**उपचारः—घाम बंद होण्यासः**–१–शुद्ध केलेला हिंगूळ सुमारें २ गुंजा घेऊन मधांतून घ्यावा. २–कळकीचा ओला पाला प्रत्येक वेळेस ३–४ तोळे घेऊन त्याचा अष्टमांश काढा करून घ्यावा. काढा घेत असतां तूप खाऊं नये. ३–आवा जाळून त्याची राख व भाटशेर्णीची राख एकत्र करून सर्वांगास वरचेवर लावीत जावी

## चेंचणें अथवा ठेंचणें.

**उपचारः**—१–चेंचलेल्या भागावर थंड पाण्याच्या घड्या ठेवाव्या, आणि या घड्यांवर वरचेवर थंड पाणी सोडीत असावें. २–फटकी, अफू, हळद, बिबवा, गुग्गुळ आणि एलियाबोळ, हे जिन्नस थंड पाण्यांत उगाळून लेप करावा. ३–रक्त नासलें असल्यास फांसण्या मारून अगर जळवा लावून रक्त काढावें. ४–हळद आणि बिबवा हीं थंड पाण्यांत उगाळून ऊन करून लेप द्यावा. ५ मध, हळद व तूप हीं एकत्र करून पट्टी बसवावी. ६–यादी नंबर १७३ चें तेल लावावें.

## छर्दि ( वांति. )

अत्यंत पातळ, स्निग्ध, मनास किळस आणणारे व खारट अशा पदार्थांचे सेवनानें, किंवा अकाळीं भोजन, जें सोसत नाहीं तें खाणें, अजीर्ण कृमीदोष, गर्भिणी स्त्रीस गर्भाची पीडा, इत्यादि कारणांनीं वांति होते.

**पूर्वरूपः**—तोंडाला मळमळ, ढेंकर बंद होणें, तोंडाला खारट पाणी सुटणें, अन्नपानावर द्वेष, इत्यादि.

हिचे प्रकार ५ आहेत, त्यांपैकीं खालीं कांहीं सांगतों.

**वातछर्दिः—लक्षणः**—तोंडास कोरड, हृदय व बरगड्या यांस पीडा, मस्तक आणि नाभी यांच्या ठिकाणीं शूळ, खोकला, सुया टोंचल्याप्रमाणें पीडा, वांती

मध्यें फेंस, राहून राहून वांति होणें, तिचा रंग काळा व वेग मोठा, इत्यादि.

**उपचारः**—१--तूप ६ मासे आणि सैंधव २ मासे एकत्र करून द्यावें. २--खालीं " सर्व प्रकारचे वांतीवर उपचार " या सदरांतील नं. ३ चें औषध द्यावें. ३--सुंठ, मिरीं, पिंपळी, सैंधव, संचळ, व बीडलोण, हीं समभाग घेऊन, त्यांचें चूर्ण करून ३ मासे चूर्ण तुपाबरोबर द्यावें. तूप घेणें तें पातळसर होईल इतकें घ्यावें.

**पित्त छर्दिः**—लक्षण--भोंवळ, तहान, कोरड, डोकें, टाळू आणि डोळे हीं तापणें, डोळ्यांस अंधारी, पिवळें कढत हिरवें कडू धुरकट असें ओकणें, इत्यादि.

**उपचारः**—१--पित्तपापड्याचा काढा मध घालून द्यावा. २-- मनुका, खडीसाखर आणि सुंठ यांचा काढा द्यावा. ३-- मोराचीं पिसें जाळून तें २-३ गुंजा भस्म मधाबरोबर द्यावें. ४-- दुर्वांचा रस तांदुळाचे धुणाबरोबर द्यावा.

**कफ छर्दिः**—लक्षणः--झांपड, तोंडाला गोडी, कफाचा स्राव व झोंप, वांति घट्ट गोड व पांढरी अशी असणें, व ओकते वेळेस थोडी पीडा होणें इत्यादि.

**उपचारः**—१--काकडशिंगी आणि धमासा यांचें चूर्ण मधाबरोबर द्यावें. २--जाईच्या पाल्याचा रस, पिंपळी, मिरीं, साखर व मध असें एकत्र करून द्यावें. ३--वावडिंग, त्रिफळा व त्रिकुट यांचें चूर्ण मधाबरोबर द्यावें.

**सर्व प्रकारचे वांतीवर उपचारः**—१--तासातासानें सोडावाटर द्यावें. ( यादी नंबर २२९ पहा.) किंवा यादी नंबर २२४ चें औषध द्यावें. किंवा पाण्यांत सोडा टाकून तें पाणी प्यावें. २--उंबराचे पानावरील फोडे १०।१५ आणून तें तुपांत तळून साखरेबरोबर खावे, ह्मणजे ताबडतोब वांति बंद होते. ३--वंशलोचनाचें काजळासारखें चूर्ण करून त्यांत थोडा मध घालून तें चाटण वारंवार चाटावें. हें औषध फार उत्तमपैकीं आहे. ४--वाळलेलें कागदीलिंबू जाळून त्याचे राखेंत मध घालून चाटण द्यावें. ५--केळीच्या कांद्याचा १ तोळा रस व मध ३ मासे असें एकत्र करून द्यावें. ६-- आंब्याची कोय, बेलफळ, खडीसाखर व मध असें एकत्र करून द्यावें. ७- यादी नंबर ६० किंवा ५१ चा काढा द्यावा. ८--मक्याचे दाणे काढलेलें बोंड घेऊन, तें जाळून लाल झालें ह्मणजे त्याची पूड करून मधांतून द्यावी, ह्मणजे लागलीच ओकारी बंद होते.

**पथ्यः**—रेच, लंघन, जुन्या साळी, गहूं, मूग, सुवासिक पदार्थ, नारळ, आंवळे, द्राक्षें, कवठ, डाळिंब, महाळुंग, साखर, दूध, इत्यादि.

**अपथ्यः**—अप्रिय अन्न, ऊन, पांढरा भोंपळा, तोंडलीं, दोडके, व्यायाम, खराब पाणी, शिरस, इत्यादि.

## जठराग्नि.

**जठराग्नि चार प्रकारचे आहेतः**—१ विषमाग्नि, २ तीक्ष्णाग्नि, ३ मंदाग्नि आणि ४ भस्मकाग्नि.

**विषमाग्निः**—हा वातदोषानें होतो. याचे योगानें कधीं अन्नाचें पचन होतें, व कधीं कधीं होत नाहीं.

**तीक्ष्णाग्निः**—हा पित्तदोषानें होतो. याचे योगानें, भोजनावर भोजन केलें असतांहि सुखानें अन्न पचन होतें.

**मंदाग्निः**—हा कफदोषानें होतो. याचे योगानें थोडें भोजन केलें तरी पचन होत नाहीं.

**भस्मकाग्निः**—हा वात आणि पित्त यांचे योगानें होतो. याचे योगानें भूक फार लागते, यामुळें वरचेवर अन्न खावें लागतें व तें पचनहि होतें; परंतु अंगाला लागत नाहीं. याचा तीक्ष्णाग्नींतहि कोणी अंतर्भाव करितात. हा विकार असलेल्या माणसास भस्मरोगी ह्मणतात.

वर सांगितलेल्या प्रकारांशिवाय समाग्नि ह्मणून एक प्रकार मानितात. हा वात, पित्त आणि कफ यांच्या सारखेपणानें होतो. यापासून योग्य आहार चांगला पचतो. हा सर्वांमध्यें श्रेष्ठ होय.

**मंदाग्नीवर उपचारः**—१–यादी नंबर ८३।८४।८५।८६।८७ यांपैकीं एखादें चूर्ण, किंवा यादी नंबर १५४ चें औषध द्यावें. २–बाळहरडे, सैंधव आणि सुंठ या तीन औषधांचा कल्क करून द्यावा. ह्मणजे अन्नाचें पचन होतें व अग्नि प्रदीप्त होतो. ३–यादी नंबर १४७ चें औषध द्यावें. सुवर्णमालिनीवसंत द्यावा. (यादी नंबर १२८ पहा). किंवा ४--लघुमालिनीवसंत द्यावा. (यादी नंबर १२९ पहा).

**भस्मकाग्नीवर उपचारः**--१–भस्मक रोग्याला थंड, हिम, जड व स्निग्ध अशीं अन्नें व पानें द्यावीं, व पित्तनाशक उपचार करावे. २–वारंवार पित्त-नाश करावा. ३–पायसाचें भोजन करावें ४--निशोत्तर घालून आटलेलें दूध रेचनार्थ द्यावें. ५ बोराचेबीचा मगज पाण्याबरोबर द्यावा. ६-दुधांतून किंवा तुपांतून एरंडेल द्यावें.

## जाळवात.

वायूच्या योगानें पाय अत्यंत रुक्ष होऊन तळव्यास भेगा पडतात, त्यास जाळ-वात ह्मणतात.

**उपचारः**—१-गेळफळ, वाळा, चुलीवरील घेरू, सैंधव, गुग्गुळ आणि मध हे जिन्नस समभाग घेऊन, मधाशिवाय सर्व जिन्नस एके ठिकाणीं वस्त्रगाळ करून, मग तें चूर्ण भिजेइतकें तूप आंत घालून, मग मध घालून चार सहा घटका चांगलें खलावें;

आणि रोज रात्रीं निजतांना पायांस गजावें. हें औषध उत्तमपैकीं आहे. २.-गेळफळ, मेण व मीठ समभाग एकत्र करून म्हशीचे लोण्यांत खलून लेप करावा. ३-शिलारस, सैंधव, मध, दूध आणि तिळांचें तेल समभाग घेऊन एकत्र करून पायांस गजावें, व लेप करावा. ४-हिरव्या पपयाचा कीस घेऊन त्यास वाफ देऊन तो रात्रीं तळपायांस ४।५ दिवस बांधावा. ५-आइनाचे झाडाचा व बोरीचा कोंवळा पाला व आंवळकटी समभाग एकत्र वाटून त्यांचा रस तळहात व तळपाय यांस मर्दन करावा.

## ज्वर.

**ज्वराचें लक्षणः**—ज्या रोगामध्यें देह, इंद्रिय आणि मन यांचा संताप आणि सर्वांगास वेदना हीं एकाकाळीं होतात, व अग्नीचा अवरोध होतो, त्याला ज्वर असें म्हटलें आहे.

**ज्वर ८ प्रकारचा**—१ वातज्वर. २ पित्तज्वर. ३ कफज्वर. ४ वातपित्तज्वर. ५ पित्तकफज्वर. ६ वातकफज्वर. ७ सन्निपात आणि ८ आगांतुक ज्वर.

**ज्वराची संप्राप्तिः**—मिथ्या आहार आणि मिथ्या विहार यांपासून दुष्ट झालेले वातपित्तादि दोष आमाशयाचा आश्रय करून, कोष्ठाग्नीला बाहेर काढून, रसधातूला मिळून ज्वर उत्पन्न करितात. ही संप्राप्ति शारीर ज्वराची आहे. आंगांतुकज्वराची नव्हे.

**ज्वराचें पूर्वरूपः**—आयास केल्यावांचून श्रम, चैन न पडणें, शरिरास ग्लानि, तोंड बेचव, डोळे पाण्यानें भरून येणें, थंडी, वारा आणि ऊन यांवर वारंवार इच्छा, आणि द्वेष होणें, जांभया येणें, अंग मोडून येणें, अंग जड होणें, रोमांच उभारणें, अन्नावर वासना नसणें, अंधारांत पडल्यासारखें वाटणें, संतोष नसणें, फार थंडी वाजणें, हीं लक्षणें ज्वर उत्पन्न होणार असला तर होतात. विशेष प्रकार असा होतो कीं, वायूपासून ज्वर येणार असल्यास जांभया फार येतात, पित्तापासून येणार असल्यास डोळ्याची आग होते. आणि कफापासून येणार असल्यास अन्नद्वेष होतो.

**वातज्वर लक्षणः**—कंप, अनियतकाळीं ज्वर, अधिकउणा होणें किंवा येणें, घसा, तोंड, ओंठ यास कोरड पडणें, निद्रा व शिंका न येणें, गात्रांना रुक्षता, मस्तक हृदय आणि गात्रें यांचे ठायीं वेदना, तोंडाला विरसपणा, शौचास खडा होणें, पोटांत दुखणें व वायूनें पोट फुगून दुखणें, जांभया येणें इ.

**उपचारः**—१—यादी नंबर ४ किंवा ५ किंवा ६ चा काढा द्यावा. इच्छाभेदीच्या गोळ्या द्याव्या. (यादीनंबर १२० पहा.) २—शतावरी आणि गुळवेल यांचा रस गूळ घालून द्यावा. हिंगुळेश्वर द्यावा. (यादी नंबर १४५ पहा.) ३—निद्रा येत नसल्यास पिंपळमुळाचें चूर्ण गुळाशीं द्यावें. ४—वर लिहिलेल्या काढ्यांतून पंचामृतपर्पटी (यादी नंबर १३०) किंवा योगराजगुग्गुळ (यादी नंबर १५० पहा.) द्यावा. किंवा राजमंडेश्वर द्यावा. (यादी नंबर १३७ पहा.)

**पित्तज्वराचें कारणः**—क्षाराम्लभोजन, तैलभक्षण, वांगी, सुरण, कारेतें, तिखट व कडु पदार्थ, मोहऱ्या इत्यादिकांचें अति सेवन, या कारणांनीं पित्तज्वर उत्पन्न होतो.

**पित्तज्वराचीं लक्षणेंः**—ज्वराचा वेग तीक्ष्ण, अतिसार होणें, थोडी निद्रा, वांति, गळा, ओंठ, तोंड, नाक यांवर फोड, घाम, बडबड, रूपादिकांचें अज्ञान, दाह, उन्मत्तपणा, तहान, विष्टा, मूत्र, नेत्र आणि त्वचा यांस पिंवळेपणा, आणि चाकावर बसून फिरल्यासारखें वाटणें.

**उपचारः**—१--यादी नंबर ७, ८ किंवा ९ चा काढा द्यावा. २--कडु पडवळीच्या मुळाचें पाणी, किंवा उंबराच्या पाळाचें स्रवलेलें पाणी साखर घालून द्यावें. ३--वर लिहिलेल्या काढ्यांतून सूतशेखर द्यावा. (यादी नंबर १४३ पहा.)

**कफज्वराचें कारणः**—तुपकट व तेलकट पदार्थ खाणें, दहीं व तूप यांचें अति सेवन, वारंवार स्नान, दिवसाची निद्रा व नित्य नवें पाणी पिणें, इत्यादि कारणांनीं कफज्वर उत्पन्न होतो.

**कफज्वराचें लक्षणः**—अंग ओल्या वस्त्रानें गुंडाळल्यासारखें वाटणें, ज्वराचा वेग मंद, शक्ति असून काम करण्यास उत्साह नसणें, तोंड गुळचट, मूत्र, मळ आणि त्वचा यांस पांढरेपणा, अंग ताठणें, तृप्तासारखी अन्नावर वासना नसणें, अंगास जडपणा, थंडी वाजणें, ओकारी असल्यासारखी वाटणें, अंगाला कांटा येणें, फार झोंप, अरुचि, पडसें, खोकला आणि डोळ्यांवर पांढुरकी.

**उपचारः**—१--यादी नंबर १० किंवा ११ किंवा १२ चा काढा द्यावा. २--याच काढ्यांतून पंचामृतपर्पटी किंवा सूतशेखर द्यावा. (यादी नंबर १३०, १४४ पहा) ३--राजचंडेश्वर द्यावा. (यादी नंबर १३७ पहा)

**वातपित्तज्वराचें लक्षणः**—तहान, भ्रम, मूर्च्छा, दाह, निद्रानाश, मस्तकशूळ, गळा आणि तोंड यांचा शोष, मळमळ, रोमांच, अरुचि, अकस्मात अंधारांत पडल्यासारखें वाटणें, साध्यांचे ठायीं वेदना, आणि जांभया.

**उपचारः**—१-यादी नंबर १३ चा काढा द्यावा. २--धमासा, गुळवेल, नागरमोथा, वाळा, कटुकी व पित्तपापडा, यांचा काढा द्यावा. ३--नागरमोथा, धने, किराईत, गुळवेल, कडुनिंब, कटुकी आणि कडूपडवळ यांचा काढा द्यावा. ४--राजचंडेश्वर द्यावा. (यादी नंबर १३७ पहा.)

**श्लेष्मवात** (कफवात)--**ज्वरलक्षणः**—अंग ओल्या वस्त्रानें गुंडाळल्यासारखें वाटणें, सांध्यांना फूट, निद्रा फार येणें, अंग जड, मस्तकांत भार, पडसें, खोकला, किंचित घाम येणें, शरीराचा दाह, ज्वराचा वेग मध्यम, हीं लक्षणें जाणावीं.

**उपचारः**—यादी नंबर १४ किंवा १६ चा काढा द्यावा.

**श्लेष्मपित्तज्वरलक्षणः**—तोंड कडवट असून चिकट, झांपड, मोह, अरुचि, तहान, वारंवार दाह होणें व वारंवार थंडी वाजणें इ.

**उपचारः**—१--यादी नंबर १५ चा काढा द्यावा. घाम फार येत असल्यास हुलगे भाजून त्याचें पीठ किंवा किराईत, ओंवा, कटुकी आणि वेखंड याचें वस्त्रगाळ चूर्ण, असें अंगास लावावें, म्हणजे घाम बंद होईल. २--कटुकीचें चूर्ण एक तोळा व साखर ४ मासे असें घेऊन पाण्याबरोबर द्यावें.

**सन्निपातज्वर लक्षणः**—क्षणांत दाह, क्षणांत शीत, हाडें, संधि आणि मस्तक यांचे ठायीं शूल, डोळ्यांना पाणी व ते गढूळ,लाल आणि वटारलेले, कानांत शब्द व शूल, गळ्यांत भाताचें कूस लागल्यासारखें वाटणें, झांपड, मोह, बडबड खोकला, श्वास, अरुचि, तहान, भ्रम, जीभ कडेस जळल्यासारखी व सागाचे पाना-सारखी खरखरीत, अत्यंत अंग गळणें, रक्तपित्तानें मिश्रित असा कफाचा बेडका येणें व मस्तक डोलणें, झोंप न येणें, उरांत दुखणें, घाम, मूत्र व मळ फार वेळानें थोडा होणें, गळा घुरघुर वाजणें, मधमाशी चावल्यासारख्या गांधी येणें, व पोट जड होणें इ.

**सन्निपातज्वराचें कारण व प्रकोपः**—आंबट, स्निग्ध, उष्ण, तीव्र, मधुर, मद्य, ऊन, काम, क्रोध, अतिरुक्ष, फार जड, आकंठभोजन, मांसभक्षण, शीत पदार्थ सेवन, शोक, श्रम, चिंता, फार स्त्रीसंग, या कारणांनीं, आणि चैत्र, वैशाख, आश्विन, कार्तिक, श्रावण आणि भाद्रपद या महिन्यांत, मनुष्यांना प्रायः सन्नि-पाताचा प्रकोप होतो.

**सन्निपातांचीं नांवें व कालमर्यादेचे दिवसः**—संधिक ७ दिवस, अंतक १०, रुग्दाह २०, चित्तविभ्रम २४, शीतांग १५, तंद्रिक २५, कंठकुब्ज १३, कर्णक ९०, भुग्ननेत्र ८, रक्तष्ठीवी १०, प्रलापक १४, जिव्हक १६, आणि अभिन्यास १६ दिवस, असे १३ प्रकारचे सान्निपात असून त्याचे आयुष्याचे दिवसांची मर्यादा अशी आहे, परंतु कधीं कधीं तत्क्षणीं मरतो.

**कोणते सन्निपात साध्य व कोणते असाध्य तेंः**—१ संधिक, २ तंद्रिक, ३ कर्णक, ४ कंठकुब्ज, ५ जिव्हक, व ६ चित्तविभ्रम, हे सहा साध्य व बाकीचे ७ असाध्य जाणावे.

**सामान्य उपचारः**—तीनहि दोष प्रकुपित झाले असतील तर त्यांत जो बलवत्तर असेल त्याचाच प्रथम प्रतिकार करावा. मात्र इतर दोषांस तो बाधक होऊं नये असा उपचार असावा. तीनहि दोष समान असतील तर कफ, पित्त व वायु यांचा अनुक्रमानें प्रतिकार करावा. दाह झाला तरी शीतोदकानें सिंचन करूं नये. लाह्यांचें पीठ नुसतें देऊं नये. ( हें पीठ सैंधव घालून दिलें आणि तें जिरलें तर रोगी

वांचेल. ) तापविल्यावांचून कधीं पाणी पिऊं नये. मनशीळ आणि वेखंड लसुणीच्या रसांत उगाळून अंजन करावें. सैंधव व त्रिकटु यांची आल्याच्या रसांत गोळी करून तोंडांत धरावी, ह्मणजे कफ पडतो व ज्वर, मूर्च्छा, श्वास आणि तोंडाला पाणी सुटणें कमी होतें. संपूर्ण सन्निपातांवर मध देऊं नये. कारण मध दिला असतां शीतोपचार केले पाहिजेत, आणि सन्निपातांत शीत उपचार विरुद्ध आहेत. वाळुकास्वेद, नस्य, गुळण्या, अवलेह, व अंजन, हीं पूर्वीं करावीं. ओवा, वेखंड, सुंठ, पिंपळी, आणि अजमोदा, यांचे चूर्ण घाम आल्यावर लावावें. यादी नंबर १८ किंवा १९ किंवा २३ चा काढा द्यावा. व या काढ्यांतून त्रिभुवनकीर्ति यादी नंबर १२७, महाज्वरांकुश यादी नं. १३४, मृत्युंजय यादी नं. १३५, व पंचवक्त्ररस यादी नंबर १२९ या पैकीं एकादें द्यावें. वात आणि कफ हे विकार वाढले असें दिसेल तर मल्लसिंदूर किंवा हेमगर्भ मधून मधून द्यावा.

**वाताधिक्य सन्निपातः**—लक्षण—संधि, हाडें व मस्तक यांमध्यें शूल, बडबड, अंगास जडत्व, भ्रम, तहान, शोष इ.

**उपचार**—यादी नंबर १८ किंवा १९ किंवा २३ चा काढा द्यावा.

**वाताधिक्य सन्निपातः**—लक्षण—मळ व मूत्र यांना आरक्तता, दाह, वात, बलक्षय इत्यादि.

**उपचारः**—यादी नं. २० किंवा १८ किंवा २३ चा काढा द्यावा.

**संधिक सन्निपातः**—लक्षण—ज्याच्या पूर्वरूपांमध्यें शूल, व मग शोष, वायूच्या फार वेदना, स्लेष्मोद्रेक, संताप, बलहानि, जागरण इत्यादि.

**उपचारः**—यादी नं. २२ किंवा १८ किंवा २३ चा काढा द्यावा.

**अंतक सन्निपातः**—लक्षण—दाह, संतापाला वाढविणें, बेशुद्धि, शीर कापणें, उचकी, कास, इत्यादि.

**उपचारः**—नाचण्याचें पीठ लसणीच्या रसांत मिळवून त्याची भाकरी तेलांत, तुपांत अथवा एरंडेलांत भाजून गरम अशी मस्तकावर बांधावी. यादी नंबर १८ किंवा २३ चा काढा द्यावा.

**रुग्दाह सन्निपातः**—लक्षण—बडबड, संताप, फार मोह, मंदत्व, भोंवळ, कंठ, मान व हनुवटी यांचे ठायीं वेदना, व निरंतर तृषा, श्वास, कास इत्यादि.

**उपचारः**—यादी नं. २४ किंवा २३ किंवा १८ चा काढा द्यावा. बोरीचा पाला, चंदन व कडुनिंबाचा पाला एकत्र वाटून पायांच्या तळव्यास लेप द्यावा.

**चित्तविभ्रम सन्निपातः**—लक्षण—कोणत्याही प्रकारानें शरिराला पीडा होणें व भ्रम, धोतरा खाल्ल्यासारखी अवस्था, संताप, मोह, विकलपणा, डोळे व्याकूळ होणें, हंसणें, गाणें, नाचणें, आणि बडबड करणें इत्यादि.

**उपचारः**—यादी नंबर १८ किंवा २३ चा काढा द्यावा. अगस्त्याचे पाल्याचे रसांत गूळ, सुंठ व पिंपळी, घालून नस्य द्यावें.

**शीतांग सन्निपातः**—लक्षण--शरीर बर्फासारिखें थंड, कंप, श्वास, उचकी, संपूर्ण अंग ढिलें होणें, स्वर खोल जाणें, अभ्यंतरीं उग्र संताप, श्रम, मनाला संताप, खोकला, वांति, अतिसार, इत्यादि.

**उपचारः**—यादी नंबर २५ किंवा १८ किंवा २३ चा काढा द्यावा.

**तंद्रिक सन्निपातः**—लक्षण--ज्वर उत्पन्न होतांच डोळ्यांस फार झांपड, शूल, ज्वर, कफ आणि तहान यांनीं रोगी फार पीडित होणें, जीभ शामवर्ण दडस कठीण आणि कांटे आल्यासारखी होणें, व अतिसार, श्वास, ग्लानि, कर्णशूल, घशांत जडत्व, आणि रात्रंदिवस झोंप, इत्यादि.

**उपचारः**—सैंधव, कापूर, मनशीळ व पिंपळी हीं औषधें घोड्याचे लाळेंत आणि मधांत खलून अंजन करावें. यादी नंबर २६ किंवा २३ चा काढा द्यावा.

**कंठकुब्ज सन्निपातः**—लक्षण—कपाळ दुखणें, गळा दुखणें, दाह, बेसावधपणा, कंप, ज्वर, रक्तवातसंबंधीं पीडा, हनुवटी जखडणें, संताप, बडबड, आणि मूर्च्छा इत्यादि.

**उपचारः**—आवाळ्याच्या रसांत पिंपळी उगाळून नाकांत घालावी. यादी नंबर २७ किंवा २३ चा काढा द्यावा.

**कर्णक सन्निपातः**—लक्षण—बडबड, बधिरपणा, गळा धरणें, अंगांत तिडका, श्वास, खोकला, ज्वर, संताप, कर्ण आणि गाल यांचे ठायीं पीडा इ०

**उपचारः**—सैंधव, मिरीं व पिंपळी हीं ऊन पाण्यांत उगाळून एकत्र करून नाकांत घालावें. यादी नंबर १८ किंवा २३ चा काढा द्यावा.

**भुग्ननेत्र सन्निपातः**—लक्षण—बलक्षय, स्मृतिनाश, श्वास, वक्रदृष्टि, बेसावधपणा, बडबड, भ्रम, कंप आणि सूज इ०

**उपचारः**—मीठ व पिंपळी पाण्यांत उगाळून अंजन करावें. यादी नंबर ८ किंवा २३ चा काढा द्यावा.

**रक्तष्टीवी सन्निपात**—लक्षण—रक्ताची गळणी, ज्वर, वांति, तृषा, मूर्च्छा, शूल, अतिसार, उचकी, पोट फुगणें, चक्राच्या भ्रमणासारखें भोंवणें, तलखी, श्वास, संज्ञानाश, जिव्हा काळी किंवा रक्तवर्ण व तिच्यावर मंडलें इ०

**उपचारः**—दूर्वांच्या रसाचें नस्य करावें.यादी नं.१८ किंवा २३ चा काढा द्यावा.

**प्रलापक सन्निपातः**—लक्षण-कंप, बडबड, संताप, कपाळ दुखणें, प्रौढ गोष्टी सांगणें, स्वच्छपणाविषयीं आसक्त, काळजी करणारा, बुद्धिनाश झालेला, विव्हळ आणि पुष्कळ बडबड करणारा इ०

**उपचारः**—यादी नंबर १८ किंवा २३ चा काढा द्यावा.

**जिव्हक सन्निपातः**—लक्षण–रोगी खोकला, दमा, संताप यांनीं विव्हळ, जिव्हा कठीण व कांट्यांनीं व्याप्त झालेली, बहिरेपणा, मुकेपणा आणि बलहानि इ.

**उपचारः**—यादी नंबर २८ किंवा २३ किंवा १८ चा काढा द्यावा.

**अभिन्यास सन्निपातः**—लक्षण–त्रिदोषांच्या कोपानें तोंडावर तुळतुळीतपणा, झोंप, विकलपणा, निचेष्ट पडणें, मोठ्या प्रयासानें एखादा शब्द बोलणें, बलहानि, श्वासादिकांचा अवरोध इ०

**उपचारः**—आल्याच्या रसांत मिरीं उगाळून नाकांत घालावें. यादी नंबर १८ किंवा २३ चा काढा द्यावा.

**हारिद्रक सन्निपात–लक्षण**—देह, नख, नेत्र हात व पाय हे हळद लाविल्यासारखे पिंवळे, ज्वर, कफाचा थुंका, खोकला इ.

**उपचारः**—यादी नंबर २३ किंवा १८ चा काढा द्यावा.

**त्रिदोष ज्वराची साधारण मर्यादाः**—त्रिदोष झाल्या दिवसापासून ७ किंवा १४, आणि ९ किंवा १८, तसेंच ११ किंवा २२ दिवसपर्यंत मर्यादा जाणावी. यापुढें ज्वर जातो किंवा मृत्यु येतो. ७ किंवा ९ किंवा ११ ही मर्यादा वाताधिक्य पित्ताधिक्य आणि कफाधिक्य सन्निपाताची जाणावी. पित्त, कफ आणि वायु यांच्या वृद्धीनें क्रमें करून १०।१२।७ दिवसांनीं त्रिदोषज्वर धातुपाक झाला ह्मणजे रोग्याला मारितो, आणि मलपाक झाला ह्मणजे रोग्याला सोडितो.

**धातुपाक लक्षणः**—निद्रानाश, हृदय ताठल्यासारखें होणें, मूत्र, आणि पुरीष यांचा अवष्टंभ, शरिराला जडपणा, अन्नद्वेष, अस्वस्थपणा आणि मलाचा नाश इत्यादि. धातुपाक ह्मणजे उत्तरोत्तर रोग्याची बुद्धि आणि बलाची हानि होऊन, शुक्रादि धातूंसहित मूत्रादिकांचा जो पाक होणें, त्यास धातुपाक ह्मणावें.

**मलपाक लक्षणः**—दोषांचा स्वभाव पालटणें, ज्वर हलका होणें, शरीर हलकें होणें, इंद्रियांस निर्मळता हें मलपाकाचें लक्षण जाणावें.

**सन्निपाताचें असाध्य लक्षणः**—मलादिक व पित्तादिक दोष बद्ध झाले असतां आणि अग्नि शांत झाला असतां, किंवा वातादि सर्व दोषांचीं संपूर्ण लक्षणें झालीं असतां, सन्निपातज्वर असाध्य होतो. आणि त्याच्या उलट ह्मणजे दोष प्रवृत्ति असून अग्नि थोडासा प्रदीप्त असून सर्वांचीं थोडथोडीं लक्षणें झालीं असतां सन्निपातज्वर कष्टसाध्य होतो.

**विषम ज्वराची समाप्तिः**—ज्वरानें सोडिलेल्या मनुष्यास अपथ्य सेवन झालें असतां, त्याचा दोष पुन्हा थोडासा कुपित होऊन रसरक्तादि धातूंपैकीं कोणत्याहि धातूप्रत जाऊन, विषमज्वर ह्मणजे तृतीयादिक ज्वर उत्पन्न करितो.

**विषम ज्वराचें सामान्य लक्षणः**—अनियतकाळीं शीतोष्णानें विषमवेग ज्वर होणें. दुसरें लक्षण—ज्वर निघून पुन्हा येणें—विषमज्वराचीं नांवें—१ संतत, २ सतत, ३ अन्येद्युष्क ( द्वाहिक ), ४ तृतीयक ( त्र्याहिक ) आणि ५ चातुर्थिक, असे पांच प्रकार आहेत.

**संतत ज्वराचें लक्षणः**—७।१० किंवा १२ दिवसपर्यंत एकसारखा ज्वर असणें हा ज्वर त्रिदोषज आहे.

**उपचारः**—यादी नंबर ३६ किंवा ३२ किंवा ३३ चा काढा द्यावा.

**सतत ज्वराचें लक्षणः**—हा अहोरात्रीमध्यें दोन वेळ येणें किंवा दिवसास दोन वेळां येणें. अमुकच वेळीं येतो असा नेम नाहीं.

**उपचारः**—यादी नंबर ३६ किंवा ३५ किंवा ३३ चा काढा द्यावा.

**अन्येद्युष्कः**—( द्वाहिक ) ज्वराचें लक्षण— अहोरात्रीमध्यें एक वेळ येणें.

**उपचारः**—यादी नंबर ३६ चा काढा द्यावा.

**तृतीयक ज्वराचें** लक्षण—आल्या दिवसापासून तिसरे दिवशीं येणें. हा वातकफात्मक असला ह्मणजे पाठीला वेदना करितो, व वातपित्तापासून असला ह्मणजे मस्तकाला वेदना करितो.

**उपचार**—यादी नंबर ३६ किंवा ३३ चा काढा द्यावा.

**चातुर्थिक ज्वराचें लक्षणः**—आल्या दिवसापासून चवथे दिवशीं येणें. हा कफाधिक्य असला ह्मणजे पहिल्यानें मांड्यांपासून आरंभ करून मग सर्व देह व्याप्त करितो, आणि वाताधिक्य असतो तो पहिल्यानें मस्तक तापवून नंतर सर्व शरिरास भरतो.

**उपचारः**—१—यादी नंबर ३७ किंवा ३६ चा काढा द्यावा. २-टांकणखाराची (स्वागीची नव्हे ) लाही दोन गुंजा विड्यांत द्यावी, ह्मणजे त्याचा रस जसजसा पोटांत जातो तसतसें हींव लागलेंच कमी होतें.

**सर्व प्रकारचे विषमज्वरांवर उपचारः**—१--सर्व विषमज्वरांत वायु अवश्य असतो, ह्मणून वायुनाशक उपचार करावे. २-यादी नंबर ३६ किंवा ३५ किंवा ३२ चा काढा द्यावा. ३--कुड्याची साल, कडू पडवळ व कटुकी यांचा काढा द्यावा. ४—कडुनिंब, कडुपडवळ, त्रिफळा, द्राक्षें, नागरमोथे व अडुळसा यांचा काढा द्यावा. ५ किराईत, गुळवेल, रक्तचंदन व सुंठ याचा काढा द्यावा. ६—पुढें या प्रकरणांत "सर्व प्रकारचे ज्वरांवर उपचार" यांत सांगितलेले उपचार करावेत. ७—पंचवक्त्र रस द्यावा. ( यादी नंबर १२९ पहा )

**जीर्णज्वर**—पूर्वीं मोठा ज्वर आलेला असून त्या ज्वराचा बहुतेक भाग औषधोपचारेंकरून नाहींसा होऊन कांहीं भाग शरिरांत राहिला ह्मणजे त्यास जीर्णज्वर

किंवा हाडीज्वर ह्मणतात. याची उपेक्षा केली तर पुढें पांडु व क्षयरोग हे उत्पन्न होतात. या ज्वरानें दिवसेंदिवस आहार कमी होतो, अन्न पचन होत नाहीं, मलशुद्धि स्वच्छ होत नाहीं, तोंडाला पाणी सुटतें व दिवसेंदिवस मनुष्य क्षीण होतो.

**उपचारः**—१–जीर्णज्वरी रोग्यानें कधींही उपवास करूं नये. २–जिरें एक तोळा व बारीक पिंपळी १ तोळा यांचें वस्त्रगाळ चूर्ण करून त्यांतील चूर्ण १-२ मासे व खडीसाखर २ मासे, असें तापविलेले अगर धारोष्ण अदपाव दुधांतून द्यावें. हें स्वल्प खर्चाचें औषध अप्रतीम आहे. जिरेपाक द्यावा. ( यादी नंबर १५७ पहा. ) ३ यादी नंबर ३० किंवा ८१ चा काढा द्यावा. ४--गाईचें दूध ४।५ तोळे घेऊन त्यांत तितर्केच ( दुधाइतर्केच ) किंवा त्याचे दुप्पट पाणी, २।३ पिंपळ्या आणि पैसाभार खडीसाखर घालून काढा करावा. आणि पाणी आटवून शेष दूध राहिलें ह्मणजे तें घ्यावें. काढ्यातील पिंपळ्या सोसतील तर खाव्या, नाहीं तर काढून टाकाव्या. प्रकृतिमानाप्रमाणें पिंपळ्या १४ पर्यंत चढवून मग उतराव्या. हें औषध ( वर्धमान पिंपळी ) जीर्णज्वर, खोकला, क्षय, श्वास, मूळव्याध इत्यादिकांवर फारच उत्तम आहे. ५--गाईचें तापविलेलें दूध ४।५ तोळे घेऊन त्यांत पैसाभार खडीसाखर, ३ मासे सुंठीची अगर पिंपळीची पूड, आणि ४।५ गुंजा गुळवेलीचें सत्व घालून द्यावें. ६--तुळशीचा पाला सुमारें एक तोळा व पैसाभार खडीसाखर यांचा काढा करून द्यावा. ७–सुवर्णमालिनी ( यादी नंबर १४३ पहा. ) किंवा लघुमालिनी वसंत ( यादी नंबर १३८ पहा. ) द्यावा. ८-साखर, तूप, सुंठ, खारीक आणि द्राक्षें हीं घालून तापविलेलें दूध प्यावें. ९-गुळवेलीचे रसांत पिंपळी व मध घालून तो द्यावा. कोहळेपाक घ्यावा. ( यादी नंबर १६३ पहा. ) १०-कामदुधा द्यावी. ( यादी नंबर १२१ पहा. )

**हिंवतापः**—(शीतपूर्वक ज्वर)–उत्पन्न होण्याचीं कारणें-हा विषमज्वरांपैकींच आहे. पाणथळ जाग्यांत, किंवा झाडाची दाटी असून जमीन सखल, ओलसर असते अशा ठिकाणीं, अनेक सेंद्रिय पदार्थ कुजूं लागून विषकारक हवा उत्पन्न होते.मग ती श्वासोच्छ्वासाबरोबर पोटांत जाऊन हा ज्वर उत्पन्न होतो. ह्या ज्वराचे येण्यांत अनियमितपणा असतो. हा येणार असला ह्मणजे पहिल्यानें थंडी भरते, मग ताप भरतो. नंतर अंगाला घाम सुटतो.

**उपचारः**—१-हींव येण्याचे सुमारास उलटीचें औषध द्यावें.( यादी नंबर २२० पहा. ) किंवा जुलाब द्यावा. ( यादी नंबर ८५ किंवा १२० पहा. ) थंडी लागूं लागली ह्मणजे लोंकरीचीं वस्त्रें पांघरून निजावें. २-ताप आल्यावर घाम येण्याकरितां सुंठ व दालचिनी, लवंगा व पातीचहा, यांचा काढा करून साखर घालून द्यावा. मलशुद्धीस साफ होत नसल्यास वरील औषधांतच एक तोळा हरडेदळ व अर्धा तोळा कटुकी घालून काढा करून द्यावा, घाम येऊन अंग थंड झालें म्हणजे वरील औषध बंद करावें. ३ ज्या

दिवशीं ताप यावयाचा असेल त्या दिवशीं तो येण्यापूर्वी सुमारें चार तास क्विनाईन द्यावें. तें घेण्याचा प्रकार-६ गुंजा क्विनाईन आणि ३।४ थेंब काकवी हीं एकत्र घोंटून ४ गोळ्या कराव्या. आणि दर वेळेस २ गोळ्या लिंबाचे रसाबरोबर किंवा पाण्याबरोबर गिळाव्या. हिंवतापावर क्विनाईन हें अत्युत्तम औषध आहे. हें ताप आलेला असतां मात्र घेऊं नये. ४-तुरटीची (फटकीची) लाही ताप येण्यापूर्वी दोन दोन तासांच्या अंतरानें दोन वेळां प्रत्येक वेळेस सुमारें पांच गुंजा द्यावी. ५-यादी नंबर ३४ किंवा ३५ चा काढा द्यावा.

**सर्व प्रकारचे ज्वरांवर उपचारः**—१-सुदर्शनचूर्ण द्यावें. (यादी नंबर ९६ पहा.) हें चूर्ण फार उत्तम आहे. याचे गूण अनेक आहेत. २--आमलक्यादि चूर्ण द्यावें. ( यादी नंबर ९० पहा. ) ३—यादी नंबर १ किंवा २ किंवा ३ चा काढा द्यावा. ४--राजचंडेश्वर द्यावा. ( यादी नंबर १३७ पहा. ) ५—त्रिभुवनकीर्ति द्यावी. ( यादी नंबर १२७ पहा.) ६—मृत्युंजय द्यावा. ( यादी नंबर १३५ पहा. ) ७—ज्वरमुरारी द्यावा. ( यादी नंबर १२६ पहा. ) ८—पंचवक्त्र द्यावा. ( यादी नं. १२९ पहा. ) ९--प्रतापलंकेश्वर द्यावा. ( यादी नंबर १३१ पहा. )

**साध्य ज्वरः**—दोष अल्प असून श्वासादि उपद्रव रहित जो ज्वर असतो तो साध्य जाणावा.

**असाध्यज्वरः**—जो ज्वर बहुत कारणांनीं झालेला, व ज्यामध्यें लक्षणें पुष्कळ असतात, तो ज्वर प्राणांन्त करणारा होतो. तसेंच जो ज्वर उत्पन्न होतांच एकाद्या इंद्रियाची शक्ति नष्ट (आंधळा, बहिरा इत्यादि) करितो, तोहि असाध्य जाणावा.

**दुसरीं असाध्य लक्षणें**:—क्षीण व सूज आलेल्या पुरुषाचा ज्वर असाध्य होय. अंतधातुस्थ किंवा अंतर्वेगज्वर आणि फार दिवस राहणारा ज्वर असाध्य होय. जो ज्वर बलवान आणि ज्याच्या योगानें केशांमध्यें भांग पडतात तोहि असाध्य होय. तसेंच ज्याचा ज्वर मुळापासून विषम झाला आहे तो, ज्याचा ज्वर फार दिवसांचा आहे तो, जो सर्वदा अंथरुणावर पडून असतो, ह्मणजे ज्याच्यानें उठवत नाहीं तो, आणि ज्याला बाहेरून थंडी वाजते आणि अभ्यंतरीं दाह होतो तो, असे असाध्य होत.

**ज्वरमुक्तीचें पूर्व स्वरूपः**—दाह, घाम, भ्रम, तहान, कांपरें, मळ पातळ होणें, कुंथणें आणि अंगाला अत्यंत दुर्गंधी, हीं लक्षणें ज्वर सोडित असतांना होतात.

**ज्वरमुक्तीचें लक्षणः**—घाम येणें, शरिरास हलकेपणा, डोक्याला कंडु सुटणें मुखपाक ह्मणजे तोंड येणें, शिंका येणें आणि अन्नावर वांच्छा होणें, हीं लक्षणें झालीं ह्मणजे ज्वरानें सोडिलें असें समजावें.

**पथ्यः**—तांदुळजा, चाकवत, कोंवळा मुळा, पित्तपापडा, गुळवेल, चुका, शेळीच्या दुधाचे पदार्थ, दोडकीं, पडवळ, काटलें यांची भाजी, मूग, मसूर, चणे आणि कुळीथ यांचा यूष, एक वर्षाचे तांदुळाचा भात, हीं पथ्यकर आहेत. भाकरी

देणें ती दोन वर्षांचे तांदुळाची द्यावी. गोधुमादिक सवईचीं जीं धान्यें असतील तीं थोडीं द्यावीं. वांति व संथन करावें. घाम काढणें व तिखट आणि कडुरस आणि पाचन हे उपचार तरुणज्वरावर करावे. तरुणज्वरावर स्नान, रेच, मैथून, व्यायाम, दिवानिद्रा, दूध, घृत, दहीं, द्विदलधान्य, मांस,ताक, गोड पदार्थ, जड पदार्थ इत्यादि अपथ्यकारक आहेत.

**अपथ्यः**—ओकारी करणें, काष्टानें दांत घासणें, जड पदार्थ, क्षार, आंबट, पालेभाजा, अंकुर आलेलें धान्य, सांठवणीचें पाणी, तांबूल, कलिंगण, फणस, नवें धान्य, पिठाचे पदार्थ व पौष्टिक पदार्थ, ज्वरित रोग्यानें सोडावे. तसेंच ज्वरमुक्त रोग्यानें मेहनत, स्त्रीसंग, स्नान, क्रीडा इत्यादि शक्ति आल्यावांचून करूं नयेत.

## इन्फ्लयुएंझा.

हा एकजातीचा सांथीचा ताप आहे. सन १८८९ सालीं आपल्या देशांत ह्या रोगाची सांथ पसरली होती. त्यानंतर सन १९१८ पर्यंत ही सांथ मुळींच नव्हती. सन १९१८ सालीं पाऊस काळीं ही सांथ सुरू होऊन तिचा प्रसार सर्व हिंदुस्थानभर जाहला होता.

## कारणें, लक्षणें, व उपचार.

ह्या तापास सांथीचा ताप, किंवा सांसर्गिक, किंवा ऋतुपालटाचे वेळीं हवेंत एका विवक्षित रोगाचे जंतु निर्माण होऊन त्यापासून होणारा ताप, ह्याचा प्रसार सर्वत्र एकदम होतो. सर्वसाधारण लक्षणें सारखीं असतात. तापाबरोबर पडसें व खोकलाही बहुतकरून असतो. शौचास न होणें किंवा मळ खड्यासारखा घट्ट होणें, लघ्वी कमी होणें व क्षीणता इत्यादि विकार होऊन रोगी कांहीं दिवस अंथरुणावर पडून राहून बरा होतो. परंतु फुफ्फुसांचा दाह जास्त जाहला तर रोगी दगावतो.

**उपचारः**—सामान्य तापावरील उपचार करावे. शौचास होत नसेल तर ( बस्ति ) एनिमा द्यावा किंवा सोनामुखीचा काढा किंवा एरंडेल द्यावें. १—डोकें दुखूं लागतांच प्रथम निवडुंगाचे ( फणेरे ) बोंडाचा रस १ तोळा, डाळिंबाचा रस १ तोळा असें मिश्रण ताप कमी होईपर्यंत तीन वेळां द्यावें. २—कडुलिंबाची अंतरसाल २ तोळे, बेहडेदळ १ तोळा, दालचिनी ।। तोळा, ज्येष्टमध ।। तोळा, यांचा काढा, सकाळ संध्याकाळ सूतशेखर प्रत्येकीं १ गुंज उगाळून द्यावा. ३—खोकला फार होतो असें वाटल्यास ज्येष्टमध व खडीसाखर यांचा काढा करून तो प्रत्येक तासानें १ तोळा घेणें. ४- सुंठ, हळद, वावडिंग, दालचिनी, तुरटीची लाही व खडीसाखर या सर्वांचें चूर्ण करून ते प्रत्येक वेळीं १।। मासा प्रमाणें दिवसांतून तीन वेळां घेणें. तहान लागल्यास गरम पाणी पिणेस हरकत नाहीं.

**खाणें:**—शक्य तितकें कमी खावें. गरम दूध, रव्याची पेज, तांदुळांची भरडी देणेत हरकस नाहीं.

**न्यूमोनियाचें कारण व त्यावर उपचार:**—या मांथीच्या तापांत न्यूमोनिया झालेखेरीज रोगी सहसा दगावत नाहीं. न्यूमोनिया होऊं न देण्यास आजाऱ्याचे अंगास, विशेषतः छातीस गारवारा लागूं न देण्याची खबरदारी घ्यावी. न्यूमोनिया झाल्यास त्यास खोकल्याची ढांस येते, पण कफ पडत नाहीं, किंवा कफ पडल्यास त्यांत रक्तांश असतो, छाती व बरगड्या दुखूं लागतात, श्वासोच्छ्वास करण्यास त्रास पडतो. व तापाचा जोर वाढून सबंध दिवसांत ताप उतरला तरी फारच थोडा उतरतो. नुसता खोकला येणें हें न्युमोनियाचें लक्षण नव्हे. न्युमोनिया न होण्यास आजाराच्या प्रारंभापासूनच रोग्यास गरम कपडे घालण्यास द्यावे आणि छाती व पाठ दिवसांतून एक दोन वेळां शेकावी; आणि कफ न होऊं देण्यास वेखंड व मध यांचें चाटण द्यावें. रोग्यास सोसवेल तेवढें गरम पाणी द्यावें, ह्मणजे न्युमोनियाची भीति राहणार नाहीं. न्युमोनिया झाल्यास शेकण्याचें मान वाढवावें. छातीस, बरगड्यांस व पाठीस टरपेनटाईन चोळून त्यावर पिळ्यानें शेकावें; किंवा छातीवर, मोहऱ्या वांटून लेप करावा. रोग्यास आपोआप शौचास होत नसल्यास बस्ति ( एनिमा ) द्यावा. न्युमोनिया जाहलेल्या रोग्यास अंथरुणावरून कोणत्याहि कारणास्तव उठूं देऊं नये. त्याचे व्यवहार तेथल्या तेथेंच होता होईतों निजूनच होऊं द्यावे.

( सर्व तापांचे आजारांत न्युमोनिया होऊन रोगी फार दगावतात तरी सर्व प्रकारचे तापांत वरीलप्रमाणें जपावें. )

## झोंप.

**झोंप न येण्याचीं कारणें:**—मेंदूत रक्त सांचून राहणें किंवा रक्त कमी होणें मनाची उदासीनता किंवा व्यग्रता, आमरक्तातिसार, अजीर्ण, अग्निमांद्य, श्वास इ० कारणांनी झोंप येत नाहीं.

**उपचार:**—१–झोंप न येण्याचीं कारणें दूर करावीं. डोक्यास त्रास न होईल अशा बेतानें वागावें. बदामाचें तेल किंवा गाईचें तूप डोक्यावर घालीत जावें. २–कोरडें व कल्हई लाविलेलें भांडें घेऊन त्यांत कागदी लिंबाचा रस पिळावा आणि त्या रसांत उंची पांढरा चंदन उगाळून, सुमारें २।३ हरभऱ्या एवढा कापूर बारीक करून घालावा; आणि थोडावेळ बोटानें एकत्र खलून निजतांना मस्तकास लेप द्यावा. हें औषध फार उत्तमपैकीं आहे. हें एका विद्वान माणसाकडून समजलें आहे. व त्याचा आह्मासही अनुभव आलेला आहे. ३–एरंडेल आणि जवसाचें तेल कांशाचे भांड्यांत बोटानें मिळवून त्याचें अंजन करावें. ४–खडीशेप आणी भांग समभाग

घेऊन शेळीचे दुधांत बारीक वाटून ऊन करून पायांचे तळव्यास बांधून निजावें. ५--कडुनिंबाचे पाल्याचा रस पायाचे तळव्यास चोळावा. रस न निघाल्यास त्यांत पाणी घालूं नये. गाईचें दूध घालावें. रस ताळूवरहि चोळावा.

## डांग्या खोकला.

हा विकार नेहमींच्या खोकल्यापेक्षां निराळा आहे. हा होण्याचें निश्चयात्मक कारण समजत नाहीं, पण हा एक श्वासमार्गाचा दाह आहे असें मानितात. देवी, गोंवर याप्रमाणें डांग्या खोकल्याची सांथ येते.

**लक्षण आणि उपद्रवः**—हा विकार बहुधा १० वर्षांचे आंतील मुलांस होतो. हा स्पर्शसंचारी आहे, ह्मणजे एकाच्या सहवासानें दुसऱ्यास होतो ह्मणून सांथीचे रोगांपैकीं हा एक आहे असें मानितात. हा होण्याचे अगोदर पडसें आल्यासारखें होतें, नंतर ताप व खोकला होतो, पुढें ताप नाहींसा होऊन खोकला वाढत जातो, तोंडांतून थोडा चिकट असा कफ पडतो व वांति होतें, खोकतां खोकतां खोकून कफ पडेपर्यंत जीव घाबरा होतो, डोळे लाल होतात, चेहेरा लाल होतो. व नाकांतून किंवा खोकून पडलेल्या कफांतून केव्हां केव्हां रक्त पडतें. हा खोकला ३ महिनेपर्यंतहि असतो. याचे योगानें कधीं कधीं नाकांतून रक्त वाहतें व मूल फार घाबरतें.

* **उपचारः**—खडीसाखरेचा काढा किंवा पाक दररोज देत जावा. यावर खडीसाखर हें उत्तम औषध आहे. २--हरडा, बेहडा, जेष्टमध आणि खडीसाखर हीं प्रत्येकीं एकेक तोळा घेऊन, शेरभर पाणी घेऊन ४ तोळे काढा राहिल्यावर प्रत्येक वेळेस एक तोळा याप्रमाणें दिवसांतून ४ वेळां देत जावा. ३-- कुमारीचा (कुवारकांड्याचा) रस थोडा मध घालून घ्यावा, किंवा समुद्रफळ पाण्यांत उगाळून घ्यावें, ह्मणजे वांति होऊन कफ पडेल. ४--मुलाचे छातीवर व पाठीवर टरपेनटाईनचा शेक द्यावा. ५--सुरवारी हरडा पाण्यांत उगाळून द्यावा, ह्मणजे मळशुद्धि साफ होऊन विकार कमी होईल. ६--कळकीच्या पाल्याचा काढा खडीसाखर घालून त्यांत टांकणखाराची लाही अर्धगुंज व हळदीचें चूर्ण २ गुंजा घालून द्यावा. ७--साजूक तूप ३-६ मासे सकाळीं रोज घ्यावें.

## तृषा (तहान).

**उपचारः**—१--यादी नंबर २२४ चें औषध द्यावें. किंवा भाताच्या लाह्या पाण्यांत घालून तें पाणी निम्में आटवावें, मग तें थंड झाल्यावर त्यांत थोडा मध

---

* पुष्कळ वैद्याचें असें ह्मणणें आहे कीं या विकारावर हटकून गुण देणारें औषध माहित झालेलें नाहीं. पण उपचार करितांना उष्णता न वाढेल अशी तजवीज ठेवावी.

घालून द्यावें. २ यादी नंबर ५१ चा काढा द्यावा. ३--सोनें, रुपें किंवा लोखंड तापवून पाण्यांत विझवून तें पाणी प्यावें. ४--काळींद्राक्षें आणि जेष्टमध यांचा काढा द्यावा ५--सुमारें तोळा दीड तोळा धने, ५--६ तोळे पाण्यांत ५--६ घटिका भिजत घालून त्याच पाण्यांत वाटावे, व तें पाणी गाळून त्यांत थोडा मध घालून द्यावें. ६--तांदुळाचे धुवण मध घालून द्यावें. ७--तूप आणि दूध एकत्र करून द्यावें.

## धातुविकार.

**धातु पडणें**:—योग्य वयापूर्वीं स्त्रीसंभोग केल्यानें, आतिशय स्त्री संभोगानें, किंवा निर्बलतेनें, हा विकार उत्पन्न होतो.

**उपचारः**—१-यादी नं. १६४।२११ चीं औषधें द्यावीं. किंवा तुडतुडीचें पाळ ४।५ मासे घेऊन गाईचे ५।६ तोळे दुधांत उगाळावें आणि त्यांत पिठीसाखर ६ मासे घालून दररोज सकाळीं द्यावें. २—वडाचा चीक संध्येच्या दोन पळ्या घेऊन त्यांत ४।५ तोळे दूध व पैसाभार खडीसाखर घालून तें घ्यावें. ३—पांढरें गुलबाशीचा कांदा गाईचे दुधांत उगाळून द्यावा. ४-पांढरें कोरंटकीच्या पाल्याचा रस जिरें घालून द्यावा. ५-वांकेरीचें भातें गाईचे दुधांत उगाळून खडीसाखर घालून द्यावें. ( यादी नंबर २२१ पहा. ) ६--पिंवळ्या फुलाचे कापशीचा पाला सु. ६ मासे वाटून खडीसाखर घालून द्यावा.७-प्रवाळ (यादी नंबर ११२ पहा ) किंवा सुवर्णमाक्षिक ( यादी नंबर ११६ पहा ) किंवा गोक्षुरादि गुग्गुळ (यादी नंबर १४८ पहा ) हीं औषधें द्यावीं. ८-गुळवेलीचें ४।५ गुंजा सत्व दूध आणि खडीसाखर यांतून द्यावें. ९-खसखस २ तोळे आणि गाईचें दूध ७-तोळे यांची साखर घालून क्षीर करून खावी.

**सूचनाः**—स्त्रीसंभोग माफक ठेवावा, शृंगारयुक्त पुस्तकें वाचूं नयेत, सोसेल तर शीतोदकानें स्नान करावें, पौष्टिक पदार्थ खावे, फार ऊष्ण पदार्थ खाऊं नयेत, रात्रींत ८।९ तास झोंप घ्यावी, उन्हांतून फार वेळ चालूं नये, व निजण्याचेपूर्वीं लघुशंकेस जावें.

**धातुपुष्टतेस उपचारः**—१ आंवळकटी व गोखरूं या प्रत्येकाचें चूर्ण २ मासे व गुळवेलीचें सत्व १ मासा, असें तूप साखरेबरोबर दररोज सकाळीं द्यावें, म्हणजे धातुस्थानची उष्णता जाऊन धातु पुष्ट होते. बदामपाक द्यावा. ( यादी नंबर १६१ पहा ) २—अश्वगंधाचें ३।४ मासे चूर्ण, तूप आणि मध यांतून सायंकाळीं निजते वेळेस द्यावें. ( तूप आणि मध हे विषम भागानें घ्यावे ) ३--अश्वगंधादि चूर्ण द्यावें (यादी नंबर १०३ पहा ) किंवा भुइकोहळ्याचें चूर्ण तूप साखर आणि दूध यांबरोबर द्यावें. ४- सुंठ २ तोळे, पिठीसाखर ५ तोळे, खारका १० सालंमिश्री ४ मासे, केशर अर्धामासा, पिंपळी १ मासा, जायपत्री १ मासा, जायफळ १ मासा, आणि वेलची दाणे ३ मासे,

असे जिन्नस घेऊन सर्व बारीक कुटून भाड्यांत भरून त्यांत पावशेर तार्जे तूप घालून ठेवावें, आणि मोठे मनुष्यास रोज दोन तोळे व लहानास १ तोळा द्यावें. ५—गाईचें अगर ह्मशीचें धारोष्ण दूध प्यावें. धारोष्ण दूध शुक्र धातु उत्पन्न करण्याविषयीं अति उत्तम आहे. ६-गाईचें दूध १०।१२ तोळे घेऊन चांगलें तापवावें आणि निवाल्यावर त्यांत खडीसाखर ६ मासे व तूप ३ मासे घालून घ्यावें. हें औषध शुक्र धातु उत्पन्न करणारें व अति उत्तम पुष्टिदायक आहे. ७-सफेतमुसळी, गुळवेलीचें सत्व, कवचबीज, सरांटे, सांवरीचा कंद आणि आंवळकटी, हीं औषधें समभाग घेऊन वस्त्रगाळ चूर्ण करून तें दूध आणि तूप यांतून द्यावें. ८--कोहाळेपाक द्यावा. ( यादी नंबर १६३ पहा. ) सुवर्णमालिनिवसंत द्यावा.( यादी नंबर १४३ पहा. ) ९--कामदुधा द्यावी. ( यादी नंबर १२१ पहा. )

**स्वप्नावस्था:**—पुरुषाचें वय १७।१८ वर्षांचें झालें आणि त्यास कामवासना उत्पन्न झाली, किंवा मनांत स्त्रीविषयीं वारंवार येत असलें, किंवा धातुस्थान नीट नसलें ह्मणजे झोंपेंत धातुपात होतो, त्या विकारास स्वप्नावस्था ह्मणतात. मोठे माणसासहि या कारणांनीं हा विकार होतो.

या विकारापासून परिणाम वाईट होतो ह्मणून वेळेवर उपचार केले पाहिजेत. एका अनुभविक वैद्यानें असें सांगितलें आहे कीं, एकदां स्वप्नावस्था झाल्यानें जी शक्ति कमी होते तितकी पांच वेळां स्त्रीसंग केल्यानेंहि होत नाहीं.

हा विकार उत्पन्न होण्याचीं जीं कारणें वर सांगितलीं आहेत, त्यांचा प्रतिकार करण्याकडे विशेष लक्ष द्यावें. स्त्रीरूपाविषयीं किंवा शृंगारादि पुस्तकें वाचण्याविषयीं मनाची प्रवृत्ति होऊं देऊं नये. सर्व कांहीं आपल्या मनाचे स्वाधीन असतें.

**उपचार:**—उडदाची डाळ २।३ तोळे घेऊन तिचा काढा नवटांक करून त्यांत तूप अर्धा तोळा घालून ३-७ दिवस घ्यावा. २-सालंमिश्री, सफेत मुसळी, सरांटे, तालीमखाना, चिकण्याचा पाला, मेंदीचा पाला, सरक्यांचा मगज, व खडीसाखर हे जिन्नस समभाग घेऊन बारीक वाटून त्यापैकीं ३ मासे औषध कच्चा पावशेर दुधांतून प्यावें. ३--उपळसरीची मुळी दूध खडीसाखरेंतून घ्यावी. ४--सुवर्णमालिनीवसंत (यादी नंबर १४३ पहा,) किंवा सुवर्णमाक्षिक ( यादी नं. ११६ पहा ) घ्यावें.

**पथ्य:**—दूध, भात, तूप, गव्हांची पोळी, सांजा, तांदुळाची भाकरी, पडवळ, कोंवळें वागें, पांढरा भोंपळा, चाकवत, साखर, इत्यादि.

**अपथ्य:**—नारळ, गूळ, तेल, वगैरे उष्ण पदार्थ, पावटे, वाटाणे वगैरे वातकर पदार्थ, जागरण, लसूण, दहीं इ०.



## नारू.

**चिन्हें:**—नारू हा पांढऱ्या रंगाचा दोऱ्यासारखा जंतू आहे. ह्याचीं अंडीं बारीक परमाणूसारखीं असून तीं पाण्यांत राहतात. पाण्याचे द्वारें तीं शरिरांत प्रवेश करितात. नारूचा उपद्रव होऊं नये याकरितां पिण्याचें पाणी (संशय येईल तेव्हां) आधण आणून मग प्यावें. अंड्याचा शरिरांत प्रवेश झाल्यानंतर कांहीं वेळपर्यंत नारूचीं चिन्हें कांहींच दिसत नाहींत; परंतु नारू निघण्याची वेळ आली ह्मणजे दोन तीन प्रकारचीं निरनिराळीं चिन्हें होतात. त्वचेंत बारीक दोऱ्यासारखें नारूचें वेटोळें स्पष्ट दिसतें किंवा हातास लागतें. कोणास एकाएकीं नारू निघणाऱ्या जागीं पांढरा फोड येतो किंवा पुवळणास येऊन नारूचें तोंड बाहेर येतें व त्यावेळेस ताप, डोकें दुखणें व उमासे इत्यादि विकार होतात.

**उपचार:**—१-नारू बाहेर पडूं लागला ह्मणजे तो एका गुळगुळीत काडीच्या तुकड्यास गुंडाळावा आणि त्यावर गव्हाचें पोटिस बांधावें. याप्रमाणें बरेच दिवस करीत गेलें असतां नारू मुळापासून बाहेर पडतो. २ पहिल्या दिवशीं ६ मासे दुसऱ्या दिवशीं ३ मासे व तिसऱ्या दिवशीं १॥ मासा सोरा, ४ तोळे ताकांतून घ्यावा. घेतल्यानंतर २ प्रहरांनीं ताकभात जेवावा ह्मणजे नारूचे तुकडे होऊन बाहेर पडतील. ३--कापूर तुपांतून द्यावा. ४ वांगें भाजून दह्याशीं भरीत करून नारूवर ५।६ दिवस बांधावें ह्मणजे नारू बाहेर पडेल. ५ गहूं व तागाचें बीं समभाग घेऊन त्याचें चूर्ण करून तें तुपांत भाजून गुळाबरोबर द्यावें. ६-रुईचा पाला ३ भाग व तांदूळ एक भाग याप्रमाणें घेऊन एकत्र वाटून तें नारूवर बांधावें. ७-हिंग, लसूण व साबण हीं समभाग एकत्र करून तें नारूवर बांधावें. ८-साबण व शिकेकाई समभाग घेऊन पाण्यांत वाटून विड्याचे पानावर पसरून ती पट्टी बांधावी. ९-सहा माशापासून एक तोळापर्यंत पापडखार आणि तितकाच गूळ एकत्र करून सकाळीं खावें, आणि रात्रीं दहींभात जेवावा. (दिवसास जेवावयाचें नाहीं.) ह्मणजे तावडतोब नारू बरा होतो. १० पिकलेल्या केळ्यामध्यें बिबवा ठेंचून घालून तें केळें सभोंवार कणीक लावून भाजावें आणि खावें, याप्रमाणें ३ दिवस करावें.

**विशेष सूचना:**—वरील औषधांपैकीं प्रथम नंबर २-५-८-९ या औषधांचा उपयोग करावा.

## नासारोग (नाकांतील रोग.)

हे होण्याचीं कारणें:—वाईट पाणी पिणें, जलक्रीडा, धुकें, वायु, अतिभाषण, अतिजागरण इत्यादिकांनीं वातादि दोषांचा कोप होऊन ते नासारोग उत्पन्न करितात. याचे प्रकार १८ आहेत. त्यापैकीं मुख्य मुख्य सांगतों:—

**पडसें**:—( याचीं लक्षणें बहुतेकांस माहीत असतातच ) **उपचारः**–१--आलें, खडीसाखर आणि दालचिनी यांचा काढा द्यावा. २-गवतीचहाचा काढा द्यावा. ३-भाजलेले चणे खावे. ४-अमोनिया नाकांत ओढावा. ( यादी नंबर १९१ पहा. ) ५-थंड पदार्थ खाऊ नये.

**पीनसः**—मनुष्याचे नाक कोंदल्यासारखें होऊन कोरडें पडणें, ओलसर होणें, सुगंध किंवा दुर्गंध याचें ज्ञान न होणें, धुरासारखे श्वासोच्छ्वास, नाकांतून पू व रक्त येणें, नाकाला घाण, इ. विकार झाले म्हणजे त्यास पीनस असें म्हणतात.

हा विकार विशेष वाढला म्हणजे नाकांतील हाड कुजतें व समयीं किडेहि पडतात व टाळ्याला भोंक पडतें. ज्यास गरमीचा विकार आहे त्यास पीनस होण्याची विशेष भीति असते.

**उपचारः**—१ ऊन पाण्यांत तुरटी किंवा जस्ताचें फूल घालून त्या पाण्यानें नाक धुवावें. याचें साधारण प्रमाण पाणी ५ तोळे, तुरटी १-१॥ मासा किंवा जस्ताचें फूल २-३ गुंजा असें ठेवावें. २-मस्तकाला अभ्यंग करावा, घाम काढावा व नस्य द्यावें. ३-दह्यांत मिरपूड व गूळ घालून भक्षण करावें. ४-तरसाचें हाड पाण्यांत उबाळून नाकांत घालावें. ५-मिरपूड आणि गव्हाचें अन्न भक्षण करून निजण्याचे वेळीं थंड पाणी प्यावें. ६-जुनी तपकीर ओढावी. ७-पाठादि तेल नाकांत घालावें. ( यादी नंबर १७४ पहा. ) ८-सबजाचा रस १ तोळा व कापूर एक मासा एकत्र करून एके ठिकाणीं मर्दन करून ठेवावें आणि दररोज त्यांतील २-४ थेंब नाकांत घालावें; म्हणजे जळमटें पू व रक्त पडणें बंद होऊन पीनस बरा होतो.

**नासापाकः**—नासिकाश्रित पित्त दुष्ट होऊन तें नाकांत व्रण उत्पन्न करतें, नाक आंतून पिकतें व पुवानें ओलें असतें व त्यांतून गंधयुक्त लस वाहते. त्या विकारास नासापाक म्हणतात.

**उपचारः**—१-पित्तनाशक उपचार करावे. वांकेरीचें भातें द्यावें, व नाकांत घालावें. ( यादी नंबर २२१ पहा. ) २-राळ, अर्जुनवृक्ष, उंबर आणि कुडा यांचे झाडाची साल समभाग घेऊन काढा करून त्यानें नाक धुवावें. व हाच काढा आणि या औषधांचा कल्क यांत तूप सिद्ध करून तें नाकांत घालावें. ३-पहाडमूळ, हळद, दारू हळद, मोरवेल आणि पिपळी यांचा काढा, व जाईच्या पाल्याचा रस, त्यांत तिळाचें तेल घालून पचन करून तेल शेष राहिल्यावर तें नाकांत घालावें. ४-पाठादि तेल नाकांत घालावें. ( यादी नंबर १७४ पहा. )

**नाकांतून रक्त पडणें**:—१--नारळमाडाचे झाडावरील पोईचीं फुलें गाईचे दुधांत वाटून पोटांत द्यावीं, व त्याचा मस्तकास लेप करावा. तुपांत आंवळकटी भाजून

कांजींत वाटून तिचा मस्तकास लेप करावा. २--रक्तपित्तनाशक उपचार करावे. (रक्तपित्त प्रकरण पहा). ३-नाकावर थंड पाण्याची पट्टी बसवावी. ४--कपाळावर किंवा मानेवर बर्फ लावावें. ५--डाळिंबाची साल, तुरटी व मायफळ, यांची बारीक पूड करून नाकांत ओढावी. ६--हरडेदळ, मायफळ, बेहडेदळ, कात आणि तुरटी हीं प्रत्येकीं एकेक तोळा, आणि पाणी १४ तोळे, यांचा काढा करून त्याच्या पिचकाऱ्या नाकांत माराव्या. ७--बारीक कापडाची पट्टी, कात किंवा तुरटी किंवा मायफळ यांचे भुकटींत घोळून ती कांहींवेळ नाकांत भरून ठेवावी ८ -माती भिजवून डोक्यावर ठेवावी.

**सर्व प्रकारचे नासारोगांवर उपचारः**—१--पाठादि तेल नाकांत घालावें. (यादी नंबर १७४ पहा.) २--मस्तकास बदामाचें तेल गजावें. ३--वांकेरीचें भातें द्यावें. (यादी नंबर २२१ पहा.)

**पथ्यः**—अभ्यंग, भात, दूध, तूप, गहूं, कुळीथ, मूग, कोंवळें वांगें, पडवळ, शेवगा, लसूण, साखर इ.

**अपथ्यः**—स्नान, क्रोध, शोक, पावटे, वाटाणे वगैरे वातकर पदार्थ, केळें, थंडपाणी, इत्यादि.

## नाळगुद.

पोटांतील विकारांपैकींच हा एक विकार आहे. या विकारानें प्रथम पोटाला सूज येऊन मग ती वाढत वाढत जाऊन सर्व शरिरावर पसरते तेव्हां त्यास नाळगुद ह्मणतात. कितीएक वेळां पोटांत बेंबीजवळ एक प्रकारची रुंदट गांठहि उत्पन्न होते. तशी गांठ असून सूज असली ह्मणजे त्यास पेटें नाळगुद ह्मणतात.

**कोणत्याहि प्रकारचे नाळगुदांवर उपचारः**—१--खरवती, दांतिवरी आणि शेवगा या झाडांच्या साली प्रत्येकीं १-१॥ तोळा घेऊन कुटाव्या, आणि त्यांत कुळीथ १०--१२ तोळे घालून पाणी २८ तोळे घालून शिजवावें. आणि ४।५ तोळे राहिल्यावर गाळून द्यावें. याप्रमाणें ७ दिवस द्यावें. २--वारुळावर असलेल्या कुड्याचे झाडाची साल २-३ तोळे घेऊन ५-६ तोळे पाण्यांत वाटून गाळून तें द्यावें. ३-रुईच्या झाडाच्या कोंवळ्या ढिऱ्या २ अंगुळें लांबीच्या ३-४ घेऊन त्यात २।३ मिऱ्यें व २-३ लवंगा घालून वाटाव्या, आणि प्रत्येक वेळेस ४-५ मासे अगर शक्तिमानाप्रमाणें ७ दिवस द्यावें किंवा रुईचा चीक ८।१० थेंब घेऊन ७।८ तोळे दुधांत किंवा २।३ तोळे नारळाचे आंगरसांतून घ्यावा. ४-आपट्याचे सालीचा ४।५ तोळे रस पाणी घातल्या-वांचून काढून गाळून दररोज सकाळीं घ्यावा (दिवस ३). ५-सर्व अंगास सूज आल्यास, हेदीचा पाला ऊन पाण्यांत वाटून त्याचा रस ६।७ मासे, अगर सोसेल त्या मानानें घ्यावा. यापासून वांति होऊन सर्व दोष मोडतील. फार वांति झाल्यास थोडें तूप पाजावें, वरील औषधास पथ्य गव्हांची पोळी, तुरीचे डाळीचें वरण किंवा

दूधभात खावा. दुसरें कांहीं खाऊं नये. ६--खरवतीचे सालीचा रस शक्तिमान पाहून १ तोळ्यापासून २।३ तोळेपर्यंत घ्यावा. ७--दांतिजरीचीं पानें लहान मनुष्यास ४।५ व मोठ्यास ८।१० घेऊन गाईचे दुधांत वाटून तें घ्यावें. ८--वेल पाडळचे २।३ मासे मूळ गाईचे ४--५ तोळे ताकांत उगाळून ७ दिवस दुवक्ता घ्यावें. यास पथ्य १४ दिवस कुळथांचें काट आणि भात खावा. मीठ खाऊं नये.

**विशेष सूचनाः**—वरील औषधांपैकीं नंबर १ ते ७ चीं औषधें प्रथम द्यावीं. हीं फार उत्तमपैकीं आहेत. पथ्य दूध भात. या औषधांनीं इतर प्रकारचीही सूज निघते.

वरीलपैकीं कोणतेंहि औषध दिलें तरी पथ्य 'दूधभात' हें उत्तम होय. तसें नच जमेल तर दूध, भात, साखर, गव्हांचें खाणें, तांदुळाची भाकरी, तुरीचें वरण, शेवगा, पडवळ, हे पदार्थ खावे. वातकर व कफकर पदार्थ खाऊं नयेत.

## नेत्ररोग.

**डोळे येणें:**—कारणें व लक्षणें—बहुधा थंड वायु डोळ्यांस लागल्यानें, किंवा डोळ्यांत केर वगैरे गेल्यानें, हवेंत फेरफार झाल्यानें, किंवा अंगातील उष्णता, जागरण, उष्ण पदार्थ खाणें वगैरे कारणांनीं हा विकार होतो. डोळे आले ह्मणजे डोळ्यांची आग होते, व त्यांत रेती शिरल्याप्रमाणें वाटून ते खुपतात, पापण्या लाल होतात व थोड्या सुजतात व पाणी गळतें, पापण्या चिकटून राहतात, प्रकाश सहन होत नाहीं. डोळे उघडून पाहिलें असतां डोळ्यांतील पांढरा भाग आरक्त दिसतो. हा विकार वाढला ह्मणजे पूमिश्रित लस वाहूं लागते.

**उपचारः**—१—मलशुद्धीकरितां एरंडेल तेलाचा जुलाब द्यावा; व दररोज लवकर जेवावें. २--अफूचीं बोंडें १०।१५, फटकी पावतोळा, कात पावतोळा, आणि पाणी ४।५ शेर यांचा काढा करून ऊनऊन काढ्यानें (वस्त्राच्या पिळणीनें) दररोज डोळे शेकावे. ३--जेष्टमध, गुळवेल, त्रिफळा आणि दारुहळद, यांचा काढा करून मध घालून द्यावा. ४--स्त्रीचें दूध डोळ्यांत घालावें. ५--यादी नंबर २०८ चें औषध करावें. ६—जस्ताचें फूल ३ गुंजा व पाणी ५ तोळे घालून चांगलें मिश्रण करून डोळ्यांवर घड्या ठेवाव्या.

**डोळ्यांस उष्णता होऊन ते दुखूं लागल्यासः**—वेलदोड्याचे दाणे, पांढरा कात व काल्पी खडीसाखर हीं प्रत्येकीं एकेक भाग, व चवथा भाग कापूर, यांची वस्त्रगाळ पूड करून डोळ्यांत घालावी.

**डोळ्यांस सारा आल्यासः**—१—दररोज सकाळीं उपळसरीचे वेलीचा चीक डोळ्यांत घालावा (२१ दिवस) २—"डोळ्यांत फूल पडल्यास उपचार" या सदरांतील नंबर १।२।५ यापैकीं एखादें औषध डोळ्यांत घालावें.

**डोळ्यांत फूल पडल्यास उपचारः**—१—सुरवारी हरडा लिंबाचे रसांत उगाळून १५।२० दिवस डोळ्यांत घालावा. २—कापूर वडाच्या चिकांत वाटून १५—२० दिवस डोळ्यांत घालावा ह्मणजे फूल झडतें. हें औषध फार उत्तमपैकीं आहे. ३—आघाड्याचें मूळ मधांत उगाळून अंजन करावें ४—करंजाचे बियांचें चूर्ण करून त्यांस पळसाच्या फुलांच्या रसाचीं दहा पुटें द्यावीं, नंतर पळसाच्या फुलांच्याच रसांत बारीक खलून २।३ गुंजांची एकेक अशा गोळ्या बांधून प्रत्येक वेळेस १ गोळी पाण्यांत उगाळून अंजन करावें. ५—मोंगली एरंडाचा चीक डोळ्यांत घालावा. ६—यादी न. २०९ चें औषध करावें.

**रातांधळें (रात्र्यंध)** दुष्ट कफ, नेत्राच्या तीनही पटलांत राहून रात्रीचें दिसत नाहीं. त्यास रातांधळें ह्मणतात. ( दिवसास दिसत असतें. )

**कारणें**-प्रखर उन्हांत फिरणें, फार श्रम करणें, किंवा पक्काशय आणि काळीज यांस विकार होऊन त्यांचा व्यापार यथास्थित न चालणें, इत्यादि.

**उपचारः**—१—कारली (कारेतें)च्या पाल्याच्या रसांत मिरीं ऊगाळून तो रस डोळ्यांत घालावा. २—जाईचे पानांचे रसांत हळद आणि रसांजन उगाळून आंत थोडा मध घालून अंजन करावें. ३—गाईच्या शेणाच्या रसांत पिंपळी उगाळून अंजन करावें. ४—रसांजन, मनशीळ आणि देवदार समभाग घेऊन जाईचे पाल्याचे रसांत खलून गोळ्या कराव्या, आणि ती गोळी मधांत उगाळून अंजन करावें. ५—काळ्या तुळशीचे रसाचे २—३ थेंब सायंकाळीं डोळ्यांत घालावे. ( ३ दिवस. )

**अहिरा**—डोळ्याचे पांढरे बुबुळावर सशाचे रक्तासारिखा जो एक बिंदु उत्पन्न होतो त्यास अर्जून (अहिरा) असें ह्मणतात.

**उपचारः**—१-साखर, दह्याची निवळी आणि मध हे जिन्नस समभाग एकत्र करून त्या मिश्रणाचे ५—४ थेंब डोळ्यांत घालावे. २—समुद्रफेण आणि साखर यांचें अंजन करावें. ३-मधांत शंख घांसून अंजन करावें.

**काचबिंदुः**—डोळ्यांमध्यें कांचेसारिखें मांसाचें गुळूब येतें त्यास काचबिंदु ह्मणतात.

**उपचारः**-१—जळवा लावून रक्त काढावें. २—मिरीं पाव तोळा, पिंपळी अर्धा तोळा, समुद्रफेण अर्धातोळा, सैंधव पाव तोळा, आणि मसुरा २। तोळे, हे जिन्नस एकत्र करून काजळासारिखें बारीक चूर्ण करून डोळ्यांत घालावें. हें चूर्णांजन कंडू, काच, कफ आणि मळ यांचा नाश करितें.

**सर्व प्रकारचे नेत्ररोगांवर उपचारः**—१—पिंपळी, त्रिफळा, पिंपळाची लाख, लोध्र आणि सैंधव हे समभाग जिन्नस ह्माक्याचे रसांत खलून २।३ गुंजांची एक गोळी अशा गोळ्या करून ठेवाव्या, आणि प्रत्येक वेळेस एक गोळी पाण्यांत उगाळून अंजन

करावें; ह्मणजे काचबिंदु, कंडू, फुलें, अहिरा वगैरे विकार बरे होतात. २—बाळहरडे, वेखंड, कोष्ट, पिंपळी, मिरीं, बेहड्याच्या फळांचा गीर, शंख व मनशीळ, समभाग घेऊन त्यांचा गाईचे अथवा शेळीचे दुधांत खल करून २।३ गुंजांची एकेक अशा गोळ्या करून ठेवाव्या, आणि प्रत्येक वेळेस १ गोळी पाण्यांत उगाळून अंजन करावें; ह्मणजे फूल, रातांधळें, अहिरा व काचबिंदु, यांचा नाश होतो. ३—बाळहरडे एक तोळा, १० तोळे पाण्यांत एक रात्र भिजत घालावे, नंतर ते त्या पाण्यांत थोडे चोळून तें पाणी वस्त्रगाळ करून त्यांत तुरटीची लाही पावतोळा घालून बाटलींत भरून ठेवावें. आणि प्रत्येक वेळेस २–३ थेंब डोळ्यांत घालावे. दिवसांतून २–३ दां घालावें ह्मणजे बहुतेक नेत्ररोग बरे होतात.

**पथ्यः**—साळीचे तांदुळांचा भात, गहूं, मूग, सैंधव, गाईचें तूप, गाईचें दूध, साखर, मध, इ०.

**अपथ्यः**—चाकवत, तांदुळजा आणि पुनर्नवा यांशिवाय संपूर्ण शाका, उडीद, मोहऱ्या, जलांत शिरून स्नान करणें, बारीक ऊंस, मैथून, जागरण, दहीं, मद्य, सूर्यप्रकाश, खारट, कडू व उष्ण पदार्थ, इत्यादि.

## पांडुरोग.

वातादि दोष कुपित होऊन ते रक्त दूषित करून रक्तांतील तांबडे कण कमी होऊन शरिराची त्वचा पांडुरवर्ण करितात, त्यास पांडुरोग ह्मणतात.

**कारणें व लक्षणें**:—फार रक्त गेल्यानें शरीर फिकट पिंवळें होऊन पांडुरोग होतो. अत्यार्तव, संग्रहणी, शरिरांतून फार पू वाहिल्यानें, चांगलें पुरेसें अन्न न मिळाल्यानें, फार दिवस ज्वर आल्यानेंहि हा रोग होतो.

पांडुरोग सहज ओळखितां येतो. शरीर फिकट व पांढरें दिसतें. शरिरांतून रक्त नाहींसें झाल्यासारखें वाटतें. डोळे, तोंड, जीभ रक्तहीन दिसतात. नखात तांबडेपणा रहात नाहीं. थोडीशी मेहेनत केल्यानें श्वास लागतो. नाडी फार हलकी, लघ्वी स्वच्छ पाण्यासारखी होते. पहिल्यानें जंतावरील औषध देऊन नंतर एरंडेल द्यावें. व नंतर उपचार सुरू करावे.

**याचे प्रकार**—१-वातपांडु २-पित्तपांडु ३-कफपांडु ४-सन्निपातपांडु आणि ५-माती खाल्ल्यापासून झालेला पांडु.

**पांडुरोगाचें कारण**—अति मैथून, अति आम्ल पदार्थ व खारट पदार्थ खाणें, अति मद्यपान, माति खाणें, अति तिखट पदार्थ खाणें, इत्यादि.

**वातपांडु लक्षण**—त्वचा, मूत्र आणि नयन यांस रुक्षता, काळेपणा आणि तांबडेपणा असणें, कंप, सुया टोंचल्यासारखी पीडा, पोट फुगणें, शूल, इत्यादि.

**उपचार**—" सर्व प्रकारचे पांडूवरील उपचार " या सदरांतील **नंबर १।२।३।८** यांपैकीं एकादें औषध द्यावें.

**पित्तपांडु लक्षण**—मूत्र, विष्टा आणि नेत्र हीं पिवळीं, व दाह, तहान, ज्वर **मळ** पातळ होणें, शरीर पिवळें होणें, इ०

**उपचार**—" सर्व प्रकारचे पांडूवरील उपचार " या सदरांतील नंबर ४ **चें औषध** द्यावें. कोहळेपाक द्यावा. ( यादी नंबर १६३ पहा. )

**कफपांडु लक्षण**—मुखांतून कफाचा स्राव, सूज, डोळ्यांवर झांपड, **आळस**, त्वचा, मूत्र, नेत्र आणि तोंड ह्यांस पांढरेपणा इत्यादि.

**उपचार**—" सर्व प्रकारचे पांडूवरील उपचार " या **सदरांतील नंबर १** किंवा ६ यांपैकीं औषध द्यावें, किंवा यादी नंबर १०४ चें औषध द्यावें, किंवा **दश-मुळांचा** काढा द्यावा. ( यादी नंबर १६ पहा. )

**सन्निपातपांडु लक्षण**—वर सांगितलेलीं वातादि पांडूचीं लक्षणें होणें.

**उपचार**—" सर्व प्रकारचे पांडूवरील उपचार " या सदरांतील औषधें **द्यावीं.**

**मृत्तिका खाल्ल्यापासून झालेल्या पांडूचीं लक्षणें**—नेत्र खोल, गाल, भृकुटी, पाय, नाभी व शिस्न यांस सूज, कोठ्यामध्यें कृमी, रक्त व कफमिश्रीत ढाळ, अशीं लक्षणें होणें व माती ज्या प्रकारची असते तसे दोष कोपणें. माती तुरट असली तर वायु कोपतो, खारी असली तर पित्त कोपतें, गोड असली तर कफ कुपित होतो.

**उपचार**:—१-नागकेशर, जेष्टमध, पिंपळी, निशोत्तर आणि सुंठ यांचा काढा करून त्याच्या २१ भावना मातीला देऊन ती माती खावयास द्यावी. २-" **सर्व प्रकारचे** पांडूवर उपचार " या सदरांतील औषधें द्यावीं.

**सर्व प्रकारचे पांडूवर उपचार**:—१ जुनें लोहकीट १० तोळे, लवंगा, जायपत्री, जायफळ, एकेक तोळा, खरवतीची साल २ तोळे, व हरडेदळ २ तोळे, याप्रमाणें औषधें घेऊन सर्व औषधाचें वस्त्रगाळ चूर्ण करावें. मग त्या चूर्णास गोमूत्राचीं ३ पुटें देऊन ठेवावें, आणि प्रत्येक वेळेस १।२ मासे चूर्ण व तितकाच मध असें एकत्र करून द्यावें. शक्तिमानाप्रमाणें कमजास्त प्रमाण करावें. **पथ्यः**—दूधभात, अद-मुरेभात, तुरीचे डाळीचें वरण, तूप, साखर, पडवळाची भाजी इ० **अपथ्यः**—कांकडी, कोहळा, कारेतें, केळफूल इ० २-यादी नंबर ५३ चा काढा द्यावा. यादी नंबर १७७।१५९ यांपैकीं एक औषध द्यावें. ३-शिलाजित, मध, वावडिंग, तूप, बाळहिरडे, व साखर, हीं समभाग घेऊन त्यांपैकीं चूर्ण करण्याजोगीं आहेत त्यांचें चूर्ण करून मग सर्व एकत्र करून तें द्यावें. हें मिश्रण प्रत्येक वेळेस १-१॥ तोळा असावें. ४-चित्रकाच्या चूर्णाला आंवळकटीच्या काढ्याच्या तीन भावना द्याव्या आणि त्यांतील १-२ मासे चूर्ण

रात्रीं निजतांना गाईच्या तुपांतून देत जावें. ५—लोखंडाचे पात्रांत रोज दूध तापवून ७ दिवस प्यावें. ६-लोहभस्म, मध व तूप यांबरोबर द्यावें. ( यादी नंबर ११४ पहा. ) ७—मंडूर वावडिंगाची पूड आणि मध यांत किंवा पिंपळी व मध यांत द्यावा. (यादी नंबर ११३ पहा. ) ८-गोमूत्रांत लोहभस्म सात दिवस भिजत घालून ठेवावें, नंतर तें दुधाबरोबर द्यावें. ९-गंधक रसायन द्यावें. (यादी नंबर १२४ पहा.) १०-कोहळेपाक द्यावा. ( यादी नंबर १६३ पहा. ) ११-हरीतकी (बाळहरडे) गोमूत्रांत २१ दिवस भिजत घालावी. नंतर सुकवून चूर्ण करून ठेवावें, आणि त्यांतून रोज ४।५ मासे द्यावें. १२-नवायसादि चूर्ण द्यावें ( यादी नंबर १०४ पहा. ) १३-लोहभस्म, शंखभस्म, पिंपळी आणि गुळवेलीचें सत्व समभाग घेऊन तें दिवसांतून तीन वेळां द्यावें.

**पांडूचीं असाध्य लक्षणें**:—फार दिवसांचा, सर्व शरीरास सूज आली असून जो रोगी सर्व पदार्थ पिंवळे पाहतो, ज्याचा मळ हिरव्या रंगाचा व कफमिश्रित पडतो, जो ओकारी, मूर्च्छा व तृषा यांनीं पीडित, जो रक्तक्षयाप्रमाणें पांढरा होतो, ज्याचे दांत, नखें आणि डोळे पिंवळे झाले आहेत, हातपाय, डोकें यांना सूज आली असून मध्य देह शुष्क झाला आहे व ज्यास अतिसार आणि ज्वर आहे, असे रोगी असाध्य.

**पथ्य व अपथ्यः**—" कामला " या प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें.

## पित्तविकार.

**आम्लपित्तः**—हें स्वतंत्र प्रकरण आहे तें पहा.

**पित्तशमनास उपचारः**—१-" आम्लपित्त " या प्रकरणांत सांगितलेले उपचार करावे. आलें सोलून किसलेलें ६ तोळे व जिरें ६ तोळे एकत्र वाटून लिंबाच्या रसाचीं सात पुटें द्यावीं. ( सावलींत वाळवावें. ) नंतर गाईचें तूप सुमारें २।३ तोळे एका कढईत घालून त्यांत तें साधारण तळून मग त्यांत खडीसाखर घालून प्रत्येक वेळेस १ तोळा द्यावें, ह्मणजे पित्तविकार मोडून चांगली क्षुधा लागते. २-जिरें ६ तोळे घेऊन त्यास ह्माक्याचे रसाचीं ७ पुटें द्यावीं; नंतर आल्याचा रस, लिंबाचा रस व रानतुळशीचा रस या प्रत्येकाचें एकेक पुट देऊन चूर्ण करून २ मासे चूर्ण व २ मासे साखर असें प्रत्येक वेळेस द्यावें. ३—सोडावाटर द्यावें. ( यादी नंबर २२९ पहा. ) ४—बदामाचें औषध द्यावें. ( यादी नंबर २१३ पहा. ) ५-यादी नंबर १५८;१८८ हीं औषधें द्यावी. ६-आंवळकटी व सुंठ प्रत्येकीं एक भाग हिरवी व एक भाग तुपावर तळलेली अशी घेऊन एकत्र करून वस्त्रगाळ चूर्ण करावें, आणि तें साखरेबरोबर खावें. ७-कोरंटकी, ह्माका व काळी तुळस यांचा पाला एकत्र वाटून गाईचें दूधांत कालवून द्यावा. ८-गाईचें दूध व साखर यांतून गुळवेलीचें सत्व द्यावें. ९-गाईचें दूध पावशेर घेऊन त्यांत तितकेंच पाणी व खडीसाखर १ तोळा व एक पिंपळी अशीं घालून काढा करावा, शेष दूध राहिल्यावर द्यावें. पिंपळी काढा झाल्यावर काढून टाकावी. १०-

कोहळ्याचा रस १ तोळा व खडीसाखर ६ मासे एकत्र करून द्यावें. ११–पांढरे जास्वंदीचे पाल्याचा १-२ तोळे रस साखर घालून द्यावा. १२–मनुका, खडीसाखर पित्तपापडा व बाळहरडी यांचा काढा द्यावा १३.-मुरांवळा, गुलकंद, सूतशेखर ( यादी नंबर १४४ ) प्रवाळभस्म ( यादी नंबर ११२ ). व वसंत ( यादी नंबर १४३ ) यांपैकीं एखादें औषध द्यावें. दूध मनुका, बेदाणा, खडीसाखर व पित्तपापडा, हे पदार्थ पित्त शमविणारे आहेत ह्मणून याचें सेवन करीत असावें.

**रक्तपित्त**—हें स्वतंत्र प्रकरण आहे तें पहावें.

**पथ्य व अपथ्य**—" आम्लपित्त " या प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें करावें.

## पैण.

हा रोग कातडीवर होणारा आहे. याचे योगानें कातडी सुजून तीवर बारीक बारीक तादळासारख्या व लसेनें भरलेल्या अशा दाट पुळ्या उठतात, व त्या जाग्याची आग होते, आणि त्यापासून बऱ्याच वेदना होतात. बहुधा हा रोग ओंठ, मान, खांदे, गळा, मस्तक, किंवा कंबर या ठिकाणीं होतो.

**उपचार**—१–रिंगीचे झाडाचें पाळ थंड पाण्यांत उगाळून लावावें. २-शिवनींचे झाडाची साल थंड पाण्यांत उगाळून वर लावावी व पोटांत द्यावी. ३-वोंवीच्या झाडाचें पाळ उगाळून लावावें. ४." गौरीचे केंस " या नांवाची पाण्याचे आश्रयास भिंतीवर किंवा अशा प्रकारचे ठिकाणीं लहानसर झाडें असतात, त्यांची दांडी काळी असून लांबी साधारण वीतभर असते. हीं झाडें सुकवून जाळून त्यांची राख करावी, आणि ती तिळाचे तेलांत खलून लावावी. ५ वृक्षभेंडीच्या झाडाची साल पाण्यांत उगाळून लावावी, किंवा याच भेंडीचा पाला आणि पाणपोईचा पाला एके ठिकाणीं वाटून रस काढून लावावा. ६--गोपीचंदन पाण्यांत उगाळून लावावें. ७.पेंडखलीच्या पाल्याचा रस पोटांत द्यावा. व तोच पाला वाटून वर लावावा. ( मीठ आणि वातुळ पदार्थ खाऊं नये. ) ८-पांढऱ्या गुंजेच्या पाल्याचे ६ मासे रसांत ३ मासे जिऱ्याची पूड घालून पोटांत घ्यावी. हें औषध ३ दिवस द्यावें ९-सोनकाव दह्यांत उगाळून वर लावावी.

## पोटफुगी.

मलावरोध, आमांश, अजीर्ण आणि शूळ वगैरे मुळें, अन्नाशय आणि आंतडीं यांत वायु भरून जी फुगवटी येते तिला पोटफुगी ह्मणतात.

**कारणें:**—अजीर्ण, अग्निमांद्य, अशक्तता, वायुगोळा, आम्लपित्त, इत्यादि.

**उपचार:**—१-लंघन करावें. २-हिंगाष्टक चूर्ण लिंबाचे रसांतून द्यावें. ( यादी नंबर १५० पहा. ) ३-हिंग, पादेलोण, ओंवा आणि पेपरमिट समभाग घेऊन, चूर्ण करून पाण्यांतून किंवा लिंबाचे रसांतून द्यावें. ४-सूतशेखर लिंबाचा रस, आल्याचा रस

आणि खडीसाखर यांतून द्यावा. ५-हिंग, सैंधव, कोष्टकोळिंजन आणि वेखंड लिंबाच्या किंवा रुईचे पानांच्या रसांत उगाळून पोटावर लेप द्यावा.

## बालरोग ( लहान मुलांस होणारे रोग )

मुलांचे रोगाचा विचार करितांना मुख्य गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं त्याला होणारे सर्व रोग हे मातेपासून अगर वरदुधापासून होत असतात. मूल ८।९ महिन्यांचें होईपर्यंत त्याजला दुधावरच ठेवावें. मातेचें दूध हें सर्व दुधांत श्रेष्ट आहे. मुलास आईचें आंगावर दूध मिळत नसेल तर आईच्याच वयाची निरोगी दाई ठेवून तिजला आईचाच नेहमींचा आहार घालून तिचें दूध त्यास पाजीत जावें. दाई मिळण्यासारखी नसेल तर बकरीचें, बकरीचें नच मिळेल तर गाईचें व तें नच मिळेल तर म्हशीचें दूध पाजावें. आईचे दुधापेक्षां गाईचें अगर म्हशीचें दूध जास्त जाड असतें. कित्येक स्त्रिया गाईचें दूध अगर म्हशीचें दूध उकळून जास्त खरपूस तापवून जास्त दाट करून मुलांस पाजितात. त्याकारणें मुलांस अजीर्ण होऊन जुलाब, उलट्या, पोटदुखी वगैरे रोग होतात. म्हणून केव्हांही म्हशीचें अगर गाईचें दूध घट्ट करून तापवून घालूं नये. ज्या गाई म्हशीस भरपूर सरकी मिळत असते त्या दुधांत $\frac{1}{4}$ पाणी घालून चांगलें तापवून वरची मलई काढून घालावें. गाईचे अगर म्हशीचे दुधापेक्षां आईचें दूध गोड असतें, म्हणून गाई म्हशीचे दुधांत थोडी साखरही घालणें जरूर असतें. जंत वगैरे होऊं नयेत म्हणून अगदीं थोडें मीठही टाकणें जरूर असतें. मूल एक वर्षाचें झालेनंतर पाणी घालण्याची जरूरी नाहीं. आईस अजीर्ण, ज्वर, क्षय, ताप वगैरे असेल तर आंगावर दूध कमी येतें. परंतु त्या थोड्या दुधानेंसुद्धां तोच रोग मुलास होतो म्हणून सावधगिरी बाळगावी. रोगी जनावरांचें दूध मुलांस दिल्यापासूनही कित्येक रोग होतात. सर्व मुलांस सारखे विकार होतात असें नाहीं. परंतु कफ, वात मिश्रणानें खालील विकारांपैकीं बहुतेक विकार होतात.

१ सर्वसाधारण रोग ( ज्वर, कफ, मलशुद्धि, वांति इ. ) २डबा ३ खोकला कफ ४ माती खाणें. ५ मल, मूत्र अवरोध ६ ससणी ७ आकडी ८ खर पडणें ९ अतिसार.

**साधारण** ( ज्वर, कफ, मलशुद्धि, वांति इ० ) **विकारांवर उपचार—** १—नागरमोथे, मिरीं, सुंठ, जिरें, पिंपळी, बेलफळाचा मगज, लवंगा, इंद्रजव आणि अतिविष हीं औषधें समभाग घेऊन त्याचें वस्त्रगाळ चूर्ण करून लिंबाच्या रसांत खल करून गोळ्या कराव्या आणि दररोज १ गोळी लहान मुलांस द्यावी; म्हणजे मलशुद्धि होऊन पोट साफ होतें; व खरूज, जंत किंवा डबा हे विकार होत नाहींत. २-नागरमोथे आणि अतिविष या दोन औषधांचें वस्त्रगाळ चूर्ण करून मधांतून द्यावें, म्हणजे ज्वर व वांति हे विकार नाहींसे होतात. ३-अतिविषाचें चूर्ण मधांतून द्यावें म्हणजे ज्वर व खोकला

हे दूर होतात. ४-मुलांची प्रकृति चांगली राखण्यास बाळगुटी द्यावी. ( यादी नंबर २१४ पहा. ) ५-यादी नंबर २१७ यांत लिहिलेले उपचार करावे.

२ **मुलांचे पोटांतील डब्बा**:—हा रोग दुधाचें सायटें पोटांत गेल्यानें, किंवा अशा प्रकारच्या पदार्थांचे सेवनानें पोटांत सायट्यासारखा किंवा बेडकासारखा आकार होऊन आंतड्यांत चिकटून राहतो, व मग वाढतां वाढतां त्याचा आकार डब्यासारखा होतो. त्यास खालीं किंवा वर अथवा बाजूस तोंड असतें. ज्याचें तोंड खालीं असतें तो असाध्य असतो. हा रोग बहुधा ६ महिन्यानंतरचे मुलांस होतो.

हा विकार झाला ह्मणजे वरगड्या उडूं लागतात, मलशुद्धि साफ होत नाहीं, मळ बुळबुळीत, चिकट व थोडथोडा पडतो, व कधींकधीं त्याच्या लेंड्या पडतात. मूत्राचा रंग पिवळट असून तें कपड्यास लागलें तर त्याचा डाग पडतो. शक्ति क्षीण होते, पोट मोठें होतें व तें दाबून पाहिलें तर रोग हातास लागतो.

**उपचार**:—१-पांढरे गोकर्णीचे बियांचें वस्त्रगाळ चूर्ण २।३ मासे, व तितकाच गूळ असें एकत्र करून द्यावें, म्हणजे रेच होऊन विकार मोडेल. पांढरे गोकर्णीचें पाळ थंड पाण्यांत उगाळून त्यांत सोनामुखी २।४ पानें वाटून तें द्यावें, किंवा आघाड्याचा क्षार, मिरीं आणि लवंगा समभाग घेऊन २।३ माशांची गोळी करून द्यावी. २-मृग नक्षत्रांत जे तांबडे किरमिजी मखमालीप्रमाणें रंगाचे किडे उत्पन्न होतात व त्यांस मृगाचे किडे म्हणतात त्यांपैकीं एक दोन किडे, तुळशीचा रस तीन मासे व मध २।३ मासे घेऊन त्यांत उगाळून द्यावे. याप्रमाणें ४।५ दिवस देऊन आराम वाटल्यास रोगाचे मानानें हें औषध कमजास्त दिवस द्यावें. हे किडे पुष्कळ लोक संग्रहास ठेवितात. ३-यादी नंबर २०७ चें औषध द्यावें. कांसवाची कपाळ-करवंटी पाण्यांत उगाळून पाजावी. ४-कारेतीचा पाला, अडुळशाचा पाला, पिकलेलीं विड्याचीं पानें आणि जांभळीची साल यांचा प्रत्येकीं २।३ मासे रस काढून एकत्र करून त्यांत १ मासा वेखंड उगाळून ७ दिवस द्यावें. तेल, तिखट, आंबट खाऊं नये. ५ खरवतीचे झाडाची साल, चित्रकाचें पाळ आणि आघाड्याचें पाळ हीं प्रत्येकीं १ मासा घेऊन गोमूत्रांत उगाळून तें द्यावें. या औषधानें कदाचित् रेच होतील. ६-काळाबोळ व हिंकेमाली प्रत्येकीं सुमारें २ मासे घेऊन त्याचें चूर्ण गोमूत्रांतून द्यावें. ७-कुमारीआसव द्यावें. ( यादी नंबर १७८ पहा. ) हें मुलांचे पोटांतील सर्व विकारांवर फार चांगलें आहे. हें घेतल्यानें मलशुद्धि साफ होऊन सर्व विकार मोडतात. कुमारी आसव न मिळाल्यास कुमारीचा ( कुंवारकांड्याचा ) रस ।॥· १ तोळा व मध १ मासा घालून द्यावें.

**विशेष सूचना**:—कुतरीचें दूध ५।६ थेंब घेऊन तें प्रत्यहीं दुधांतून पाजिलें असतां मुलांस कधींहि डबा होणार नाहीं. कुतरीचें दूध पाहिजे तेव्हां मिळत नाहीं, याकरीतां कुतरीच्या दुधांत कापडाचा तुकडा भिजवून तो सुकवून ठेवावा, आणि

त्यांतील थोडासा तुकडा घेऊन मुलांस घालावयाचे दुधांत भिजवून त्याच दुधांत तो फडका पिळून नंतर तें दूध मुलांस घालीत जावें. तसेंच मुलांस जें दूध घालावयाचें असेल त्यांत तितकेंच पाणी घालून कढवून शेष दूध राहिल्यावर फडक्यावर गाळून घालावें. निदान दूध चांगलें तापवून गाळून तरी घालावें, म्हणजे डबा होणार नाहीं.

" या विकारावर सदोदित मलशुद्धि साफ होणें फायदेशीर आहे, म्हणून त्याकडे विशेष लक्ष द्यावें. "

डबा न होण्याविषयीं, व सर्दी किंवा कफ न होण्याविषयीं, एका मनुष्यानें पुढें दिलेला उपाय सांगितला आहे, व तो अगदीं खात्रीचा आहे. आम्हींहि त्याचा अनुभव पाहिला आहे, व तो फायदेशीर आहे अशी आमची खात्री झाली आहे. तो उपाय असा कीं मुलांचे अंगांत सदोदित उत्तम फ्लानेलचें डगलें ठेवावें. हा उपाय मूल २।३ वर्षांचें होईपर्यंत करावा, म्हणजे कधींहि विकृति होणार नाहीं. उपाय सोपा आहे.

**३ खोकला व कफ यांजवर उपायः**—१-रेवाचिनीचा १।२ गुंजा शिरा, दुधांत किंवा कोरफडीचे रसांत उगाळून द्यावा. म्हणजे वांति होऊन कफ पडेल, किंवा मलशुद्धि होऊन विकार कमी होईल. २-अडुळशाचा रस, मध व खडीसाखर घालून द्यावा.

**४ मूल माती खात असल्यासः**— सोनकावेचा खडा मुलांचे हातांत द्यावा. असें केल्यानें ती मातीच आहे असें समजून मुलें खातात व त्यामुळें माती खाण्याचें बंद होतें.

**५ लघवीस व शौचास बंद झाल्यासः**—उंदराच्या लेंड्या पाण्यांत कालवून बेंबीवर लेप द्यावा म्हणजे लघवी होईल आणि सुरवारी हरडा गोमूत्रांत उगाळून पाजावा म्हणजे शौचास साफ होईल.

**६ ससणीः**—( श्वासनी-उडतें. ) ह्या रोगाच्या उत्पत्तीला कफकारक पदार्थ सेवन केल्यानें पोटांत कफाचें जाळें होऊन तें वायूचे गतीस अवरोध करितें, व तें वर चढतां चढतां काळीज व्यापून टाकितें, कंठावरोध करतें, व पोट एकसारिखें उडत असतें. त्या विकारास ससणी म्हणतात. हा रोग उत्पन्न झाला म्हणजे लवकर वाढतो.

**उपचारः**—१-गुळांत चण्याचे डाळीपेक्षांहि थोडा कमी इतका पापडखार घालून तें मिश्रण अंगावरील दुधांत पाजावें, म्हणजे ओकारी होऊन कफ पडेल. २-गोरोचन व हळद हीं समभाग एकत्र करून तें मिश्रण विड्याचे पानांचे रसांतून द्यावें. ३-कारेतीचे पाल्याचा रस काढून त्यांत थोडी हळद घालून व थोडी रेवाचिनी ( रेवाचिनीचा शिरा ) उगाळून तो पाजावा, म्हणजे वांति व मलशुद्धि होऊन विकार कमी होईल. ४-बाभळीची बीं विड्याचे पानांचे रसांत किंवा दुधांत उगाळून द्यावी. ५--गोमूत्र गाळून घेऊन त्यांत हळद घालून पाजावें. ६-डिकेमाली, रेवाचिनीचा शिरा, व काळाबोळ, ऊन पाण्यांत वाटून पोटावर लेप द्यावा.

**७ आंकडी**—आईनें ऊष्ण व वातूळ पदार्थ सेवन केल्यानें तिचें दूध दूषित होऊन तें मुलानें खाल्लें, ह्मणजे मुलाचे मस्तकांत उष्णता फार जमून त्यायोगानें बहुधा हा रोग होतो. ह्याचे योगानें हातपाय आदकिरून अवयव थरथरून डोळे वटारल्यासारखे होतात, हातापायांस वरचेवर आंचके बसतात, व मूल आईचे अंगावर पीत नाहींसें होतें. या रोगांत अपस्मारासारखींही लक्षणें होतात. हा विकार मोठा घातक आहे. यांतून मूल निभावणें मोठें कठीण पडतें.

**उपचारः**—१-खाण्याचा पांढरा कांदा चिरून लागलाच नाकाशीं धरावा, ह्मणजे त्याचा दर्प नाकांत जाऊन तत्क्षणीं शुद्धि येईल. ओंव्याचें फूल, तुरीचे डाळीएवढें अंगावरील दुधांतून, किंवा गाईचे दुधांतून द्यावें. २-गुलाबपाणी कापसाचे बोळ्यानें टाळूशिवाय कपाळ व सर्व मस्तक आणि डोळे यांजवर लावावें. ३-सुरवारी हिरडा, थंड पाण्यांत उगाळून हिरड्यांस व जिभेखालीं आणि जिभेस लावावा. ४-हिरडा, आंवळकटी आणि खडीसाखर पाण्यांत उगाळून अंजन करावें. हा रोग राहून राहून होतो, याजकरितां प्रथम गुण वाटला तरी उपचार करण्याचें बंद करूं नये.

**८ मुलांस खर पडते त्यावर**—१-सोनगेरू आणि तुरटीची लाही समभाग घेऊन एकत्र करून प्रत्येक वेळेस तें एक मासा मिश्रण तांदळाचे धुणांत खडीसाखर घालून द्यावें. २-खडीसाखर १ तोळा, पिंपळी अर्धा तोळा, सुंठ पाव तोळा, वंशलोचन अर्धा तोळा, आणि सालंमिश्री अर्धा तोळा, या सर्वांचें वस्त्रगाळ चूर्ण करून त्यापैकीं ३ मासे चूर्ण, दूध आणि खडीसाखर यांतून द्यावें. ३-गुळवेलीचें १।२ गुंजा सत्व दूध आणि खडीसाखर यांतून द्यावें.

**अतिसारावरः**—डाळिंबाची साल पाण्यांत उगाळून द्यावी. किंवा डाळिंबाच्या रसांत खडीसाखर घालून चाटण करून द्यावें. यादी नंबर ९२।९९।९७।४७।४८ यांपैकीं एखादें औषध द्यावें.

**सूचनाः**—आमचे एका मित्रानें सर्व प्रकारचे बालरोगांवर एक अनुभविक काढा सांगितला आहे. त्याचें ह्मणणें असें आहे कीं, "हा काढा पुष्कळ मुलांस आह्मीं दिलेला आहे. व त्यांतील बहुतेकांस तो फार फायदेशीर झालेला आहे." ह्मणून खालीं तो काढा लिहिला आहे. तसेंच वे. रा. रा. गणेश पांडुरंगशास्त्री परांजपे, वैद्य सांगलनिजिक हरिपूर, यांनीं मुद्दाम आपले अनुभव प्रसिद्ध केले आहेत, व ते उत्तम पैकीं आहेत असा आमचाहि अनुभव आहे ह्मणून दिले आहेत. (यादी नंबर २१७ पहा.)

**काढाः**—काडेकिराईत, सबजा, पुदीना, गजगेमगज, महाळुंगाचे झाडाची साल, ढिकेमाली, कलमकाप, वावडिंग, हरडेदळ, बेहेडेदळ आणि जेष्टमध, हीं औषधें प्रत्येकीं एकेक तोळा घेऊन थोडीं कुटून दोन शेर पाणी घालून काढा करावा, एक शेर राहिल्यावर उतरून गाळून बाटलींत ठेवावा आणि रोज १।२ तोळे सकाळीं देत जावा. ह्मणजे मुलांचे सर्व विकार नाहींसे होतात.

## मसूरिका ( देवी )

तिखट, आम्ल, लवण, क्षार, नासलेलें अन्न, वाल, उडीद, इत्यादि कारणांनीं वातादि दोष कुपित होऊन, ते दुष्ट रक्ताशीं मिळून मसुरांएवढ्या व त्यासारिख्या पुळ्या उत्पन्न करितात. त्यांस मसूरिका ( देवी ) ह्मणतात.

**कारणें व प्रसारः**—ह्या रोगाची सांथ येऊन विशेषतः लहान मुलांस हा विकार होतो. क्वचित मोठीं माणसेंहि लागतात. कोणत्याहि वेळीं ही सांथ उद्भवते. रोग्याच्या संसर्गांतील सर्व वस्तु व श्वासोच्छ्वास ह्याच्याद्वारें बहुधा ह्या सांथीच्या रोग-बीजांचा प्रसार होतो.

**मुख्य चिन्हें व लक्षणें**:—रोग्याचे आंगांत ताप भरण्याचेपूर्वीं पाठीच्या कण्यांत व कमरेंत वेदना होऊन उलट्या होतात, आणि अंगांत सडकून ज्वर भरतो. मस्तक, शूळ, वांति, अन्नद्वेष, मलावरोध वगैरे ज्वराच्या इतर भावना होतात. १।२ दिव-सांनंतर पोटावर, तोंडावर व जांघावर लाली दिसूं लागते. साधारण ज्वर भरलेपासून तिसरे दिवशीं कपाळावर, तोंडावर व हातावर मसुरीच्या डाळीप्रमाणें लालभडक पुळ्या उठतात व नंतर छाती, पाठ, पोट व पाय ह्या प्रदेशांवरही त्याप्रमाणें लालभडक पुळ्या दिसूं लागतात व नंतर त्या हळूहळू मोत्यांसारख्या दिसतात व नंतर पाणी घातल्यावर हळूहळू सुकतात. सुमोर १५।१६ दिवसांनंतर खपल्या पडतात, व २।३ आठवड्यांनीं रोगी बरा होतो.

**साध्य लक्षणः**—फोड्या चांगल्या उमटणें, पहिल्यानें कपाळावर दिसणें, खोकला, ओकारी, इत्यादि.

**असाध्य लक्षण**—उचकी, दारुणज्वर, मूर्च्छा, तृषा, नाकातोंडांतून रक्त वाहणें गळा घरघर वाजणें, फोड्या कांहीं पोंवळ्यासारख्या लाल, कांहीं जांभळासारख्या कांहीं जवसाच्या बोंडासारख्या उगवणें इत्यादि.

**उपचारः**—१-पहिल्यानें कडुपडवळ, कडुनिंब व अडुळसा यांचा काढा द्यावा. ह्मणजे वांति होऊन विकार कमी होईल. २-देवींचा ताप येतांच चंवईच्या ५।७ बिया पाण्यांत वाटून द्याव्या ह्मणजे खातरीनें देवी हलक्या येतील. देवींचा उगम होतांच तागाच्या २०।२५ बिया भाजून त्यांचा काढा करून द्यावा ह्मणजे देवी हलक्या येतील. ३-देवींची सांथ येतांच चिंचोक्याचें व हळदीचें समभाग चूर्ण थंड पाण्याबरोबर द्यावें, ह्मणजे देवी येणार नाहींत. कदाचित आल्या तरी कमी येतील. ४-देवी दिसूं लागल्यापासून दररोज सकाळीं ह्मशीच्या दुधांत ह्मशीचें साजूक तूप घालून तें शक्तिमानाप्रमाणें द्यावें, ह्मणजे देवी चांगल्या फुगतात. ५-बोरीचा पाला मध्यम बोरा एवढा, ह्मशीच्या पावशेर दुधांत वाटून द्यावा, ह्मणजे देवी पाण्यास भर-

तींत, पू होत नाहीं व आंत ओढल्या जात नाहींत. ६–कांचनाचे सालीचा काढा करून त्यांत सुवर्णमाक्षिक भस्म द्यावें, ह्मणजे आंत ओढलेल्या देवी चांगल्या बाहेर निघतात. ७–तोंड व गळा यांत व्रण झाला तर आंवळकटी व जेष्टमध यांचा काढा मध घालून गुळण्या करण्यास द्याव्या. ८–लस वाहणाऱ्या देवींवर रानशेणीची राख दडपीत जावी. ९–क्षतांत किडे पडल्यास राळ, हिंग व लसूण यांची धुरी द्यावी. गुरू झाल्यास कांद्याची राख तिळांचे तेलांत खलून लावीत जावी. १०–देवीनें डोळ्यांत फुलें पडल्यास–मोंगली एरंडाचे चिकांत पांढरी गुंज उगाळून अंजन करावें, गाढवाचा दांत पाण्यांत उगाळून अंजन करावें. ११–कडुनिंबाच्या पाल्याच्या काढ्यानें देवींचे व्रण धुवावे. १२–गुलाबकळी पाकळ्या १ तोळा, द्राक्षें (मनुका) २ तोळे, १ शेर पाणी घालून $\frac{1}{2}$ उरवावा व जरूरीप्रमाणें दिवसांतून २ वेळां पाजावा. मलशुद्धि साफ होईल. १३–घशांत फोडे आले असल्यास उबराचें पाणी (रात्रीं पाळ तोडून खालीं वाटली ठेवावी कीं पाणी जमतें) द्यावें. हें पाणी बरेच दिवस टिकतें.

**विशेष सूचनाः**—हा रोग संसर्गानें होतो. याजकरितां फार खबरदारी घ्यावी. रोग्याच्या खोलींत इतर निरोगी मुलांमाणसांस मुळींच फिरूं देऊं नये व सुमारें एक महिनाभरही निरोगी माणसांत निजूं देऊं नये. रोग्याचे कपडे, सामान वगैरे रोग्याचे संसर्गांतील सर्व वस्तू साफ धुऊन स्वच्छ कराव्या. देवी कमी याव्या ह्मणून कांहीं ठिकाणीं खोलीस अलवानाचे लाल पडदे किंवा तावदानास लाल कागद लावितात. असें करण्यानें खोलींत तांबड्या रंगाच्या प्रकाश किरणांनीं रोगाची तीव्रता कमी होते असें ह्मणतात (करून पहावें). रोग्याचें शिल्लक अन्न कोणास खाऊं देऊं नये. रोग्यास थंड पाणी पिण्यास द्यावें. खोलींत रोज धूप, ऊद अथवा अगरबत्ती जाळावी. ज्यांना पूर्वीं देवी येऊन गेल्या असतील अशा माणसांनीं शक्य तर रोग्याची सेवा-चाकरी करावी. रोग्याचे खोलींत जरूरीपेक्षां जास्त सामान ठेवूं नये.

**पथ्यः**–जुन्यासाळी, मसुरा, मूग, हरभरे, पडवळ, द्राक्षें, डाळिंब, तूप, गहूं इ०

**अपथ्यः**—वारा घेणें, श्रम, क्रोध, तेल, तिखट, आंबट, इत्यादि.

## मस्तकशूल (शिरोरोग)

**मस्तकशूल ह्मणजे मस्तक दुखणें**–हा विकार धूर, जलक्रीडा, अतिनिद्रा, अतिजागरण, रडणें, अतिउदक किंवा मद्य यांचें पान, धांवणें, डोळे लावून फार वेळ पाहणें, योग्य काळीं चष्मा न लाविण्यानें, मोठ्यानें बोलणें, अति मानसिक विचार इत्यादि कारणांनीं हा विकार उत्पन्न होतो. वातपित्तादि दोषांनीं याचे ११ प्रकार मानितात त्यांपैकीं मुख्य मुख्य खालीं लिहितों.

**१ वातजः**—ज्याचें मस्तक विशेष कारण नसतां अकस्मात दुखतें, व रात्रीं तर फारच दुखतें, व तें बांधिलें किंवा शेकलें ह्मणजे उतरतें तो.

**उपचारः**—१–सुंठ, दालचिनी आणि सांबराचें शिंग किंवा सुंठ आणि दालचिनी, ऊन पाण्यांत उगाळून मस्तकास जाडसर लेप करावा. २–कोष्ट, एरंडमूळ व सुंठ हीं ताकांत वाटून त्याचा जाडसर लेप करावा, किंवा कोष्ट आणि एरंडमूळ कांजींत वाटून लेप करावा. ३–गाईचें तूप मस्तकास गजावें.

२ **पित्तजः**—ज्याचें मस्तक फार तापतें, व डोळे आणि नाक हीं जळजळतात, शीत पदार्थानें किंवा रात्रीं शांत होतें तो.

**उपचारः**—१–दुधांतून एरंडेल द्यावें. २–साखर आणि दूध किंवा साखर आणि पाणी यानें मस्तकाचें सिंचन करावें, व शतघृत मस्तकास गजावें. ३–जेष्ठमध चंदन व धमासा प्रत्येकीं दोन दोन तोळे घेऊन, अवशीस पाण्यांत भिजत घालून, सकाळीं बारीक वाटावें, आणि दूध ५।६ तोळे घेऊन त्यांत तीं औषधें घालून २८ तोळे तूप घालून, कढवून शेष तूप राहिल्यावर गाळून ठेवावें, आणि मस्तकास गजावें.

३ **सूर्यावर्तः**—सूर्योदयाबरोबर कपाळ दुखण्यास आरंभ होऊन, सूर्य जसजसा चढतो, तसतसें मस्तक अधिक दुखूं लागतें, व दुपारानंतर कमी होत जाऊन सूर्य मावळला ह्मणजे नाहींसा होतो तो.

**उपचारः**—१–सुमारें १–१॥ तोळा गूळ व तितकेंच तूप एकत्र करून सकाळीं द्यावें. आणि तीळ दुधांत वांटून मस्तकास लेप करावा. २–दशमुळांचा काढा ( यादी नंबर १६ पहा ) करून त्यांत तूप व सैंधव घालून नस्य करावें. हें फार फायदेशीर आहे. ३–दूध आणि तूप एकत्र करून सकाळीं द्यावें. ४–मिरीं तुपांत वाटून मस्तकास लेप करावा.

४ **अर्धशिशीः**—( अर्धाव भेदक ) रुक्षान्न, अतिभक्षण, मैथुन, आयास, इत्यादिकांनीं शूल उत्पन्न होतो. हा अर्धे मस्तक धरून मानेच्या शिरा, भिवयीं, आंख, कान, डोळा आणि ललाट हीं सर्व एका बाजूचीं धरून कुऱ्हाडीनें घाव मारल्यासारखी वेदना करितो तो.

**उपचारः**—१–पित्तशामक उपचार करावे. सूर्योदयाचे पूर्वीं दुधाच्या खव्यांत साखर घालून खावा. अगर दुधांत थोडी सुंठ उगाळून साखर घालून द्यावें. रोज सकाळीं जेवावें. २–पाण्यांत मीठ घालून त्या पाण्याचे दोन तीन थेंब घेऊन त्यांत २।३ थेंब शेतवडाचा रस घालावा, आणि उतार्णे निजवून नाकांत घालावा, किंवा नाकांत ओढावा, म्हणजे नाकांतून पाणी गळून वेदना कमी होतील. कडू दोडक्याची साल काढून टाकून बाकीचे भागाची वस्त्रगाळ पूड करून नाकांत ओढावी. ३–म्हाळुंगाचे रसांत मिरीं उगाळून मस्तकास त्याचा लेप द्यावा, व त्याच रसांत थोडें मीठ घालून तो रस मस्तकास व भिवईचे बाजूस चोळावा. ४–तुरीचीं पानें व दूर्वा यांचा रस एकत्र करून नाकांत घालावा. ५–शेवग्याचे पानांचा रस नाकांत घालावा.

६--पांढऱ्या अगस्त्याचे फुलांचा रस नाकांत घालावा. ७--पहाडमूळ, कडू पडवळ, सुंठ, एरंडमूळ व शेवग्याची साल हीं थंड पाण्यांत उगाळून मस्तकास लेप द्यावा. ८--कोलनवाटर आणि पाणी समभाग घेऊन त्याची घडी मस्तकावर बसवावी. ९--मुचकंदाचीं फुलें वाटून मस्तकावर लेप द्यावा. १०--रुईच्या पानांचा रस मस्तकाची जी बाजू दुखत असेल त्याचे उलट बाजूचे नाकपुडींत सकाळीं एकदां घालावा. (दिवस ३) हें औषध मोठें अनुभविक आहे असें रा. रा. द. आ. गोखले राहणार धाउलवल्ली यांनीं मुद्दाम कळविलें तें लिहिलें आहे.

**पथ्यः**—भात, दूध, तूप, मूग, गहूं, पडवळ, चाकवत, डाळिंब, द्राक्षें, आंवळे, महाळुंग, रेच, लंघन, गोडताक, चंदनाचा लेप, इ.

**अपथ्यः**—मलमूत्र यांचा रोध, जागरण, अंजन, दिवसाची निद्रा, तेलकट, पदार्थ व विशेष ऊष्ण पदार्थ खाणें, मानसिक विशेष विचार, इ.

## मुखरोग.

ओंठावर पुळ्या येणें, ओंठ जाड होणें व फुटणें किंवा मांसपिंडासारखे उचलून येणें, दांत दुखणें, हिरड्या दुखणें, दांतांतून किंवा हिरड्यांतून रक्त व पू वाहणें, घसा दुखणें, दांतांस काळीं छिद्रें पडणें, वगैरे विकारास मुखरोग म्हणतात.

**दाढ दुखत असल्यास उपचारः**—१--नारळाचे करटीचें तेल पाडून तें रात्रीं निजतांना दाढेस लावावें. आणि त्यावर दांतवण लावावें (दांतवण खालीं दांतविकार या सदरांत पहा) व थुंका टाकावा. २--नवसागराची बारीक पूड करून तिनें चार दिवस दांत घांसावे म्हणजे हिरड्या फुगल्या असल्या तरी बऱ्या होतात. ३--टांकणखाराची लाही शिळ्या थंड पाण्यांतून दाढेस लावावी. ४--वावडिंग आणि कापूर समभाग घेऊन बारीक पूड करून वस्त्रांत पोटली बांधून दाढेंत धरावी, पाणी सुटेल तें टाकावें. ५--गुंजेचें मूळ तोंडात धरावें. पाणी येईल तें टाकून द्यावें.

**दंतविकार**—हा विकार दिवसास निजणें, रात्रीं फार जागरण करणें, अजीर्ण, उष्ण पदार्थ खाणें, फार तिखट खाणें, उपदंश, इ. कारणांनीं होतो. याचे उपद्रव--दातांच्या हिरड्या सुजणें, दांतांस काळीं छिद्रें पडणें, ते हालणें व त्यांतून रक्त येणें इ.

**उपचारः**—इरिमेदादि तेल लावावें. (यादी नं. १६९ पहा.) हें तेल मुखदंतादि विकारांवर फार उत्तम आहे. २--मोरचुताची लाही, पांढरा कात, मायफळ, तुरटीची लाही, कापूर आणि टांकणखाराची लाही प्रत्येकीं एकेक भाग, बकुळीची साल ३ भाग, आणि खडू ६ भाग, या प्रमाणानें जिन्नस घेऊन निरनिराळे वस्त्रगाळ करून एकत्र करून ठेवावे, आणि त्यानें दांत घासावे म्हणजे दांतांतून रक्त पडणें, दंतशूल इ. विकार दूर होतात. ३--मोंगली एरंडाचा चीक दिवसांतून २--३ दां दांतांस

लावावा. ४--दांतवण-तुरटी १ भाग, पांढरा कात २ भाग, कापूर ३ भाग, मायफळ ४ भाग, आणि खडू १६ भाग, या प्रमाणानें घेऊन कुटून वस्त्रगाळ करून एकत्र करून ठेवावें, आणि त्यानें रोज दांत घांसावे म्हणजे दांत मजबूत होतात.

**तोंड आल्यास उपचारः**—बाभळीचे सालीचा, किंवा त्रिफळ्याचा, किंवा खैराचे सालीचा काढा करून गुळण्या कराव्या. तुरीचा पाला चावून तोंडांत धरावा. २--कारंद्याचा वाळलेला पाला व कोहळ्याची वाळलेली साल एकत्र करून तें चिलमींत घालून ओढावें.

**घसा दुखत असल्यास उपचारः**—१--ऊन पाण्यानें घसा शेकून त्या सभोंवतीं लोकरीचा तुकडा गुंडाळावा. ऊन दूध व पाणी एकत्र करून त्याच्या गुळण्या कराव्या. २--बाभळीची साल दोन तोळे व पाणी १६ तोळे याचा काढा करून त्यांत १ तोळा कात व एक तोळा फटकी टाकून त्याच्या गुळण्या कराव्या. कात, खडीसाखर व जेष्टमध एकत्र तोंडांत धरून पाणी गिळावें. ३--धने, रक्तचंदन, पद्मकाष्ट, दारूहळद, गुळवेल, काळावाळा, नागरमोथा, निंबसाल, जेष्टमध व मनुका, यांचा काढा खडीसाखर घालून द्यावा. म्हणजे घशांतील सूज व क्षतें बरीं होतात. ४--रसांजन थोडेंसें तोंडांत टाकावें आणि पाणी सुटेल तें गिळावें.

**पडजिभेवर उपचारः**—कांचनाचें मूळ चावावें, तोंडांत पाणी सुटेल तें टाकावें.

**जीभ सुजते त्यास उपचारः**—कधीं कधीं जीभ सुजून फार लाल होते, तेथें आग होते, लाळ वाहते व खाण्यापिण्यास अडचण होते. अशी सूज आली कीं निराळा रोग आहे असें समजावें.

**उपायः**—१--जुलाब द्यावा. २-बर्फ मिळेल तर त्याचे तुकडे तोंडांत धरावे. ३-सूज थोडी असेल तर कात अगर कंकोळ तोंडांत धरावा. ४—फार सूज असेल तर वैद्य डॉक्टरास दाखविणें. ५—पिंपळी, पिंपळमूळ, सुंठ, आणि मिरीं, हीं महाळुंगांचे रसांत उगाळून त्यांत सैंधव घालून जिभेस चोळावें, आणि पाणी सुटेल तें टाकावें.

**जिभेवर खरे ( बारीक फोड ) आल्यासः**--आंवळ्या गंधकाची बारीक पूड करून तुपांत कालवून जिभेस चोळावी.

**सर्व प्रकारचे मुखरोगांवर उपचारः**—१--इरिमेदादि तेल लावावें. हें फार उत्तम अनुभविक औषध आहे. ( यादी नंबर १६९ पहा. ) २-जिरेपाक द्यावा. ( यादी नंबर १५७ पहा. )

**पथ्यः**—रेच, वांति, गुळण्या, कुळीथ, मूग, पडवळ, भात, तूप इत्यादि.

**अपथ्यः**—काष्टानें दांत घासणें, स्नान, आंबट पदार्थ, गूळ, उडीद, दिवसास निद्रा, इत्यादि.

## मूत्रकृच्छ्र ( उन्हाळी. )

व्यायामानें, तीक्ष्ण औषध, अति रुक्ष पदार्थ व अति मद्य यांचें सेवनानें, किंवा जेवणावर जेवण झाल्यानें, वातादिदोष बस्तीमध्यें कोपून मूत्राचा मार्ग पीडित करितात; तेव्हां मनुष्याला मोठ्या कष्टानें थोडथोडें मूत्र होतें, त्यास मूत्रकृच्छ्र ह्मणतात. याचे प्रकार आठ आहेत. तेः--१ वातज, २ पित्तज, ३ कफज, ४ सन्निपातज, ५ शुक्रज, ६ पुरिषजन्य ७ शल्यज, आणि ८ अश्मरीजन्य.

**वातिक मूत्रकृच्छ्र लक्षणः**—अडसंधि, मूत्राशय आणि शिश्न यांच्या ठिकाणीं फार वेदना, आणि थोडथोडें वरचेवर मूत्र होणें.

**उपचारः**—१--गुळवेल, आंवळकटी, सुंठ, अश्वगंध आणि सराटे यांचा काढा द्यावा. २-सराट्यांचा काढा करून मध व साखर घालून द्यावा. ३-आंवळ्यांचा रस १-२ तोळे आणि उंसाचा रस ४--५ तोळे एकत्र करून द्यावें.

२ **पित्तज** मू० लक्षणः—दाह व तिडिक असून, आरक्तवर्ण व वारंवार मूत्र होणें.

**उपचारः**—१-सांवरीच्या ( शेंवरीच्या ) सालीचें ३ मासे चूर्ण व साखर ६ मासे एकत्र करून द्यावें. २-गुळवेलीचे रसांत मध घालून द्यावा. ३--तापलेलें दूध व गूळ एकत्र करून द्यावें. ४--कुंभ्याचे सालीचे रसांत साखर घालून तो द्यावा. ५-पांढऱ्या गुंजेच्या पाल्याचा रस जिरें व साखर घालून द्यावा.

३ **कफज** मू० लक्षणः—मूत्राशयास जडपणा, सूज आणि मूत्र तेलासारखें बुळबुळीत असणें.

**उपचारः**—१-वेलदोड्याचे दाण्यांचें चूर्ण २ मासे, व मध २ मासे, असें एकत्र करून द्यावें, २--कुरडूचें बीज ३ मासे घेऊन ४।५ तोळे ताकांत वांटून द्यावें.

४ **सन्निपातज** मू० लक्षणः—वरील तिन्ही प्रकारचीं लक्षणें असणें.

**उपचारः**—१-शतावरीचे मुळ्यांचा काढा, साखर आणि मध घालून द्यावा. २-जवखार आणि साखर प्रत्येकीं २-२॥ मासे घेऊन एकत्र करून द्यावें.

५ **शुक्रज** मू. लक्षणः—शुक्र दुष्ट होऊन मूत्रमार्ग कोंडून कष्टानें मूत्र होणें, व त्याबरोबर शुक्रहि स्रवणें व बस्ति आणि शिश्न मास कळा लागणें.

**उपचारः**—१--मधांत शिलाजित द्यावें. २--दूध, तूप आणि साखर एकत्र करून तें द्यावें.

६ **पुरीषजन्य** मू० लक्षण—मलवेगाचा निरोध झाला असतां, वायु कुपित होऊन पोट फुगणें व वातशूल होणें.

**उपचारः**—आंवळकटीचा काढा करून मूळ घालून द्यावा.

**७ शल्यज मू०**—कारण व लक्षण-मूत्रवाहिनी शिरा शस्त्रादिकें **करून क्षत-युक्त झाल्या** असतां, किंवा त्यांस आघात झाला असतां, हा रोग होतो. **याचीं लक्षणें वातज मूत्रकृच्छ्राप्रमाणें** आहेत.

**उपचारः**—१-मधांत लोहभस्म ३ दिवस द्यावें. २-ताकांत पारा **१ गुंज, व जवखार** २ गुंजा व साखर ६ मासे घालून तें द्यावें. ३-वड, पिंपळ, आंबा **व जांभूळ यांच्या** समभाग साळी पाण्यांत उगाळून गरम करून शिस्नास व त्याचे **वरचे भागास लेप** द्यावा.

**अश्मरीजन्य मू०**—मुतखड्याचे योगानें होतें तें.

**उपचारः**—१ पाषाणभेद, शिळाजित, पिंपळी आणि वेलची दाणे, **समभाग एकत्र करून** त्यांचें चूर्ण करून तें ४ मासे व पाणी ३-४तोळे असें एकत्र **करून द्यावें. २-२ मासे** जवखार ताकांत किंवा तांदुळाचे धुणांत द्यावा. ३-सागाचें बीं ३-६ **मासे घेऊन** पाण्यांत उगाळून द्यावें. ४-शिळे पाण्यांत मनुका वाटून द्याव्या. ५-मुतखड्यावरील उपचार करावे.

**सर्व प्रकारचे मूत्रकृच्छ्रावर उपचारः**—१-यादी नंबर ६८ किंवा ७२ **चा काढा द्यावा.** कोहाळेपाक द्यावा. ( यादी नंबर १६३ पहा. ) २-गाईचे दुधांत **कुड्याची साल** वाटून द्यावी. ३-२ मासे जवखार ताकांतून द्यावा. ४-वेलची, **पाषाणभेद,** शिळाजित व पिंपळी, यांचें समभाग चूर्ण एकत्र करून तें ४ मासे, व **तांदुळाचें धुवण** ४ तोळे असें एकत्र करून द्यावें.५—सराटे आणि खडीसाखर **यांचा काढा द्यावा.** ६--कुंभ्याचे सालीचे रसांत साखर घालून तो द्यावा. ७--गोक्षुरादि गुग्गुळ **द्यावा.** यादी नंबर १४८ पहा.

**पथ्यः**—तांबड्या साळी, गाईचें ताक, दूध, दहीं, मूग, साखर, पडवळ, **खजूर, कांकडी,** थंड पदार्थ, इत्यादि.

**अपथ्यः**-श्रम, मैथून, घोड्यावर बसणें, हिंग, मीठ, विडा, आलें, तीक्ष्ण व दाह करणारे पदार्थ, उडीद इत्यादि.

**मूत्रसागर ( बहुमूत्र ) यावर उपचारः**--१—गांजा १ तोळा, अफू अर्धा **तोळा,** वावडिंग १ तोळा, आणि जायफळ १ तोळा, हे जिन्नस मधांत वाटून हरभऱ्या-**एवढ्या** गोळ्या कराव्या; आणि रोज एक गोळी मधांतून द्यावी. २—टांकणखाराची **लाही,** अफू, गूळ आणि ऊद, हे जिन्नस समभाग घेऊन बारीक वाटून वाटाण्या-एवढी गोळी मधांतून द्यावी. ३-गंधकरसायन द्यावें. यादी नंबर १२४ पहा.

**पथ्य**--तुरीचे डाळीचें वरण, गव्हांची पोळी, तूप व दूधभात.

**अपथ्यः** -मीठ, मिरची, तेल, आंबट पदार्थ, इत्यादि.

**मुत्रांतून रक्त पडतें त्यावर उपचारः**—१--कुंभ्याचे सालीचा **रस २ तोळे आणि** तूप ६ मासे असें एकत्र करून द्यावें. याच मिश्रणांतून प्रवाळ घेतल्यास उत्तम.

## मेद.

व्यायाम न करणें, दिवसास निद्रा, कफकर पदार्थ, मधुर अन्न, गहूं आणि क्षीर यांचें अति सेवन, इत्यादिकांनीं मेद वाढतो. ( मांसल शरीर होतें. ) हा वाढला ह्मणजे क्षुद्र श्वास, तृषा, मोह, निद्रा, अंगग्लानि, इत्यादि विकार होतात.

**उपचारः**--१--यादी नंबर ७३ चा काढा द्यावा. २--सुंठ, मिरीं, पिंपळी, हरडा, आंवळकटी, चवक, चित्रक, बीडलोण, सोरा, बांवच्या, सैंधव, आणि पादेलोण, हीं समभाग घेऊन त्यांचें वस्त्रगाळ चूर्ण करून तें चूर्ण ४-६ मासे, व लोहभस्म १।२ गुंजा एकत्र करून तूप आणि मध यांतून घेत जावें. नमस्कार घालणें, फिरणें इत्यादि प्रकारचा व्यायाम करावा. ३--थंड पाणी आणि मध समभाग एकत्र करून तें नित्य सकाळीं द्यावें.

**पथ्यः**--श्रम, जागरण, स्त्रीसंघ, लंघन, घोड्यावर बसणें, हरीक, सांवे, वऱ्या, कुळीथ, मूग, तुरी, मसुरा, हरभरे, कडू व तुरट रस, ताक, त्रिफळा, संपूर्ण क्षार, गरम पाणी इत्यादि.

**अपथ्यः**—स्नान, साळी, गहूं, दूध, उंसाच्या रसाचे केलेले पदार्थ, उंसाचा रस, उडीद, दिवसास निद्रा, मधुर अन्न, वांति इत्यादि.

## मेह ( प्रमेह ).

दहीं, गांवांतील आणि पाण्यांतील प्राण्यांचे मांसरस, दूध, नवान्न, नवोदक, साखर, काकवी, गूळ अथवा गुळाचे पदार्थ, कफकर पदार्थ, निद्रा, इत्यादिकांचे अनियमित खाण्यानें बस्तिगत कफ, मेद, मांस आणि क्लेद यांस दुष्ट करून, किंवा उष्ण पदार्थांनीं कोपलेलें पित्त मेदादिकांस दुष्ट करून, किंवा वायु हा आपल्यापेक्षां दोष क्षीण झाले असतां धातूस ( वसामज्जादिकांस ) ओढून मेह उत्पन्न करितो.

**पूर्वरूपः**—दंत, जिव्हा व तालु यांवर पुष्कळ मळ जमणें, हातापायांचा दाह, अंगाला चिकटपणा, तृषा, श्वास, केशजटिलीभाव, आणि नखांची वृद्धि, हीं लक्षणें होतात, तेव्हां मेह होणार असें समजावें.

**याचें सामान्य लक्षणः**--पुष्कळ आणि गढूळ मूत्र होणें. याचे प्रकार वीस आहेत. त्यांचीं लक्षणें:—

**कफज मेह**--हे दहा आहेत, ते खालीं लिहिल्याप्रमाणें. हे साध्य आहेत.

**१ उदकमेह**--लक्षण-स्वच्छ, पुष्कळ, शुभ्र, थंड, पाण्यासारखें, गंधरहित, किंचित् गढूळ, आणि बुळबुळीत, असें मूत्र होणें.

**२ इक्षुमेह**--लक्षण-किंचित् गढूळ असून उंसाचे रसासारखें मधूर असें मूत्र होणें. ( गोडपणाचें ज्ञान मूत्रास कांहीं वेळानंतर मुंग्या येतात तेणेंकरून समजावें. )

**३ सांद्रमेह**--लक्षण-शिळें झालेलें मूत्र थिजणें.

**४ सुरामेह**--लक्षण-मूत्र मद्यासारखें असून पात्रांत ठेविलें तर वरतीं पाण्यांसारखें निवळ आणि खालीं दाट असें होणें.

५ **शुक्रमेह**—लक्षण--शुक्रधातूसारखें किंवा शुक्रमिश्रित मूत्र होणें.

६ **पिष्टमेह**—लक्षण-रोमांच होऊन कालवलेल्या पिठासारखें मूत्र होणें.

७ **लालामेह**—लक्षण-मूत्रांत तंतू असून लाळेसारखें मूत्र होणें.

८ **शीतमेह**—लक्षण-अत्यंत शीतल आणि बहुतकरून मधुर असें मूत्र होणें.

९ **सिकतामेह**—लक्षण-वाळवेसारखे रवे मुत्रांतून पडणें.

१० **शनैर्मेह**-लक्षण-हळू हळू आणि मंद मंद मूत्र होणें.

**कफमेहाचे उपद्रव**-अन्नाचा पाक न होणें, अरुचि, ओकारी, ज्वर, ओला खोकला, पडसें, इत्यादि.

**पित्तजमेह**--६ आहेत, ते खालीं लिहिल्याप्रमाणें. हे याप्य आहेत.

१ **क्षारमेह** लक्षण-मूत्राला खारट पाण्यासारखा वास, रुचि, वर्ण आणि स्पर्श हीं असणें.

२ **नीलमेह**-लक्षण निळ्या रंगाचें मूत्र होणें.

३ **कालमेह**-लक्षण-शाईसारखें काळें मूत्र होणें.

४ **हारिद्रमेह**-लक्षण-हळदीसारखें व जळजळीत मूत्र होणें.

५ **माजिष्टमेह**-लक्षण-आमगंधी असून मंजिष्टेच्या काढ्यासारखें मूत्र होणें.

६ **रक्तमेह**-लक्षण-दुर्गंधयुक्त, कढत, खारट आणि रक्ताप्रमाणें लाल असें मूत्र होणें.

**पित्तमेहाचे उपद्रव**-बस्ति आणि लिंग यांचे ठायीं टोंचल्यासारखी पीडा, अंडावरची त्वचा पिकून फाटणें, ज्वर, तृषा, आंबट ढेकर, मूर्च्छा आणि मळ पातळ होणें, हे आहेत.

**वातमेह**-चार आहेत. ते खालीं लिहिल्याप्रमाणें—हे असाध्य आहेत.

१ **वसामेह**-लक्षण- वसा ( चरबी ) युक्त किंवा वसेसारखें वारंवार मूत्र होणें.

२ **मज्जामेह**-लक्षण-मज्जेसारखें किंवा मज्जामिश्र वारंवार मूत्र होणें.

३ **क्षौद्रमेह**-लक्षण-तुरट, मधुर आणि स्निग्ध असें मूत्र होणें.

४ **हस्तिमेह**-लक्षण-माजलेल्या हत्तीप्रमाणें निरंतर, वेगरहित, लसेनें मिश्रित आणि अडकत अडकत असें मूत्र होणें.

**वातमेहाचे उपद्रव**-उदावर्त, गळा आणि हृदय यांचा निरोध, सर्व रस भक्षणाची इच्छा, शूल, निद्रानाश, शोष, सुका खोकला आणि श्वास हे होत.

**मेहाचें असाध्य**-लक्षण-ज्याचे मूत्राचा स्राव फार झाला आहे जो शराविकादि पीटिकांनीं युक्त व ज्याचे अंगांत रोग मुरलेला आहे, तो असाध्य होय. तसेंच मधुमेही पुरुषापासून उत्पन्न झालेल्या प्रमेही पुरुषाचा रोग, बीजदोषामुळें साध्य होत नाहीं. ( मधुमेह शब्दानें सामान्य मेह जाणावा. )

औषध पोंचलें नसतां सर्व प्रमेह कालेंकरून मधुमेहत्व पावतात, व मग ते असाध्य होतात.

**मधुमेह**-ज्या प्रमेहामध्यें मधासारखें मूत्र होतें व शरिराला मधुरत्व येतें त्यास मधुमेह ह्मणतात.

प्रमेहामध्यें बहुधा मधासारखें मूत्र असून शरिरालाहि मधुरत्व येतें, ह्मणून सर्व प्रमेहांस मधुमेह असें ह्मणतात.

**सर्व प्रमेहांवर उपचार**—१-सप्तकपींचे झाडाचीं पाळें प्रत्येक वेळेस १।२ तोळे घेऊन शेरभर पाणी घालून अष्टमांश काढा करून रोज दोनदां घ्यावा. या विकृतीवर हा काढा अति उत्तम आहे. हीं झाडें सावंतवाडी संस्थानांत आहेत. ज्यास मेहाचा विकार आहे, त्यांनीं हें औषध अवश्य घ्यावें. रान भेंडीचे मुळ्यांचा रस १॥-२ तोळेपर्यंत काढून त्यांत तितकेंच गाईचें तूप व एक तोळा खडीसाखर घालून द्यावें. २-मेंदीचे पाल्याचा रस दोन पैसे भार व एक पैसाभार साखर एकत्र करून द्यावें. ३-बाभळीचे पाल्याचा रस २ तोळे व तितकेंच दूध एकत्र करून ६ मासे खडीसाखर घालून द्यावें. **पथ्यः**—तूप व गव्हांची पोळी. ४-आंवळ्या गंधक शुद्ध करून १।१॥ मासा घेऊन तो गुळाबरोबर द्यावा, आणि वर दूध प्यावें. ५-गुळवेलीचा अंगरस मध घालून द्यावा. ६-पळसाचे फुलांचा काढा साखर घालून द्यावा. ७ वावडिंग, हळद, जेष्टमध व गोखरूं यांचा काढा मध घालून द्यावा. ८-आवळकटीचा काढा, अगर आंवळ्यांचा अंगरस, मध आणि हळदीचें चूर्ण घालून द्यावा. ९-गुळवेलीचें सत्व ४ गुंजा, रसांजन २ गुंजा, सराट्याचें चूर्ण १॥ मासा आणि गाईचें तूप ४ मासे, असें एकत्र करून द्यावें. १०-लोहभस्म, हळद आणि मध यांतून किंवा मध आणि पिंपळी यांतून द्यावें. (यादी नंबर ११४ पहा.) ११-सुवर्णराजवंगेश्वर घ्यावा. १२-गंधक रसायन द्यावें. (यादी नंबर १२४ पहा.) त्रिफळा चूर्ण द्यावें. (यादी नंबर १०१ पहा.) १३-सुवर्णमाक्षिक भस्म मधांतून द्यावें. (यादी नंबर ११६ पहा.) १४-जांभळांच्या बिया सुकवून वस्त्रगाळ चूर्ण करून त्यातील ३ मासे चूर्ण साखरेबरोबर द्यावें. जिरेपाक द्यावा. (यादी नंबर १५७ पहा.) यादी नंबर १९३ चें औषध द्यावें.

**पथ्यः**—ह्या रोगावर मुख्य इलाज ह्मणजे खाण्यापिण्यासंबंधीं विशेष पथ्य ठेविलें पाहिजे. शर्करायुक्त पदार्थ वर्ज करावें, फळफळावळ, मेवामिठाई, मध, भात, साबुदाणा आरोरूट, बटाटे वगैरे पदार्थ खाऊं नयेत. भाजीपाला, मुळे, कोबी, कारली, काकडी, वाटाण्याच्या व वालाच्या शेंगा वगैरे पदार्थ ज्यांत साखर कमी आहेत अशा शाकभाज्या खाण्यास हरकत नाहीं. दूध, मलई, तेल, तूप, खाण्यास हरकत नाहीं. डाळ, मूग, हरभरे, हीं खाण्यास हरकत नाहीं. साखरेचीं पक्वानें खाऊं नये. ह्या रोगात पाणी फार लागतें. दुधांत चुन्याची निवळ घालून तें दूध रोग्यास पिण्यास द्यावें. शक्य तरबर्फ सोडावाटर द्यावें.

**अपथ्यें**:—मलमूत्राचा वेग धारण, दिवानिद्रा, नवें अन्न, दहीं, पावटे, तेलें, क्षीर, गूळ, पांढरा भोंपळा, उंस, पौष्टिक पदार्थ, खारट व आंबट पदार्थ, इत्यादि.

**विषेश सूचनाः**—लघवी फार होत असल्यास नंबर १ चें औषध न मिळेल तर नंबर ४ किंवा नंबर १२ यापैकीं एक औषध दिवसांतून एकदां घ्यावें. वर लिहिलेल्या प्रमाणानें घेऊन गुण न आल्यास सोसेल त्या मानानें प्रमाण वाढवावें. हें औषध दिवसांतून एकदां व नंबर ११ चें औषध एकदां असें घेतल्यानें उत्तम गुण येतो.

या विकारावर यव हें धान्य पथ्यकर आहे, असें वैद्यक ग्रंथांत लिहिलें आहे. पण केवळ याच धान्याचें खाणें ठेविलें तर औषधाशिवाय उत्तम गुण येतो असा कितीएकांस अलिकडे अनुभव आला आहे, ह्मणून त्यासंबंधानें माहिती लिहितों.

यव (जव) आणून त्यांच्यावरील फोल जाण्याकरितां सुमारें २ तास पाण्यांत भिजत घालावे. नंतर उन्हांत सुकवून सडावे ह्मणजे वरील टरफल जातें. मग दळावे आणि गव्हांप्रमाणेंच सांजा, चपाती, पुरी वगैरे करून दूध तूप यांबरोबर खावें. यव दळण्यापूर्वीं भट्टींत भाजून मग त्याचें पीठ केलें ह्मणजे त्यास सातु ह्मणतात. हें पीठ दुधांत किंवा ताकांत कालवून खावें.

एका माणसास साधारण प्रमाण—यव २५–५० तोळे, दूध १२० तोळे, व तूप २० तोळे असे जिन्नस घ्यावे. पण हें प्रमाण पचन शक्तीप्रमाणें कमजास्त करावें. भाजी खाणेस हरकत नाहीं. याप्रमाणें खाणें ठेवावें.

## रक्तपित्त.

**रक्तपित्ताचें कारण व लक्षण**—उन्हांत फिरणें, अति आयास, अतिश्रम, अति मार्गगमन, अति मैथुन, विस्तवाजवळ बसणें, फार तिखट व फार आंबट पदार्थ खाणें, इत्यादिकांनीं रक्त कुपित होऊन ऊर्ध्व मार्गानें (नाक, डोळे, कान, तोंड यांतून) किंवा अधोमार्गानें (शिस्न, योनी, गुदस्थान यांतून), किंवा दोन्ही मार्गांनीं पडतें; व रक्त फार कुपित झालें तर सर्व रोमरध्रांतून सुद्धां वाहूं लागतें त्या विकारास रक्तपित्त ह्मणतात.

**कफयुक्त रक्तपित्त लक्षण**—घट्ट, किंचित् पांडुरवर्ण, स्नेहयुक्त, आणि बुळबुळीत रक्त पडणें.

**वातिक रक्तपित्त लक्षण**—नीलवर्ण, अरुणवर्ण, किंचित् फेंसयुक्त, पातळ, आणि रुक्ष, असें रक्त पडणें.

**पैत्तिक रक्तपित्त लक्षण**—भगव्या रंगाचें, काळें, गोमूत्रासारखें, किंवा मृदंगाच्या शाईसारखें, किंवा घेरोशासारखें, किंवा सुर्म्यासारखें काळें, रक्त पडणें.

**द्विदोषज व त्रिदोषज लक्षण**—दोन दोषांच्या संबंधानें दोषांचीं लक्षणें होणें तें द्विदोषज, आणि तीन दोषांचीं लक्षणें दिसलीं ह्मणजे त्रिदोषज.

उर्ध्व मार्गानें रक्तपित्त पडतें तें कफ संबंधानें; अधो मार्गानीं पडतें तें वात संबंधानें, व दोहों मार्गांनीं पडतें तें कफवायूचे संबंधानें पडतें असें समजावें. ऊर्ध्व-रक्तपित्त साध्य आहे, अधोगत याप्य (दुःसाध्य) आणि उभय मार्गी असाध्य आहे.

**रक्त पित्ताचे उपद्रवः**—अशक्तता, श्वास, खोकला, ताप, ओकारी, धोतऱ्याचें फळ खाल्ल्यानें जशी स्थिति होते तशी होणें, शरिराचा वर्ण पांढरा, दाह, मूर्छा, अन्न खाल्लें असतां विदाह, तहान, मळ पातळ होणें, मस्तकाचा संताप, दुर्गंधयुक्त थुंका, अन्नद्वेष व आहाराचा पाक न होणें इ०.

**असाध्य लक्षणः**—जें रक्तपित्त मांस धुतलेल्या पाण्यासारखें, किंवा सडल्यासारखें, अथवा गढूळ पाण्यासारखें, पिकलेल्या जांभळासारखें, काळ्या रंगाचें, निळें, आणि जें इंद्रधनुष्याचे रंगाप्रमाणें नाना प्रकारचे रंगाचें असून वारंवार ओकाऱ्या असतात तें, असाध्य होय.

**सर्व प्रकारचे रक्तपित्तावर उपचारः**—१--अडुळशाचा रस २।३ तोळे घेऊन ६ मासे मध व खडीसाखर ६ मासे घालून द्यावा, किंवा खडीसाखरच घालून द्यावा. रक्तपित्तावर अडुळसा हें मोठें उत्तम औषध आहे. अटरूषावलेह द्यावा. (यादी नंबर १५१ पहा.) २--उंबराचा चीक सुमारें १५।२० थेंब घेऊन, त्यांत खडीसाखर ६ मासे घालून द्यावा, ह्मणजे तोंडांतून किंवा मलद्वारांतून रक्त पडत असलें तरी ताबडतोब बंद होतें. ३--उंबराचीं पिकलेलीं २।३ फळें गुळाबरोबर किंवा मधाबरोबर खावीं, ह्मणजे नाकांतून पडणारें रक्त बंद होतें. ४--आंवळकटी तुपांत भाजून चूर्ण करून त्यांत पिठीसाखर घालून तें द्यावें. जिरेपाक द्यावा. (यादी नंबर १५७ पहा.) ५--आंवळकटीचें चूर्ण ताळवेवर बांधावें. ६--दूध ४ तोळे, लाखेचें चूर्ण ३ मासे, व मध २ मासे असें एकत्र करून द्यावें. ७--लाखेचा काढा खडीसाखर घालून द्यावा. ८--पळसाचे फुलांचा काढा साखर घालून द्यावा. ९--द्राक्षें व खडीसाखर याचा काढा द्यावा. १०--यादी नंबर ५४ किंवा ९ चा काढा द्यावा. ११--तुरीच्या पानांचा रस १ तोळा व तूप २--२॥ तोळे एकत्र करून तें मिश्रण खावें, ह्मणजे नाका तोंडांतून रक्त पडतें तें बंद होतें. १२--यादी नंबर १७७ चें औषध द्यावें. १३--कोहळेपाक द्यावा. (यादी नं. १६३ पहा.)

**विशेष सूचना**—अधोगत रक्तपित्ताला वमन, ऊर्ध्वगताला रेचन आणि दोहों मार्गांनीं जात असल्यास लंघन हितकर आहे.

**पथ्यः**—जुन्या साळी, मूग, मसुरा, चणे, तुरट पदार्थ, गाईचें व शेळीचें दूध, तूप, केळें, तांदुळजा, पडवळ, डाळिंब, आंवळकटी, पांढरा भोंपळा, द्राक्षें, साखर, थंड पाणी, शीतळ उठणें, पाण्यांत बुड्या मारणें इ०.

**अपथ्यः**—व्यायाम, मार्गक्रमण, जागरण, हत्ती व घोडा यांजवर बसणें,

मैथून, धूम्रपान, वांगीं, तीळ, उडीद, मोहऱ्या, दहीं, विडा, लसूण, तिखट, आंबट व दाहकर पदार्थ इ०.

## रक्तबाहू.

हा विकार बहुधा रक्तदोषापासून होतो. अकस्मात् शरिराचा एकादा भाग सुमारें १।२ पैशांएवढा सुजल्यासारखा होतो व पुढें तो वाढतो. कितीएक वेळां शरिराबर अनेक ठिकाणींहि हा विकार उत्पन्न होतो. विकार झालेली जागा तांबुस रंगाची होते व तेथें हात लाविला असतां हाताला ती दडस लागते. असें नजरेस येतांच ताबडतोब उपचार करावे, कारण ही विकृति लवकर वाढते.

**उपचारः**—रक्तशुद्धीवरील काढा द्यावा. (यादी नंबर ८२-८३ पहा.) २—विकार झालेल्या जाग्यावर फांसण्या मारून रक्त काढावें. विशेष विकार झाला असेल तर जळवा लावाव्या. "रक्त काढणें" हा उपचार प्रशस्त आहे. ३—रांगणीशिंपीच्या चुन्याचा लेप द्यावा. ४—सायाचे पानांचा रस आणि शिंपीचा चुना एकत्र करून लावावा. ५—शेराचे (काड्याहुऱ्याचे) लांकडाची राख करून पातळसर चुन्यांत कालवून खलून लावावी, आणि वर गूळ लावावा म्हणजे घट्ट लेप बसून विकार मोडतो.

**पथ्यः**—दूध, भात, तूप, गव्हाची पोळी, सांजा, साबुदाण्याची खीर, पडवळ, चाकवत, ऊनपाणी, इत्यादि.

**अपथ्यः**—गूळ, नारळ, तेल, दहीं, ताक, उडीद, पावटा, वाटाणा वगैरे संपूर्ण वातूळ पदार्थ, थंडपाणी इत्यादि.

## रक्तशुद्धि.

अंगांतील रक्त दूषित झालें म्हणजे कंडू, खरूज, अंगावर नानाप्रकारचे चट्टे उठणें, वगैरे विकार होतात. रक्त फार दूषित झालें म्हणजे महारोगासारखींहि स्थिति होते.

**उपचारः**—१—यादी नंबर ८२।८३ यांपैकीं एकादा काढा घ्यावा. हा फार चांगला आहे. २—गंधकरसायन घ्यावें. (यादी नंबर १२४ पहा.) ३-वांकेरीचें भातें घ्यावें. (यादी नंबर २२१ पहा.) ४—रात्रीं निजतांना दूध ७।८ तोळे, हळदीची पूड १।२ मासे आणि पिठीसाखर ६ मासे एकत्र करून घ्यावें.

## राजयक्ष्मा (क्षयरोग)

वात, मूत्र आणि पुरीष (मल) यांच्या वेगाचा रोध करणें, अति मैथुन, उपवास, बळवंताशीं झोंबी करणें, अकाळीं थोडें किंवा फार खाणें, या कारणांनीं त्रिदोषांचा कोप होऊन राज—यक्ष्मा रोग होतो. हा रसादि धातूचें शोषण करितो, म्हणून या रोगाला शोष म्हणतात. तसेंच शरिरांतील पाचनादि सर्व क्रियांचा क्षय करितो म्हणून यास क्षय म्हणतात, व हा सर्व रोगांचा राजा आहे म्हणून यास राजयक्ष्मा म्हणतात.

केवळ धातुक्षय झाला असतांच यक्ष्मा होतो असें नाहीं, तर कफ आहे मुख्य ज्यामध्यें अशा वातादि दोषांनीं रस वाहणाऱ्या धमनी रुद्ध झाल्या असतां, रस मार्ग बंद झाला ह्मणजे तेथेंच तो हृदयांत राहून नासतो, आणि तोंडावाटे निघतो. अथवा अति मैथून करणाराचें शुक्र क्षीण झालें ह्मणजे त्याच्या जवळचे धातु क्षीण होतात, आणि तो पुरुष सुकतो. शुक्र क्षीण झालें ह्मणजे, मज्जा क्षीण होते, मज्जा क्षीण झाली म्हणजे अस्थि क्षीण होतात. याप्रमाणें संपूर्ण धातु क्षीण होत जातात.

विशेषतः क्षय हा फुप्फुसांचा रोग. छातींतील एका अथवा दोन्ही फुप्फुसांत हा रोग होतो. व आंत सूज उत्पन्न होऊन पू होतो व तो कफाचे रूपानें बाहेर पडतो व त्याबरोबर खोकला, ताप आणि अशक्तता वगैरे चिन्हें होतात. असेंही दिसून येतें कीं हा पिढीजात रोग असतो.

**क्षयाचीं लक्षणें व प्रकार**—श्वास, अंगाला शिथीलपणा, कफाचा थुंका, टाळूचा शोष, ओकारी, अग्निमांद्य, पडसें, खोकला, डोळे शुभ्रवर्ण, स्त्रीविषयीं प्रीति, खांदे आणि बरगड्या यांचे ठायीं संताप, हातापायाचे ठायीं संताप, सर्वांगाचे ठायीं ज्वर, इत्यादि लक्षणें होत. यांतील शेवटचीं तीन लक्षणें बहुधा अवश्य व्हावयाचीं. हीं तीन लक्षणें झालीं म्हणजे राजयक्ष्मा झाला असें म्हणावयाचें. राजयक्ष्मा हा त्रिदोषोत्पन्न आहे वायूचे योगानें स्वर, भेद, खांदे आणि पार्श्व याचे ठायीं शूल, व खांदे आणि बरगड्या संकोचल्यासारख्या होणें, हे विकार होतात. यास वातक्षय असें म्हणतात. पित्तापासून ज्वर, दाह, अतिसार, आणि तोंडांतून रक्त पडणें, हे विकार होतात. यास पित्तक्षय म्हणतात. कफ योगानें मस्तक भरल्यासारखें, अन्नद्वेष, खोकला, स्वरभेद, हे विकार होतात. यास कफक्षय म्हणतात.

**असाध्य लक्षण**—वर सांगितलेल्या तीन (वातक्षय, पित्तक्षय आणि कफक्षय) क्षयांचीं लक्षणें झालीं असतां, किंवा ज्वर, खोकला आणि रक्त विकार हीं तीन असतां, व बल आणि मांसक्षय झाला असेल, तर रोगी असाध्य जाणावा.

**आणखीं असाध्य लक्षणें**—आहार पुष्कळ असून दिवसेंदिवस क्षीण होणारा, व अतिसारानें पीडित, किंवा अंडकोश आणि उदर हीं ज्यांची सुजलीं आहेत, असा असाध्य समजावा.

**साध्य लक्षणें**—बलवान, औषधी उपचार सहन करणारा, ज्याचा अग्नि प्रदीप्त व ज्यास ज्वर नाहीं, असा रोगी साध्य जाणावा.

**उपचार**—१--धनें, सातु, गहूं, मूग, शेळीचें मांस, दुध, तूप, साखर हीं क्षयरोग नाशक आहेत. पावशेर दूध आणि तितकेंच पाणी, खडीसाखर पैसाभार, आणि २।३ पिंपळ्या, यांचा काढा करून दूध शेष राहिलें ह्मणजे त्यांतून सुवर्णमालिनीवसंत घ्यावा. (यादी नंबर १४३ पहा.) किंवा यादी नंबर २१६ चें औ० घ्यावें. २—वर्धमान पिंपळी घ्यावी. (ज्वर प्रकरणांत जीर्ण ज्वरावरील उपचारांत पहा.)

३—शीतोपळा चूर्ण द्यावें. ( यादी नंबर ८८ पहा. ) कुमारीआसव द्यावें. ( यादी नंबर १७८ पहा. ) ४—सुवर्णमाक्षिक भस्म, लोहभस्म, वावाडिंगाचें चूर्ण आणि शिलाजीत हे जिन्नस समभाग एकत्र करून तें मिश्रण मध व तूप यांशीं द्यावें, ह्मणजे तें उग्रक्षयाचा नाश करितें. ५—लोहभस्म ( यादी नंबर ११४ ) २ गुंजा, शिलाजिताबरोबर द्यावें. ६—लोणी १ तोळा, खडीसाखर ६ मासे, आणि मध ३ मासे, एकत्र करून त्यांतून सोन्याचा वर्ख .||-- १ गुंज द्यावा. ७—पित्तपापडा, मनुका व खडीसाखर यांचा काढा घ्यावा. ह्मणजे ज्वर व दाह कमी होतो. ८—यव व गहूं यांचें समभाग चूर्ण दुधांत शिजवून त्यांत मध व साखर घालून द्यावें. ९ पिंपळाची साल, सुंठ, पिंपळी आणि मिरीं समभाग घेऊन त्यांचें चूर्ण करून तें २।३ मासे, व १-१॥ गुंज मंडूर एकत्र करून तें गुळाशीं द्यावें. १० अटरूषावलेह घ्यावा, ह्मणजे खोकला कमी होईल. ( यादी नं. १५१ पहा ) ११ लोकनाथ, कनकसुंदर, सुवर्णमालिनीवसंत ( यादी नंबर १४३ पहा ) सुवर्णमाक्षिक ( यादी नंबर ११६ पहा. ) यांपैकीं एकादें योग्य अनुपानाबरोबर द्यावें. बुब्बुल्यारिष्ट द्यावें. ( यादी नंबर १७९ पहा. ) आलेपाक द्यावा. ( यादी नंबर १५३ पहा ) कफविकार वाढला असल्यास केळें भाजून मध व मिरीं यांशीं द्यावें ह्मणजे तें वाढलेल्या कफाचा नाश करितें.

**विशेष सूचना**—क्षयाचें पूर्वरूप अगोदर बरेच दिवस नजरेस येतें. प्रारंभीं थोडथोडा ज्वर, डोळ्यांची व हातापायांची आग, व शक्ति कमी, उत्साह नसणें हे विकार होऊं लागतात, व पुढें हे वाढत वाढत जाऊन प्रकृति कठीण होते. याकरितां वर लिहिलेलीं लक्षणें नजरेस आलीं ह्मणजे उपचार सुरू करावे, काडीमात्र हयगय करूं नये. विशेष प्रकृति बिघडून खोकला, अशक्तपणा, बराच ज्वर, उराचे मणी मोकळे होणें, तोंड फिकट, अन्न कमी जाणें, अरुचि, हे विकार झाले ह्मणजे तो रोगी बहुधा बरा होत नाहीं. ह्मणून आरंभीं विशेष लक्ष पुरविलें पाहिजे.

अलिकडे पुष्कळ वेळां असें नजरेस येतें कीं, १६।१७ वर्षांचें वय झालें ह्मणजे धातु विकार उत्पन्न होतो किंवा स्वप्नावस्था होते, व पुढें हयगय झाली, तर प्रकृति क्षयावर जाते. याचें मुख्य कारण धातुस्थान नीट नसणें हेंच होय. याकरितां वर लिहिलेलीं लक्षणें दिसतांच वर्धमान पिंपळी ( ज्वर प्रकरणांत जीर्ण ज्वरावरील उपचारांत पहा ), सुवर्णमालिनीवसंत ( यादी नंबर १४३ पहा. ) किंवा दुसरें एकादें औषध घ्यावें ह्मणजे प्रकृति जास्त बिघडणार नाहीं, व बिघडलेली नीट होईल. या विकृतीवर आरंभीं सुवर्णमालिनीवसंत हें उत्तम औषध आहे. " काडलीव्हर आईल " याचाहि या विकारांत बराच चांगला उपयोग होतो.

**उरःक्षत क्षयः**—याचीं कारणें व लक्षणें—बलवंताशीं मल्लयुद्ध करणें, फार आयास करणें, अंगावर भार घेणें, अश्वादिकांच्या पुढें धांवणें, मोठमोठ्या दगडाच्या

मोठ्या उचलून टाकणें, एकाएकीं दुरून धांवून येऊन उडी मारणें, मोठी नदी पोहून जाणें, मोठ्यानें वारंवार ओरडणें, इत्यादिकांच्या योगानें वातादि दोष कुपित होऊन त्यापासून उरांत क्षत होऊन हृदयाला फार वेदना होतात, आणि बल, कांति, रुचि व जठराग्नि हीन होतात, ज्वर असून तोंडांतून काळसर, पीतवर्ण व दुर्गंधयुक्त रक्तमिश्रित असा निरंतर कफ पडतो, आणि रोगी अत्यंत क्षीण होतो, असें झालें ह्मणजे तो उरःक्षत क्षय जाणावा.

**असाध्य लक्षणः**—उरास पीडा, रक्ताची वांति, कास, बरगड्या, पाठ आणि कंबर हीं जखडल्यासारखीं होणें इत्यादि.

**साध्य लक्षणः**—रोगाचीं लक्षणें थोडीं झालेलीं, अग्नि प्रदीप्त, रोगी बलवान व नूतन रोग झालेला इत्यादि.

**उपचारः**—१–बिया काढलेल्या मनुका २० तोळे, तूप २० तोळे, आणि मध १० तोळे, असे जिन्नस एका बरणींत भरून तोंडास घट्ट बूच घालून ती बरणी जमीनींत किंवा तांदुळाचे राशींत १५।२० दिवस पुरून ठेवावी. मग बाहेर काढून त्यांतील औषध रोग सकाळ सायंकाळ प्रत्येक वेळेस १–१॥ तोळा घ्यावें. २--बेदाणा, पिंपळाची लाख, मध व तूप हीं एकत्र करून घ्यावीं. ३--शंखजिऱ्याची बारीक पूड करून ती तूप व साखर यांतून द्यावी. ४--प्रवाळभस्म घ्यावें. (यादी नंबर ११२ पहा.) ५--शोक, स्त्री व दुसऱ्यांच्या गुणांवर दोषारोप हीं सोडावीं. कथा पुराण इत्यादि श्रवण करावें. ६--लाह्या, दूध आणि मध ह्यांबरोबर खाव्या. आणि त्या जिरल्यावर साखर घालून दूध प्यावें. (पार्श्व आणि बस्ति ह्यामध्यें शूल अग्नि व पित्त मंद असें असेल तर मद्याशीं लाह्या भक्षण कराव्या.) ७--दशमुळें (यादी नंबर १६ पहा.) चिकणा, रास्ना, पोंखरमूळ, देवदार आणि नागरमोथे, यांचा काढा द्यावा; ह्मणजे कुशी, खांदे व डोकें यांचा शूल, उरःक्षत, खोकला व श्वास हे शांत होतील.

**पथ्यः**-मृदुरेच, गहूं, मूग, चणे, बकरीचें मांस, लोणी, दूध, तूप, चांदिणें, मधुर रस, पिकलेलीं केळीं, फणस, आंबे, आंवळे, खजूर, नारळ, शेवगा, ओलीं द्राक्षें, अडुळसा, खडीसाखर, सर्वदा मेव्यांचा आश्रय इत्यादि.

**अपथ्यः**—मलमूत्राचा वेग धारण, श्रम, स्वेदन, अंजन, साहसकर्म, रूक्षान्न, रूक्षपान, विषप्राशन, विडा, कलिंगण, लसूण, हिंग, आंबट, तिखट, कडू व तुरट हे रस, पालेभाजा, क्षार, दाहकारक पदार्थ इत्यादि.

**प्रतिबंधक उपायः**—क्षयरोग हा सांसर्गजन्य रोग आहे, तेव्हां क्षयरोगी झालेल्या माणसांचे संसर्गापासून दूर राहणें, साधें व पौष्टिक अन्न, शुद्ध हवा, प्रकृतीस मानवेल त्या प्रकारचा व्यायाम, नियमितपणा, नेमस्तपणा, वगैरे साधनांनीं प्रकृति निकोप ठेवणारास रोगाची भीति सहसा नसते.

## वातरक्त ( रक्तपित्ती ) ( महारोग. )

**कारणः**--अपक्व, आंबलेलें, शिळें, शुष्क, तिखट, विरुद्धान्न, विदाहजनक अन्न, कुळीथ, इ० पदार्थांच्या सेवनानें; व दिवा निद्रा, रात्रौ जागरण. क्रोध, इ० कारणांनीं, व हत्ती, अश्व, उंट यांवरून जाण्यानें; शरिरांतील रक्त दूषित होऊन पायांत जमतें, नंतर दुष्ट वायूशीं मिळून अंगावर अनेक प्रकारचे चट्टे वगैरे उठतात. हा विकार प्रथम पायावर व मग हातावर उत्पन्न होऊन मग सर्व देहावर पसरतो.

**लक्षण**--शरिरावर चट्टे व रंगी बेरंगी मंडळें उठणें, नायट्यासारखीं चकदणें उठणें, अंगाला काळसरपणा, स्पर्शाचें ज्ञान नसणें, क्षत पडणें व त्यामध्यें फार ठणका असून लस वाहणें, सूज, कंडू, मांड्या,पोटऱ्यागुडघे यांच्या संधींत शूल, बोटें वांकडीं व सुजीर असून आंखडणें, कानाचे चांफे नाक व गाल यांवर सूज असून चेहरा आरक्त दिसूं लागणें, नाक बसणें, अंगास भेगा पडणें इत्यादि.

हा रोग स्पर्श संचारी असल्यामुळें अशा माणसाशीं इतर माणसांनीं बिलकूल संबंध ठेवूं नये. अशा रोग्यास निराळें ठेवावें. निराळें न ठेवलें तर त्यापासून सार्वजनिक आरोग्यास धोका आहे. हा विकार उत्पन्न झाल्यावर जी संतति होईल तिला हा रोग होण्याचा विशेष संभव असतो. हा विकार मोडणें फार कठीण, याजकरितां विकार दिसतांच उपचार सुरू करावे, हयगय करूं नये.

**उपचारः**---या विकारात मुख्य रक्तदोष असतो ह्मणून रक्तशुद्धीवरील उपचार करावे. १--यादी नंबर ८२ चा महामांजिष्टादि काढा द्यावा. हा फार उत्तम आहे. २--अडुळसा, गुळवेल, आणि बाव्याचे शेंगेचा मगज, यांचा काढा एरंडेल घालून द्यावा. ३ कैशोरगुग्गुळ द्यावा. ( यादी नंबर १४७ ) ४--गंधकरसायन द्यावें. ( यादी नंबर १२४ पहा ) ५-यादी नंबर ८३ चा काढा द्यावा. ६--गोक्षुरादि गुग्गुळ द्यावा. ( यादी नंबर १४८ पहा. ) ७--चालमोगरा अथवा गर्जनचें तेल चुन्याचें निवळींतून १० थेंब असें तीन वेळां द्यावें. ८-बावचीचें तेल आंगास लावितात. ( कृति ) २० तोळे बावची घेऊन चांगली बारिक पाणी घालून चटणीप्रमाणें वांटून निर्मळ लांबच्या तिळाचे तेल घेऊन त्यांत तो गोळा घालून तेल निशेष राहीपर्यंत कढवावें.

वि० सू०--एका इसमानें अनुभविक उपाय सांगितला आहे तो-कंवठेल तेल अंगास लावावें व दररोज ५--४ थेंब तरी साखरेबरोबर पोटांत घ्यावें. जास्त सोसल्यास जास्त घ्यावें हें घेतल्यावर समयीं वांति फार होते, ह्मणून प्रथम अगदीं अल्प प्रमाणानें सुरू करून सोसेल तसें घ्यावें.

**पथ्यः**--रोग्यास चांगलें अन्न व व्यायाम द्यावा आणि स्वच्छ हवेंत ठेवावें. मासे खाऊं नये. तांबड्या साळी, गहूं, हरभरे, मूग, तुरी, दूध, चाकवत, कारेतें, पडवळ, आंवळा, आलें, सुरण, शेवगा, साखर, द्राक्षें, लोणी, ताजें तूप इ.

**अपथ्य:**—दिवसास झोंप, शेक, उन, मैथून, उडीद, कुळीथ, पावटे, वाल, वाटाणें, दहीं, ऊंस, मद्य, तिखट, पिठाचे पदार्थ, इ.

## वायुरोग.

फार शीत, फार रुक्ष व फार लघु असें अन्नभक्षण, अति मैथून, अति जागरण, रक्तस्राव, नदींत पोहणें, अति मार्गक्रमण, अत्यंत विरुद्ध चेष्टा, (उड्या वगैरे), धातूचा क्षय, शोक, मलमूत्रांचा रोध, उपवास, इत्यादि कारणांनीं कुपित झालेला वायू, देहांतील रिकामीं स्रोतसें भरून अनेक व्याधि उत्पन्न करितो. ते व्याधि पुढें लिहिल्या-प्रमाणें:—संधीचा संकोच आणि स्तंभ, अस्थि आणि संधि फुटल्यासारखी पीडा, असंबद्ध भाषण, हातपाय आणि डोकें जखडणें, खंजत्व, पांगळेपणा, कुंबडेपणा, निद्रानाश, कंप, मस्तक नाक, डोळे, आणि मान, आंत जाणें, इत्यादि अनेक व्याधि होतात या सर्वांस वायुरोग ह्मणतात.

**याचे प्रकार:**—आक्षेपक, हनुस्तंभ, उरुस्तंभ, जिव्हास्तंभ, धनुर्वात, अर्धांग वायु, इत्यादि ८० प्रकार आहेत. या प्रत्येकाचें विवरण करूं लागल्यास विस्तार बराच होईल, याचकरितां सर्व प्रकारचे वायूंवर लागू पडणारे उपचार खालीं लिहितों:—

**उपचार:**—१-यादी नंबर ६१ किंवा ६२ किंवा ६३ चा काढा द्यावा. हे काढे संपूर्ण वात व्याधींवर उत्तम पैकीं आहेत हें पूर्ण लक्षांत ठेवून ते घेण्याची हेंगय केली नाहीं तर पुष्कळ उपयोग होईल. रोगाचे मानानें १४।२१।२८।४२ दिवस काढा घेतला पाहिजे. अंगांत फार वात वाढल्यास २।३ महिने सुद्धां घ्यावा लागतो. परंतु तो गुण दाखविल्याशिवाय राहणार नाहीं. या काढ्यांतून योगराज गुग्गुळ (यादी नंबर १५० पहा.) घेतल्यास फार उत्तम. तो न मिळेल तर पंचामृतपर्पटी द्यावी. (यादी नंबर १३० ) २-एरंडपाक (यादी नंबर १५५,) पिंपळीपाक (यादी नंबर १५९,) वातारीच्या गोळ्या (यादी नंबर १४०,) हेमगर्भ (यादी नंबर १४६,) अग्निकुमार (यादी नंबर ११८,) रससिंदूर (यादी नंबर १३६,) गंधक रसायन (यादी नंबर १२४,) यांपैकीं एकादें औषध द्यावें. ३-अंगांतून वायूच्या कळा येत असल्यास २८ तोळे गाईचें दूध घेऊन त्यांत सोललेली लसूण १॥ तोळा व गुळ १॥ तोळा टाकून तें दूध आटवून खवा करावा, आणि त्याचे ३ भाग करून ३ दिवस द्यावें. ४-अंगांत कळा येणें, पाय किंवा हात किंवा शरिराचा कोणताही भाग वायूनें धरणें इत्यादिकांवर यादी नंबर १६५ चें औषध द्यावें, किंवा यादी नंबर १६६ किंवा १७५ चें तेल लावून शेक घ्यावा. नंबर १६५ चें स्वल्प खर्चाचें औषध चांगल्या पैकीं आहे. हें औषध घेतल्यापासून ४।५ दिवसांनीं वाटेल तितकें तूप खावें. ५-एरंडेल घालून पोळी करून खावी. (यादी नंबर १९४ पहा.) ६-मुसळी पाक द्यावा. (यादी

नंबर १६४ पहा.) ७-प्रतापलंकेश्वर द्यावा. (यादी नंबर १३१ पहा.) ८-गोक्षुरादि गुग्गुळ द्यावा. (यादी नंबर १४८ पहा.)

**नळवायूः**—१-तेल्या ठांकणखार म्हशीचे शेणाचे पाण्यांत खोलून त्याची लाही करून ती सुमारें २ गुंजा, कटुकीची पूड ३ मासे, आणि सैंधव १ मासा, असें एकत्र करून द्यावें. २-खैराचा पाला बारीक वाटून नाचण्याचे पिठांत घालून भाकरी भाजून खावी. पथ्यः–आंबट तिखट वर्ज. ३-शूल प्रकरणांतील "सर्व प्रकारचे शूळावर उपचार" या सदरांतील नंबर १ चीं औषधें द्यावीं.

**वायगोळ्यावरः**—बिबवे चांगल्या सशक्तास १।२ व इतरांस वयाचे व प्रकृतीचे मानानें घेऊन, त्यांचे तुकडे करून गाईच्या १ शेर दुधांत घालून उकळावे, आणे चतुर्थांश दूध राहिलें ह्मणजे बिबव्याचे तुकडे काढून तें दूध घ्यावें. याप्रमाणें १०।१२ दिवस केलें ह्मणजे वरील विकार मोडून अन्यप्रकारचे वातविकारहि कमी होतात. यास पथ्य-गव्हांची पोळी तूप साखर दूध आणि भात. अंगाची आग झाल्यास तूप जास्त खावें.

**पथ्यः**—अभ्यंग, अंगमर्दन करणें, वारा बंद करणें, घाम, ताकाची निवळ, तूप, गोड आंबट व खारट हे रस, गहूं, कुळीथ, साटक्या साळी, पडवळ, शेवगा, वांगीं, लसूण, वाहतें पाणी, विडा, इत्यादि.

**अपथ्यः**—जागरण, मलमूत्रांचा वेग धारण, वांति, श्रम, उपवास, हरभरे, पावटे, वाटाणे, थंड पाणी, जांभळें, तिखट, तुरट व कडू हे रस, स्त्रीसंग, घोडा व हत्ती यांवर बसणें, इत्यादि.

**विशेष सूचनाः**—वर नंबर १ यांत काढे लिहिले आहेत ते घेत असतां मुख्य पथ्यापथ्य–ताक दहीं व कोणताहि वातकर पदार्थ खाऊं नये. स्नान करूं नये. (फारतर ४।८ दिवशीं करावें.) वाऱ्यावर बसूं नये, भातखाणें तो तुरीचे डाळीचे वरणाचें पाणी काढून आंत कोकंब साल खारीक वगैरे घालून कढवून त्याशीं अगर कुळथाचे काटाशीं खावा. तूप दूध थोडेंच खावें. तादुळांची भाकरी गव्हांची पोळी व साखर खाण्यास हरकत नाहीं. याप्रमाणें पथ्य केलें असतां हे काढे उत्तम गुणदायक होतात.

अकस्मात् एकादे वेळीं वायू होऊन मनुष्य बेशुद्ध होतो. अशा वेळेस मात्रा वगैरे पोटांत द्यावीच, परंतु मनुष्य लवकर शुद्धीवर येण्यास नाकांत औषध घालावें (यादी नंबर २२२ पहा) व अंजन करावें. (यादी नंबर १९२ पहा.)

मनुष्य बेशुद्ध होतांच खाण्याचा कांदा सबंध भाजून निवाला नाहीं तों मधो-मध कापून कपाळाचे दोन्ही बाजूंस चेपून धरावा. (हा एक प्रकारचा डागच आहे.) म्हणजे मनुष्य शुद्धीवर येतो.

एकादे इसमाचा हात अगर पाय किंवा पाठ मधूनमधून धरते त्यास उपचार उत्तम पैकीं फ्लानेल घेऊन तिची बंडी करून दिवसभर अंगात ठेवावी. निदान दुखत असलेला भाग फ्लानेलचे कपड्यानें बांधून तरी ठेवावा. आंतून दुसरा कपडा घालावयाचा नाहीं. याप्रमाणें ८।१५ दिवस केलें म्हणजे गुण येतो. ज्यास वायूचा विकार आहे त्यानें सदोदित हा उपचार सुरू ठेवावा. उपचार अनुभविक आहे.

## विसर्प ( धांवरें. )

लवण, आम्ल, उष्ण, कडू, हिरवीशाक वगैरेच्या सेवनामुळें, हवेंत कांहीं दोष उत्पन्न झाल्यामुळें, तोंड आणि मस्तक यांजवर आघात झाल्यामुळें, किंवा अजिर्णानें, वातादि दोष कुपित होऊन त्यांपासून हा रोग उत्पन्न होतो. हा रोग शरिरावर सर्पासारिखा पसरतो, ह्मणून यास विसर्प ह्मणतात. कोणी धांवरें ह्मणतात.

**याचे उपद्रवः—**ज्वर, अतिसार, वांति, तृषा अरोचक, इत्यादि.

याचे १--वातिक, २ पैतिक, ३ कफज, ४ सन्निपातिक, ५ अग्निविसर्प (आग्या धांवरें.) ६ ग्रंथि विसर्प आणि ७ कर्दमक, असे सात प्रकार आहे. त्यापैकीं आग्या धांवरें हा प्रकार लोकांत फार आढळतो, म्हणून त्याचें स्वतंत्र वर्णन करून बाकीच्यावर खालीं उपचार लिहिले आहेत.

**आग्या धांवरें (अग्निविसर्प)** लक्षणें—ज्वर, वांति, अतिसार, तृषा, भ्रम, अग्निमांद्य, जिभेवर मळ जमणें व डोकें दुखणें इ० याचा उपद्रव झाल्यावर १।२ दिवसांनीं त्वचेंत दाह उत्पन्न होतो व दाहयुक्त भाग सुजतो व जाड होतो. त्या ठिकाणीं आग होते. हा नजिकचे भागावर फार लवकर पसरतो, व तो प्रदेश कोळशासारखा, अथवा चाष पक्षाचे पंखासारखा हिरवा, निळा किंवा तांबडा होतो. व त्या प्रदेशाचे पुढला भाग भाजलेले फोडासारखे फोडांनीं त्वरित व्याप्त होतो. हा विसर्प लवकर वाढतो आणि हृदयाला व्यापितो.

**उपचारः—**सागाचीं कोंवळीं पानें आणून त्याचा पाणी घातल्याशिवाय आंगरस काढून तो मडक्यांत ठेवून आटवावा. आणि घणसर जाहला म्हणजे धावरें जाहले जागेवर लावावा. फार उत्तम व अनुभविक औषध आहे. २--जटामावशी, राळ, लोध्र, जेष्टमध, रेणुकाबीज, मोरवेल, निळें कमळ आणि शिरस वृक्षाचीं फुलें, असे समभाग जिन्नस पाण्यांत वाटून त्याचा लेप द्यावा. ३--वड, उंबर, पिंवळ, पायरी आणि नांदरुखी, या झाडांच्या सालीचा कल्प करून त्यांत शतधौत तूप घालून लेप करावा. तो दाहयुक्त विसर्पाचा नाश करितो. ४--दाहयुक्त भागावर तवकील लावून वर कापूस बसवून फडका बांधून ठेवावा. ५--नवसागर १ भाग, मध ४ भाग आणि पाणी ८० भाग एकत्र करून त्यांत नख्राची घडी भिजवून दाहयुक्त भागावर बसवावी.

**सर्व प्रकारचे विसर्पांवर उपचार**:—प्रथम लंघन करावें, मलशुद्धि होत नसल्यास मलशुद्धीचें चूर्ण द्यावें व वाऱ्यावर फिरूं नये. नागरमोथे, कडुनिंब आणि कडू पडवळ यांचा काढा करून घ्यावा. २--गौरीचे केंस म्हणून जें झाड आहे (हीं झाडें लहान लहान असून त्यांची दांडी काळी असते व तीं पाण्याच्या आश्रयास असतात.) त्याचा पाला वांटून लेप करावा, म्हणजे लवकर विकार मोडतो. ३--कांटेनिवडुंगाची राख लावावी. ४--किराईत, अडुळसा, कटुकी, कडूपडवळ, त्रिफळा, कडुनिंब आणि चंदन, याचा काढा घ्यावा; म्हणजे विसर्प, दाह, ज्वर, कंडू, यांचा नाश होतो. ५--गुलबाशीचा कांदा गोमूत्रांत उगाळून लेप द्यावा. ६--रुईची मुळी पाण्यांत उगाळून ३ दिवस लावावी. ७--अश्वगंध लिंबाचे रसांत उगाळून ३ दिवस लावावा.

**पथ्य**:—जुने यव, गहूं, कांग, साटकेंभात, मूग, मसुरा, चणे, तुरी, लोणी, तूप, द्राक्षें, डाळिंब, कारेतें, पडवळ, आंवळकटी, इत्यादि.

**अपथ्य**:—व्यायाम, दिवानिद्रा, क्रोध, शोक, जडान्न, लसूण, कुळीथ, उडीद, तीळ, मीठ, आंबट, तिखट व मद्य, इत्यादि.

## व्रण.

**अग्निरोहिणी**:—(काळपुळी) हा एक ग्रंथिज विकार आहे पहिल्यानें गळवाप्रमाणें सुज उत्पन्न होऊन त्या ठिकाणीं फार जळजळ सुटते, व वेदनाहि फार होतात. हिचा रंग पहिल्यानें काळसर तांबूस असतो व पुढें जांभळा होतो. शेवटीं तिच्यावरील कातडी कितीएक ठिकाणीं कुजून तिला छिद्रें पडतात, व त्यांतून पू वाहतो. ही गांठ बहुधा पाठीवर किंवा मानेवर होते. क्वचित अन्य ठिकाणींहि होतो. ह्या विकारांत ज्वर असून तहान असतें व डोकें दुखतें. ज्या गांठीला बरींच छिद्रें पडतात तिला चाळण पुळी म्हणतात.

हा विकार असाध्य रोगांपैकींच आहे. निखालस बरा होणें कठीण पडतें. एकदां बरें वाटल्यावर कधीं कधीं १।२ वर्षांनीं पुन्हा त्याच जाग्यावर उग्रम होतो. पाठीवर आणि मानेवर झालेली पुळी तर प्रत्यक्ष काळच होय. याजकरितां फार सावधगिरीनें वागावें, तावडतोब उपचार करावे व खालीं लिहिल्याप्रमाणें पथ्य करण्यास चुकूं नये. शस्त्र क्रियेनेंही चांगला गुण येतो.

**उपचार**:—१–गोचिडीचे झाडाचा पाला आणून बारीक वाटून तो पुळीवर बसवावा, आणि त्यावर मधून मधून थंड पाणी कापसाचे बोळ्यानें सोडावें. हा पाला ७ दिवसपर्यंत असाच ठेवावा. नंतर तो काढून टाकून, बकरीचें दूध पावशेर (७ तोळे) घेऊन त्यांत दीड मासा शेंदूर घालून तो त्यांत मिळवावा, आणि तें मिश्रण बारीक कापडाचे पट्टीस लावून तीं पट्टी पुळीवर बसवावी, आणि त्या पट्टीवर वरील मिश्रण अशा बेतानें वारंवार सोडावें कीं, पट्टी सुकूं नये. याप्रमाणें तीन दिवस केल्यावर वरील मिश्रणांत

१-१॥ गुंज शंखजिरें घालून तें मिश्रण वरच्याप्रमाणें त्या पट्टीवर सोडित जावें. पहिली पट्टी सहजीं सुटल्यास या मिश्रणाची दुसरी पट्टी वर लावावी. याप्रमाणें महिना दीड महिना करावें, म्हणजे कोणतेहि प्रकारची पुळी असली तरी बरी होते. हें औषध फार चांगल्यापैकीं आहे. २--झाक्याचा पाला वाटून लेप करावा. ३--किंजळ आणि नाणा या दोन झाडाचा कोंवळा पाला समभाग घेऊन बारीक वाटून दोन सुपाऱ्यांएवढी गोळी खाण्यास द्यावी, व पुळीवर ईंवरीची साल वाटून लेप द्यावा. ४-वांकेरीचें मूळ दुधांत उगाळून पोटांत द्यावें, व पाण्यांत उगाळून पुळीवर लावावें. याप्रमाणें महिना दोन महिने करावें. ही मुळी या विकारावर फार चांगली आहे. मात्र पाळ उपयोगी नाहीं. मुळी (रताळ्यासारखी गांठ असते ती) पाहिजे. ती नच मिळेल तर पाळाचा उपयोग करावा. शौचास साफ होत नसल्यास एरंडेलाचें रेचक द्यावें. झोंप येत नसल्यास थोडी अफू द्यावी. ५-कापुरभेंडीचें पाळ दुधांत अगर पाण्यांत उगाळून पोटांत द्यावें. ६-जखम भरून येण्याकरितां यादी नंबर १७७।१८०।१८३ यांपैकीं एखादें औषध लावावें.

**पथ्य:**—गव्हांचे पदार्थ (सांजा, पोळी, पुऱ्या) नाचण्याची भाकरी, 'सोमफळ' या नांवाचे साळीचे तांदुळांचा भात, दूध, साखर, हे पदार्थ खावे. मीठ खाऊं नये, परंतु खाल्ल्यावांचून चालत नसेल तर मिठा ऐवजीं सैंधव खावें.

**जखमा:**—शरिराच्या कोणत्याही भागाचें छेदन झालें असतां त्यास जखम म्हणतात. जखम झालेवर रक्त वाहूं लागतें. अशावेळीं रक्त बंद करण्याचा उपाय योजणें जरूर असतें. जखम भयंकर असेल तर तात्पुरते उपाय करून डाक्टरकडे नेण्याची त्वरा करावी. कांच, चाकू, खिळा इ. आंत गेलेला पदार्थ जपून काढावा.

**उपचार:**—१--रक्त वाहू लागलें तर ते बंद होण्याकरितां विलायती (दगडी) कोळशाची चांगली बारीक वस्त्रगाळ पूड करून ती तळहातावर घेऊन जखमेत बसवावी व हातानें दाबून धरावी. १।२ मिनिटांत रक्त थांबतें व पू न होतां जखमेवर कोळशाची खपली धरून जखम बरी होते. २--रक्त बंद होण्याकरितां थंड पाण्याची धार धरावी, किंवा तुरटीची बारीक पूड करून वरचेवर टाकित जावी, आणि वर कापूस बसवावा. ३-मेण सातभाग व कापूर १-भाग घेऊन मलमासारखें घट्ट होईल अशा बेतानें त्यांत खोबरेल घालून कढवावें, आणि निवाल्यावर त्याची पट्टी बसवावी. ४-कोंबडीचीं अंडीं खूब शिजवून त्यांतील पिवळा मगज असतो तो तव्यावर पेटवावा, म्हणजे त्यांतून तेल निघते तें जखमेस लावावें. प्रत्येक अंड्यापासून सुमारें १॥-२ चमचे तेल निघतें. ५--पांढरें मेण एक भाग आणि तिळांचें तेल दोन भाग ह्या प्रमाणानें घेऊन, एकत्र करून मंदाग्नीवर पचन करून पट्टी लावावी. यादी नंबर १८२ चें मलम लावावें. ६--कापुरभेंडीचें मूळ थंड पाण्यांत उगाळून लावावें.

७-जुनें तूप लावावें.८ नारळी माडाचे झाडास नवीन पोय येऊं लागली ह्मणजे तिजवर कफ (कापसासारखा पदार्थ) असतो तो शिंपीनें किंवा दुसऱ्या कशानें तरी युक्तीनें काढून, जखम धुऊन त्यावर बसवावा. ह्याप्रमाणें तीन चार वेळां करावें. ९--यादी नंबर १७१ किंवा १८५ चें औषध लावावें.

**भगंदरः**—गुदाचे बाजूस दोन अंगुळांवर एक पुटकुळी होते. तिला फार ठणका लागतो, व ती फुटून त्या ठिकाणीं भोंक पडतें, त्यास भगंदर असें ह्मणतात. ज्या भगंदरांतून मूत्र, मळ, कृमि आणि शुक्र वाहतें तो असाध्य जाणावा. बहुधा सर्व भगंदरें दुःसाध्यच आहेत.

**भगंदर होण्याचें कारणः**—मूळव्याधीचा परिणाम, उपदंशाच्या नाशाकरता अति दुःसह औषधाचें सेवन, तिखट पदार्थांचें अति सेवन, अति जागरण किंवा गरमीची उपेक्षा करणें, इत्यादिकांनीं हा रोग उत्पन्न होतो.

**पूर्वरूपः**—कमरेच्या कपालास्थीला टोंचणी व ठणका लागणें.

**उपचारः**—१--मोंगली एरंडाच्या बिया पाण्यांत वाटून शिजवाव्या, आणि त्यांचें तेल काढून तें कापसाची बोथी करून भगंदरांत घालावें. प्रहरा प्रहरानें घाळीत जावें. प्रथम रक्तस्राव असतो तो चार दिवसपर्यंत निघून जाऊन छिद्रें भरतात. हें औषध उत्तम पैकीं आहे असें एका मित्रानें सांगितलें आहे. २--वांकेरीचें भातें (गड्डा असतो तो) दररोज गाईचे दुधांतून पुष्कळ दिवस सेवन केलें असतां हा रोग बरा होतो. या औषधानें फार दिवसांचेहि रोगी बरे झाले आहेत. मात्र हें बरेच दिवस ह्मणजे समयीं ४।६ महिनेसुद्धां सेवन करावें लागतें. हें औषध फार उत्तम पैकीं आहे. ३-कापूर भेंडीचें मूळ पाण्यांत उगाळून दिवसांतून २-४ दां भगंदरावर लावावें, व एकदां पोटांत घ्यावें. ४--खैराची साल, हरडा, बेहडा व आंवळकटी, यांचा काढा करून त्यांत बावडिंगाचें चूर्ण आणि ह्मशींचें तूप घालून घ्यावा. ५--हरडा बेहडा, व आंवळकटी, यांचे काढ्यांत मांजराचें हाड उगाळून लेप करावा.

**पथ्यः**—भात, मूग, गव्हाचे पदार्थ, शेवगा, पडवळ, तूप, दूध, साखर, कडू पदार्थ, इत्यादि.

**अपथ्यः**—व्यायाम, मैथून, पिष्टान्न, इत्यादि.

**सूचनाः**—या विकारांत पथ्याविषयीं विशेष जपलें पाहिजे. उत्तम पथ्य ह्मटलें ह्मणजे "गव्हाचें खाणें" हें आहे. याकरितां त्याशिवाय दुसरें कांहीं खाऊं नये. (दूध, तूप, साखर खाण्यास हरकत नाहीं.) वरील औषधांपैकीं पहिल्यानें नंबर १ चें तेल लावून नंबर २ चें औषध पोटांत द्यावें. त्यानें गुण न वाटल्यास मग नं० ३ चें औषध पोटांत देऊन नं० ५ चे औषधाचा लेप करावा.

**भाजणें**—( अग्निदग्धव्रण ) याचे चार प्रकार मानितात. **पहिला**--त्वचा विवर्ण होईपर्यंत भाजणें तो **दुसरा**--भाजलेल्या जागीं फोड येऊन तीव्र दाह होतो व जो फार वेळानें शांत होतो तो. **तिसरा**--खोल भाजून फोड येतो आणि अत्यंत दाह होतो तो. **चवथा**--ज्या भाजण्यानें त्वचा आणि मांस मध्यें लोंबतात, व गात्र मोकळें होऊन शिरा, स्नायु व अस्ती दग्ध होऊन अत्यंत कठीण ठणका ज्वर दाह इ. उपद्रव होतात तो.

**उपचार**—वर लिहिलेले प्रकारांपैकीं पहिले प्रकारचे भाजण्यावर अग्नीनें शेकून उष्ण औषधें लावावीं. दुसरे प्रकारावर--प्रथम शीत व उष्ण क्रिया करावी. नंतर घृतादिकांचा लेप करावा. तिसरे प्रकारावर--कुजलेलें मांस काढून टाकून त्यावर शीतल क्रिया करावी. भाताचा कुंडा किंवा टेंभुरणीची साल यांच्या काढ्यांत तूप घालून त्यानें लेप करावा. चवथे प्रकारावर--वंशलोचन, वड, चंदन, गेरू, आणि गुळवेल यांच्या कल्कांत तूप घालून त्याचा लेप करावा. वस्त्र पेटून जेव्हां आंग भाजतें त्यावेळीं भेंडीची साल उगाळून लावावी.

**आणखीं उपचार**—१--बोटें वगैरे ठिकाणीं थोडें भाजलें असतां भाजलेला भाग मिठाच्या किंवा साध्या पाण्यांत बुडवून ठेवावा, ह्मणजे आग होणार नाहीं. व फोडहि येणार नाहींत. यापेक्षां अधिक भाजलें असेल तर खोबऱ्याचें तेल एक भाग आणि चुन्याची निवळ २ भाग घेऊन एकत्र करून पुष्कळ घोटावें, मग त्यांत कापसाच्या घड्या भिजवून जळलेल्या भागावर ठेवाव्या. एक घडी सुकली ह्मणजे दुसरी ठेवावी, किंवा वरचेवर वरील मिश्रण सोडित असावें, ह्मणजे आग शांत होते व भाजलेला भाग लवकर बरा होतो. पू झाल्यास मलम लावावें ( यादी नं० १८५ पहा ) २--यादी नंबर १८६ चें मलम लावावें, किंवा केस जाळून त्यांची राख तिळांचे तेलांत खलून तें लावावें. किंवा विड्याचे पानांचा रस लावावा. ३--मध किंवा शाई यांत फडकें भिजवून लावावें. ४--हरीतकी, चिखल, जिरें, जेष्टमध, मेण आणि राळ, हे जिन्नस एकत्र करून लेप द्यावा. ५-.भाजलेली जागा पुवळणास आली असल्यास, पिंपळाच्या सुक्या सालीची भुकटी त्यावर टाकावी, किंवा उंबराची साल थंड पाण्यांत उगाळून लावावी. ६--त्रिफळा झांकण ठेवून खापरांत जाळावी, आणि त्याची राख व रेशिमाची राख तेलांत एकत्र करून तें लावावें, ७--यव जाळून त्याची राख करून तिळाच्या तेलांत खल करून लेप करावा. ८--तांबड्या सालीचे कुंभ्याचा रस लावावा. ९--उंडिणीची साल बारीक करून ऊन करावी आणि तिचा पेंड बांधावा १०--बाभळीच्या सालीची भुकणी अथवा शेळीच्या लेंड्यांची राख भाजलेल्या भागावर टाकावी.

**पथ्यः**—दूध, साबुदाण्याची पेज, आरारूटची पेज, गव्हांचा सांजा, ऊन पाणी इत्यादि.

**कोणतेहि प्रकारचा व्रणः—उपचार**—१--यादी नंबर १७३।१७१ १७२।१७६ चीं तेलें किंवा १८५।१८४।१८३ चीं मलमें यांचा उपयोग करावा. २-जुनें तूप लावावें. ३-कडुनिंबाचीं पानें पाण्यांत वाटून कल्क करून त्याचा लेप करावा. ह्मणजे व्रण भरून येतो. व्रण पिकण्यास पोटिस लावावें. ( यादी नंबर २१२ पहा. ) ४--कैशोर गुग्गूळ द्यावा. ( यादी नंबर १४७ पहा. )

**व्रण धुण्यास काढाः**—हरडेदळ, बेहडेदळ, आंवळकटी, कुंभ्याची साल, कडुनिंबाची साल किंवा पानें, हीं प्रत्येकीं समभाग घेऊन थोडीं थोडीं कुटून एकंदर औषधांचे १६ पट पाणी घालून अष्टमांश काढा करून व्रण धुवावे आणि मग औषध लावावें. वरील औषधें सर्व न मिळाल्यास मिळतील तितकींच घ्यावीं.

**व्रणांतील कृमि मारण्यासः**—आष्टाचे झाडाचा चीक लावावा.

**पथ्यः**—साटक्यासाळी, गहूं, यव, मसुरा, तुरी, मूग, साखर, तूप, पडवळ, कोंवळें वांगें, इत्यादि.

**अपथ्यः**—रुक्ष, आंबट, वातूळ, शीतळ, मीठ, स्त्रीसंग, मोठ्यानें बोलणें, जागरण, दिवसास झोंप इ०

## शिबें.

हा एक त्वचेचा रोग आहे. तो बहुधा मलीनपणापासून उत्पन्न होतो. हा रोग बहुतकरून छातीवर आणि मानेसभोंवतीं पसरतो. ह्या रोगानें प्रथम त्वचेवर किंचित् तांबड्या रंगाचे डाग उत्पन्न होतात व मग ते लवकर वाढतात. ह्यांस थोडथोडी खाज असून ते उचललेले व खरखरीत असे असतात, आणि त्यांच्या कडा पांढरवट असतात.

**उपचारः**—१--मुळ्याचें बीं आघाड्याच्या पाल्याच्या रसांत वाटून लेप करावा. २—केळीचा खार आणि हळद यांचा लेप करावा. ३--हरताळ व गंधक समभाग, आणि बांवची ३ भाग हीं गोमूत्रांत वाटून लेप द्यावा. ४-गंधक रसायन ( यादी नंबर १२४ पहा. ) दुधांतून द्यावें, ह्मणजे रक्तशुद्धि होऊन हा विकार मोडेल. ५—आंवळकटी, राळ आणि जवखार हीं औषधें समभाग घेऊन कांजींत वाटून लेप करावा. ६-नवसागर लिंबाचे रसांत खलून लावावा.

## गळूं.

जेव्हा एखाद्या भागास सूज येऊन दाह होऊन ती आंत पिकते तेव्हां त्यास गळूं ह्मणतात. गळूं पिकल्यानंतर फुटून पू वाहून बरें होतें. शरिराच्या कोणत्याही भागांत गळूं होतें.

**उपचारः**—१ -गळूं पिकण्याकरितां आळशीचें, गव्हाचें, कांद्याचें, कडुलिंबाचे पानांचें पोटीस करून वर बांधावें ह्मणजे गळूं पिकून फुटतें. २ साजीखार व नवसागर अशीं सारखेप्रमाणांत घेऊन त्याची लुगदी करून गळवाचे तोंडावर बस-

ठावी: ह्मणजे फार लवकर गळूं पिकून फुटतें. ३-शेंदुराचें मलम लावावें. हे अगदीं साधें परंतु फार गुणकारी व अनुभवी औषध आहे. या मलमानें गळूं पिकतें व फुटून आणा-भरून येईपर्यंत पटी लावावी. कृती—साधा शेंदूर १ तोळा, खोबरेल २ तोळे मेण मेण ½ तोळा अशीं तीन औषधें घेऊन तांब्याचे कल्ह्याचे कढईत पहिल्यानें तेल व मेण अशीं घालून पातळ होईपर्यंत कढवावें, नंतर शेंदूर घालून काठीनें ढवळीत राहावें, शेंदूर काळा पडून चांगले ३।४ कढ आले कीं उतरावें. ह्मणजे मलम होईल. हें मलम फडक्याचे एका बाजूस लावून ती पटी लावावी. पू वाहत असतांना ही पटी लावावी, परंतु साबणानें साफ धुऊन पुन्हा पटी लावावी. मलम तयार झालेवर थोडें टरपेंन तेल घालून डबींत भरावें.

## खाकमांजरी

खाकेमध्यें गळूं होतें त्यास खाकमांजरी ह्मणतात.

**उपचार:**—१--सुरवातीस गुळाचें पाणी जाड झालेल्या भागास लावून वर बिबा (तेल) घालावा व वर चुना सारवावा. २--मोहरी आणि कांचेची भुकी पाण्यामध्यें एकत्र वांटून ती खाकमांजरीवर बसविल्यानें खाकमांजरी पिकून फुटते.

## शूल ( पोट दुखणें )

सर्व प्रकारच्या शूलांमध्यें वायु प्रबळ असतो. शूळाचे आठ प्रकार आहेत, यांपैकीं मुख्य सांगतों.

**वातशूल याचें कारण** व लक्षण:--वायूचा प्रकोप करणारे रुक्षादि पदार्थ यांचें सेवन, अति मैथून, फार चालणें, अत्यंत जागरण, थंड पाणी पुष्कळ पिणें, वाटाणे, लाख, मूग इत्यादि वातूळ पदार्थांचें अति सेवन, जेवणावर जेवण, मोड आलेल्या धान्याचें अन्न ( उसळ ) खाणें, मल मूत्र आणि शुक्र यांचा रोध, उपवास, फार बोलणें, इत्यादि कारणांनीं वायूचा कोप होऊन हृदय पार्श्व बस्ति कंबरेच्या संधी व पाठ, या ठिकाणीं शूल उत्पन्न होतो, आणि आहार जिरल्यावर प्रदोषकाळीं व शीत पदार्थांचे सेवनानें फार होतो, व अंगाचा घाम काढिल्यानें, तेलानें मर्दन केल्यानें व स्निग्ध भोजनानें शांत होतो तो वातशूल जाणावा.

**उपचार:**—१--सुंठ पिंपळी इंद्रजव सैंधव निशोत्तर व हरडेदळ समभाग घेऊन त्यांचें वस्त्रगाळ चूर्ण करावें, आणि त्यांतील ५।६ मासे चूर्ण, आल्याचा रस ६ मासे आणि खडीसाखर ६ मासे एकत्र करून त्यांतून द्यावें, किंवा हें चूर्ण ऊन पाण्यांतून अथवा गुळांतून द्यावें. यापासून कदाचित १।२ रेच होतील. २—उष्णोदकांतून एरंडेल द्यावें ३- यादी नंबर ६५ चा काढा द्यावा ४--सुंठ सैंधव सागरगोट्यांचें बीज आणि भाजलेला हिंग हीं औषधें समभाग घेऊन त्याचें वस्त्रगाळ चूर्ण करून ३ मासे चूर्ण ऊन पाण्यांतून द्यावें. ५ -हिंग्वादिचूर्ण द्यावें. ( यादी नंबर ८६ पहा ).

**पित्तशूल यांचें कारण व लक्षण**—पित्त प्रकोप करणारे तीक्ष्ण व उष्ण पदार्थ वाटाणे, तेल, हुलग्यांचें कळण, तिखट आणि आंबट पदार्थ हे खाल्यानें पित्ताचा प्रकोप होऊन नाभीचे ठायीं शूल उत्पन्न होतो, व तृषा, मोह, दाह होऊन, दोन प्रहरीं, मध्यरात्रीं, अन्नाच्या विदाह काळीं आणि शरत्काळीं अधिक होतो, व शीतकाळीं आणि शीत पदार्थांचे सेवनानें शांत होतो, तो पित्तशूल जाणावा.

**उपचारः**—१--पहिल्यानें वमन होण्याचें औषध द्यावें, अगर रेचक द्यावें. २--कागदीं लिंबू चिरून त्याच्या एका भागांत डिकेमाली भरून दुसऱ्या भागाचा रस त्या डिकेमालीवर पिळून डिकेमालीचा भाग निखाऱ्यावर ठेवावा, आणि कढ आला ह्मणजे तो चुफून खावा. ३--यादी नंबर ६६ चा काढा घ्यावा. ४--शतावरीच्या मुळ्यांचा अंगरस मध घालून घ्यावा.

**कफशूल कारण** व लक्षणः--ताक, दहीं, तूप, लोणी, उंसाचा रस, पिष्टान्न, खिचडी, तीळ इत्यादि कफकारक पदार्थांचे सेवनानें कफाचा कोप होऊन, आमाशयांत शूल उत्पन्न होतो, व मळमळ खोकला अरुचि तोंडाला पाणी सुटणें बद्धकोष्ट मस्तकास जडपणा इत्यादि विकार होतात, जेवण होतांच अति पीडा होते व सूर्योदयीं आणि शिशिर ऋतूंत अधिक होतो तो कफशूल जाणावा.

**उपचारः**—१--यादी नंबर ६७ चा काढा द्यावा. २--बाळहरडे, चित्रक व कटुकी यांचें चूर्ण ऊन पाण्याबरोबर द्यावें ३--सैंधव, बीडलोण, बांगडखार, हिंग, पिंपळी, पिंपळमूळ, चवक, चित्रक व सुंठ यांचें चूर्ण ऊन पाण्याबरोबर घ्यावें. ४--महाळुंगाचा रस गूळ घालून घ्यावा.

**आमशूल लक्षणः**—पोटांत गुरगुर शब्द, व ओकारीचे उमासे, शरिरास निश्चलपणा, तोंडाला लाळ, इत्यादि लक्षणें असून कफाचीं लक्षणें ज्यांत असतात तो आमशूल जाणावा.

**उपचारः**—१--यादी नंबर ३८ चा काढा घ्यावा. २--ओंवा, सैंधव, बाळहरडे व सुंठ यांचें चूर्ण ऊन पाण्याबरोबर घ्यावें ३--त्रिविक्रम रस द्यावा (यादी नं. १२८ पहा.)

**परिणामशूल**—भोजन जिरत असतां जो शूल होतो, त्यास परिणामशूल ह्मणतात. वरतीं वातादि दोषेंकरून जो ८ प्रकारचा शूल सांगितलेला आहे, त्याच दोषेंकरून हा परिणामशूल आठ प्रकारचा जाणावा.

**उपचारः**—१--यावर प्रथम लंघन करावें व रेचक द्यावें. २--(यादी नंबर १११।१४१।८६।१०० यांपैकीं एकादें औषध द्यावें.) सुंठ व तीळ समभाग घेऊन त्यांचे दुप्पट गूळ घालून कल्क करावा आणि तो गाईचे दुधांतून द्यावा. (दूध कल्काचे चौपट द्यावें) ३--चिंचेच्या झाडाचे सालींचें भस्म ऊन पाण्याबरोबर द्यावें. ४--भुईलरवडाचे मुळांचें चूर्ण ऊन पाण्याबरोबर द्यावें. ५--शंखभस्म द्यावें. (यादी

नंबर ११५ पहा.) ६--भाजलेला सागरगोटा, लसूण, सैंधव, व हिंग, यांचें चूर्ण घेऊन वर ऊन पाणी घोटभर द्यावें.

**सर्व प्रकारचे शूलांवर उपचार:**—१--शंखवटी द्यावी. (यादी नंबर १४१ पहा.) नाराचरस द्यावा. (यादी नंबर ८५ पहा.) किंवा हरडेदळ, निशोत्तर, इंद्रजव, सैंधव, सुंठ व पादेलोण, समभाग घेऊन त्यांचें वस्त्रगाळ चूर्ण करून ऊन पाण्याबरोबर किंवा आल्याचे रसाबरोबर द्यावें. २–(यादी नंबर ११९ चें औषध द्यावें.) किंवा घोड्याची लीद पाण्यांत कालवून तें पाणी गाळून घेऊन त्यांत भाजलेले हिंगाचें चूर्ण घालून द्यावें, ह्मणजे शूल लौकर बसेल. ३–पोट दुखण्याचे पूर्वी किंवा दुखूं लागलें ह्मणजे २।३ गुंजा पापडखार लिंबाचे रसांतून अगर पाण्यांतून द्यावा ह्मणजे कळ बंद होते. ४--हिंगादिचूर्ण द्यावें (यादी नंबर ८६ पहा.) किंवा यादी नंबर १०२।९५ यांपैकीं एकादें चूर्ण द्यावें. ५--वज्रक्षार द्यावा. (यादी नंबर १३९ पहा.) कुमारीआसव द्यावें. (यादी नंबर १७८ पहा.) अग्निकुमार द्यावा. (यादी नंबर ११८ पहा.)

**विशेष सूचना**—पोटशूळ हा रोग एकदां जडला ह्मणजे तो बहुतकरून जात नाहीं असें पुष्कळांचे अनुभवास येतें. याकरितां उत्पन्न झाल्याबरोबर याची हयगय न करितां औषध घ्यावें आणि पथ्य करावें; ह्मणजे तो जाईल. १०।१२ वर्षे हा रोग ज्यांस जडला आहे त्यांचासुद्धां, अगदीं गेला नाहीं तरी पुष्कळ कमी होईल. पथ्य मात्र फार चांगलें केलें पाहिजे. फार शूल ज्यांस आहे, ते ८।१५ दिवसांतसुद्धां पाणी पीत नाहींत, व ताक खात नाहींत. दूधभात जेऊन तहान लागली तर दूधच पिऊन सायंकाळीं भात न खातां भाकरी किंवा गव्हाची पोळी खातात, ह्मणजे या पथ्यानेंच गूण येतो. पापडखार वर लिहिल्याप्रमाणें घेतल्यानें त्या वेळेस शूल बसतो, परंतु पापडखारापासून धातुस्थानीं कडकी बसते. याजकरितां तो बेताबातानें घ्यावा, व तूप जास्त खावें. शूल उत्पन्न होतांच सोडा ३--६ मासेपर्यंत पाण्यांतून घेतला असतां त्या वेळेस शूल बसतो. पोटशूळ हा हवेचा बदल झाल्यानें कितीएकांचा नाहींसा होतो, याकरितां सवड असेल त्यानें हा उपाय करावा.

कितीएकांस वऱ्यांची भाकरी दुधाशीं खाल्यानेंही गूण येतो. एकंदरींत औषधापेक्षां वर लिहिलेल्या खाण्यापिण्याच्या तडजोडीनें पुष्कळांस फायदा होतो.

**पथ्य:**--गव्हांची चपाती, तुपांत तळलेल्या गव्हांच्या पुऱ्या, सांजा, साखर, तूप हे पदार्थ खाल्यानें पोट दुखावयाचें नाहीं. मात्र या पदार्थांशिवाय पाणी किंवा दुसरा कोणताही पदार्थ खाऊं नये. असें ८।४ दिवस केल्यावर दूधभात, तूपभात, दुधाची खीर; तांदुळाची भाकरी तुरीचें वरण यांपैकीं पाहिजे ते पदार्थ खावे. याप्रमाणें एक दोन महिने गेल्यावर थोडथोडें पथ्य सोडित जावें. मात्र सदोदीत पाणी ताक

दहीं, केळें वगैरे थंड व वातकर पदार्थ अगदीं वर्ज केले पाहिजेत. निदान अगदीं कमी प्रमाणानें तरी खाल्ले पाहिजेत. पाण्याचे ऐवजीं दूध प्यावें. शिवाय वांति, घाम, लंघन, निद्रा, शेवगा, क्षार, चाकवत, लसूण, हिंग, एरंडेल, इत्यादि पदार्थ पथ्यकर आहेत.

**अपथ्यः**—जागरण, मैथुन, वाल, वाटाणे, मूग, शोक, क्रोध, तिखटपदार्थ, थंडपदार्थ, इत्यादि.

## शोथ ( सुज )

**उपचारः**—१-पुनर्नवा, देवदार, सुंठ, कडुनिंबाची साल व शेवग्याची साल हीं औषधें समभाग घेऊन कांजींत वाटून सुजेवर लेप करावा, ह्मणजे सर्व प्रकारची सूज दूर होते. २-खारकेची बी, हस्तिदंत, गुग्गुळ व सुंठ, हीं पाण्यांत उगाळून लेप द्यावा आणि शेकावें. ३-रुईच्या पानांस तुपाचा हात लावून थोडीं शेकून त्या पानांनीं शेकावें. ४-.कडुनिंबाच्या पाल्याचा वाफारा घ्यावा. **वाफारा घेण्याचा प्रकार**-एका भांड्यांत पाण्यास उकळी येईपर्यंत पाणी तापवून त्यांत कडुनिंबाचा पाला टाकावा, आणि सूज आलेल्या माणसास पांघरूण घेऊन खाटेवर बसवावें आणि तें भांडें खाटेखालीं ठेवून वाफ घ्यावी. चांगला घाम आला ह्मणजे भांडें काढून टाकावें आणि घाम पुसून टाकून अंगांत गरम कपडा घालावा, अगर भाटशेणींची राख अंगास लावावी, ह्मणजे अंगांत वारा शिरणार नाहीं. हा वाफारा रात्रीं निजतांना घ्यावा. ५—पाचेच्या पाल्याचा रस, पाषाणभेदाची पूड, आणि माणसाचें दूध, समभागानें एकत्र करून कढवून लेप द्यावा. ६—दिंड्याचा पाला कुटून सुजलेल्या भागावर बांधावा याप्रमाणें दिवसांतून २।३ वेळां करावें. ७—यादी नं. २२८ चें औषध करावें.

**सुज फुटल्यास**—१ आईनाच्या झाडाच्या सालीचा व काळ्या तुळशीचा रस काढून एकत्र करून त्यांत तांदुळाचा कोंडा घालून आंबील करून ती सुजेवर लावावी. २—पिंपळाचे सालींची राख करून ती सुजेवर टाकीत असावें.

**सुचना**—" नाळगूद " या प्रकरणांत दातीवरीचे पाल्याचे औषध लिहिलें आहे तें द्यावें. सूज निघण्यास तें फार चांगलें आहे. त्या प्रकरणांतील इतर औषधांचाहि उपयोग करण्यास हरकत नाहीं.

## श्वास ( दमा )

वायु कफयुक्त होऊन प्राणान्नोदकवह स्रोतसांचा मार्ग रोध करून चोहोंकडे जातो, तेव्हां तो श्वास उत्पन्न करितो. याचें पूर्व स्वरूप असें कीं हृदयास पीडा, शूळ, पोट फुगणें, पोट ताणल्यासारिखें होणें, तोंड बेचव, आणि शंखाचे ठायीं टोंचल्यासारिखी पीडा हीं लक्षणें होतात. साधारण दमा वायुनळीच्या संकोचनानें होतो.

**याचे प्रकार पांच आहेत तेः**—१ महानश्वास, २ ऊर्ध्व श्वास, ३ छिन्नश्वास, ४ तमकश्वास, ५ क्षुद्रश्वास.

**महान् श्वास लक्षणः**—वायुनें शब्दयुक्त मोठा ऊर्ध्व श्वास, दृष्टि चंचल, ज्ञान नष्ट होणें, ग्लानि, तोंडावाटे शब्द करण्याविषयीं सामर्थ्य नसणें, डोळे व तोंड वासणें, श्वास दुरून ऐकूं येणें इत्यादि. हा असाध्य आहे.

**ऊपचारः**—१-भारंगीचें मूळ व सुंठ यांचें चूर्ण आल्याचे रसांतून द्यावें. २-यादी नंबर ५७ चा काढा द्यावा. ३-कुहिलीच्या बियांचें चूर्ण मध व तूप यांबरोबर द्यावें.

**ऊर्ध्व श्वास लक्षणः**—वायूनें दीर्घ ऊर्ध्व श्वास, ऊर्ध्व व चंचल दृष्टि, तोंडाला कोरड, तोंड आणि दुसरे मार्ग कफानें दाटणें, इत्यादि.

**उपचारः**—१-यादी नंबर ५७ चा काढा द्यावा. २-सुंठ व पिंपळी यांचें चूर्ण ऊन पाण्याशीं द्यावें. ३-आल्याचा रस मध घालून द्यावा. ४-वावडिंग, पिंपळी, हिंग, ओंवा, सैंधव, सुंठ आणि रास्ना, यांचें समभाग चूर्ण करून तुपाबरोबर घ्यावें, ह्मणजे कफ व श्वास यांचा नाश होईल.

**छिन्न श्वास लक्षणः**—राहून राहून जेवढी शक्ति आहे तेवढ्या शक्तीनें श्वास टाकणें, पोट फुगणें, घाम, मूर्छा, बास्ति जळल्यासारिखा होणें, डोळे गरगरां फिरविणें किंवा डोळ्यांत आसवें येणें, तोंडास कोरड, वर्ण बदलणें इत्यादि.

**उपचारः**—या प्रकरणांत पुढें सर्व प्रकारचे श्वासांवर उपचार सांगितले आहेत ते, व तमक श्वासावरचे उपचार करावे.

**तमक श्वास लक्षणः**—वायूचा कोप होऊन मान व मस्तक यांचें आकर्षण करून तो वायु कफयुक्त होऊन, त्यापासून अति तीव्र वेगेंकरून ऊर्ध्वश्वास होतो, आणि कंठामध्यें घुरघुर असा शब्द, व पडसें, तोंडाला कोरड, व पार्श्वादिकांचे ठायीं वेदना, व तोंडांतून कफ पडतेवेळेस बहुत दुःख होणें, कफ पडत असतां कांहीं वेळ बरें वाटणें, निजलें असतां श्वास फार उचलणें, बसलें असतां सुख वाटणें, इत्यादि लक्षणें होतात. हा कष्टसाध्य आहे.

**उपचारः**—१-रिंगणी, जिरें व आंवळकटी, या तीन औषधांचें चूर्ण करून मधांतून द्यावें. पिंपळीचा पाक द्यावा. (यादी नं. १५९ पहा.) २-रिंगणी व बाळहरडे प्रत्येकीं १०० तोळे घेऊन १०२४ तोळे पाण्यांत घालून काढा करावा, आणि चवथा हिस्सा राहिल्यावर गाळून त्यांत ४०० तोळे गूळ घालून पुनः ते शिजलेले हरडे त्यांत घालून पक्व करावे, आणि मग थंड झाल्यावर मध २४ तोळे, सुंठ मिरी पिंपळी हीं प्रत्येकीं ४ तोळे, दालचिनी तमालपत्र नागकेशर आणि वेलदोडे प्रत्येकीं १ तोळा, असे जिन्नस घालून लेह करावा, आणि तो द्यावा; ह्मणजे कफ विकार, श्वास, शोष, कास, अपस्मार, इ. रोग नाहींसे होतात.

**क्षुद्र श्वासः**—वायूचा अत्यंत कोप होऊन त्यापासून जो ऊर्ध्वश्वास होतो, व ज्यापासून शरीरास फार पीडा होत नाहीं, तो क्षुद्रश्वास जाणावा. हा साध्य आहे.

हा रूक्ष पदार्थ आणि आयास यांपासून उत्पन्न होतो. हा भोजनपानादिकांची योग्य गति बंद करीत नाहीं.

**उपचारः**—१--आल्याचा रस मध घालून द्यावा. २--" सर्व प्रकारचे श्वासांवर उपचार" या सदरांतील नंबर १ चें औषध द्यावें. ३--यादी नंबर १६ चा काढा एरंड-मुळांचें चूर्ण घालून द्यावा, ह्मणजे श्वास, कास आणि पार्श्वशूल हे नाहींसे होतात.

**सर्व प्रकारचे श्वासांवर उपचारः**—१—बेहडेदळ शेळीचे मूत्रांत पचन करून तें सुकवावें, आणि चूर्ण करून मधाशीं द्यावें. यादी नंबर १५३।१३५।१४१ १४२।१३६ यांपैकीं एकादें औषध द्यावें. २--मनुका, बाळहरडे, नागरमोथे, कांकड-शिंगी व धमासा, याचें चूर्ण मध व तूप यांतून द्यावें. ३-आष्टाचे झाडाचे चिकांत मिऱ्यें व हळद याचें चूर्ण घालून प्रत्येक वेळेस २ गुंजांप्रमाणें द्यावें, ह्मणजे वांति होऊन कफ पडतो. उतार—तूपभात. ४—रुईचीं पानें, आंबट दहीं व मीठ समभाग घेऊन पानांस दहीं फांसून वर मीठ घालावें, व मातीचे खापरांत थराथरानें तीं पानें लावून वर दुसरें खापर घालून संधिलेप करून गजपूट द्यावें. नंतर मडक्यांतील औषध काढून खल करून ठेवावें, आणि प्रत्येक वेळेस ४ गुंजा औषध, मध व खडीसाखर, किंवा आलें आणि खडीसाखर, यांतून द्यावें. हें दिवसातून दोन वेळां घ्यावें. पित्तश्वासा-शिवाय इतर प्रकारचे श्वासांवर याचा चागला गुण येतो. पोटिसानें शेकावें. यादी नंबर २१२ पहा. ५--कणीक निगडुंगाच्या चिकांत भिजवून सुकवावी, याप्रमाणें दोन पुटें देऊन, मग पाणी घालून त्याचा गोळा करावा आणि सभोंवार एरंडाचीं पानें लावून सुतानें बांधून सभोंवार शेण लावून गोंवऱ्यांमध्यें तो गोळा चांगला भाजावा. मग तो गोळा बाहेर काढून खलून ठेवावा, आणि त्यापैकीं प्रत्येक वेळेस २।३ मासे, अगर सोसेल त्या मानानें घेऊन त्यांत १ मासा मध घालून द्यावें. किंवा रुईचे चिकात कणीक तिंब-वावी, मग त्याचा रोडगा करून गोंवऱ्यात भाजून तें खलून ठेवावें, आणि त्यापैकीं प्रत्येक वेळेस १।२ मासे घेऊन शेळीच्या २-२॥ तोळे मूत्रातून द्यावें किंवा रुईच्या मुळांची राख ४ तोळे व मिऱ्याचें वस्त्रगाळ चूर्ण १ तोळा एकत्र करून त्यापैकीं १ मासा मिश्रण विड्याचे पानांतून खात जावें. ६—त्रिफळा ३ भाग आणि टांकणखार १ भाग नागवेलीच्या रसांत घोंटून गुंजेएवढ्या गोळ्या कराव्या आणि योग्य अनुपानांतून प्रत्येक वेळेस १ गोळी द्यावी. ७—लवंग, मिरीं आणि त्रिफळा समभाग एकत्र करून त्यांचें वस्त्रगाळ चूर्ण करून तें बाभळीच्या सालीचे काढ्यांत खलून एकेक गोळी ४।५ गुंजांची करून प्रत्येक वेळेस एक गोळी योग्य अनुपानांतून द्यावी, ह्मणजे श्वास व कफ यांचा नाश होतो. ८—श्वासकुठार द्यावा. (यादी नंबर १४२ पहा.) समीरपन्नग द्यावा. पंचामृतपर्पटी (यादी नंबर १३०) सूतशेखर (यादी नंबर १४४) हेमगर्भ (यादी नंबर १४६) यांपैकीं एकादें औषध योग्य अनुपानांतून द्यावें. ९—यादी नंबर १६ किंवा ५७ चा काढा द्यावा. १०--सुंठ, बेहडेदळ, भारंगमूळ, अडुळसा, जेष्टमध व नागर-

मोथे यांचा काढा द्यावा. ११—गांजाची राख मधांतून द्यावी, किंवा जवखार मधांतून द्यावा. १२–कुमारीआसव द्यावें. (यादी नंबर १७८ पहा.) १३--बुब्बुल्यारिष्ट द्यावें. (यादी नंबर १७९ पहा.) १४–कासकेसरी द्यावा. (यादी नंबर १४३ पहा.) १५–प्रतापलंकेश्वर द्यावा. (यादी नंबर १३१ पहा.)

**साध्यासाध्य विचारः**—बलवान पुरुषाचे सर्व श्वास अव्यक्त लक्षण झालें असतां साध्य होतात. क्षुद्रश्वास अत्यंत साध्य आहे. (कोणी तमकाला क्षुद्रश्वास ह्मणतात,) महान, उर्ध्व आणि छिन्न हे श्वास संपूर्ण लक्षणें झालीं असतां असाध्य आहेत.

**पथ्य**—विरेचन, स्वेदन, धूम्रपान, वांति, दिवा निद्रा, जुन्या साटक्या साळी, कुळीथ, गहूं, यव, शेळीचें जुनें तूप, दूध, मध, मद्य, पडवळ, वांगें, लसूण, तोंडलें, तांदुळजा, द्राक्षें, ऊष्णोदक, त्रिकटु, गोमूत्र, इत्यादि

**अपथ्य**—रक्त काढणें, पूर्वेचा वायु, शेळीचें दूध, कंद, मोहऱ्या, रुक्ष व जड अन्न आणि पान, इत्यादि.

**वि० सू०**—कफविकार विशेष वाटल्यास रेचक (यादी नं. ८५ किंवा १२०) किंवा वांतीचें (यादी नं. २२० पहा.) औषध द्यावें, ह्मणजे कफ पडून मनुष्य मोकळा होतो व दुसरें औषध लवकर लागू पडतें.

## संग्रहणी.

**संग्रहणीचें स्थान–व संप्राप्ति**—पक्काशय आणि आमाशय यांच्यामध्यें पित्तास धारण करणारी जी कला असते ती अन्नाचें ग्रहण करिते, ह्मणून तिला ग्रहणी (संग्रहणी) असें ह्मणतात अतिसार गेला असतां मंदाग्नि व अपक्क अन्न भक्षण करणाऱ्या पुरुषाचा अग्नि पुन्हां दुष्ट होऊन ग्रहणीला दूषित करितो, किंवा अतिसार झाला नसला तरी स्वकारणांनींहि ग्रहणी दूषित होते. ग्रहणी दुष्ट झाली ह्मणजे अन्नाचें चांगलें पचन होत नाहीं व वारंवार आममिश्रित मळ पडतो. हा रोग बहुतकरून मुलांस होतो.

**ग्रहणीचें सामान्य लक्षणः**—अत्यंत दुष्ट झालेल्या पृथक् पृथक् दोषांनीं ग्रहणी दुष्ट झाली ह्मणजे खाल्लेलें अन्न अपक्क किंवा पक्क पडणें, व त्यावेळीं मुरडा होणें, व मळाला अत्यंत दुर्गंधी येणें, वायूनें मळ वारंवार घट्ट होणें, व पित्तानें पातळ होणें, (चोथा पाणी व भस्रा होतो.) इत्यादि.

**ग्रहणीचें पूर्वरूप**--तृषा, आळस, बलनाश, अन्नाचा विदाह (पाककाळीं जळती लागणें), अन्नाचा पाक उशिरानें होणें, शरीराला जडपणा येणें, इत्यादि.

**वातिक ग्रहणीचें कारण व लक्षणः**—तिखट, कडू, तुरट, अत्यंत रुक्ष आणि संयोगादि विरुद्ध अशा भोजनानें, व अत्यंत अल्प भोजन, उपास, अतिमार्गगमन, मळमूत्रादि वेगाचें धारण आणि अत्यंत मैथून या कारणांनीं वायु कुपित होऊन अनेक

विकार करितो, रोग्याचें अन्न मोठ्या दुःखानें पचतें, त्याचा पाक आंबट होतो, अंगाला खरखरीतपणा येतो, गळा व तोंड कोरडीं पडतात, तहान व भूक लागते, दृष्टीला मांद्य येतें, कानामध्यें शब्द होतो, बरगड्या, मांड्या, आडसंधि आणि मान हीं दुखतात व हृदयांत पीडा, शरीर कृश होणें, शक्ति नाहींशी होणें, अरुचि, गुदाचे ठिकाणीं कापल्यासारखी पीडा, सर्व मधुरादि रस खाण्याची इच्छा, पोट फुगणें, शब्दयुक्त फेणासहित वारंवार मळ पडणें इत्यादि विकार होणें.

**उपचारः**—१–आंबट ताक सैंधव घालून किंवा सुंठीचें चूर्ण घालून द्यावें. २--यादी नंबर ४९ किंवा ५० चा काढा द्यावा. सुंठीच्या कल्कांत तूप घालून अग्नीवर सिद्ध करून द्यावें; तें तूप वायूचें अनुलोमन करितें व संग्रहणी, प्लीहा, कास व ज्वर यांचा नाश करितें.

**पित्तग्रहणीचें कारणः**—तिखट, अजीर्ण, व विदाह करणारे पदार्थ खाणें .

**पित्तग्रहणीचें लक्षणः**—शरिराचा रंग पिंवळा, अपक्व निळया व पिंवळ्या रंगाचा मळ पडणें, धुरकट ढेंकर येणें, उरांत आणि गळ्यांत जळती लागणें, अन्नद्वेष, तृषा इत्यादि.

**उपचारः**—१–गोडताक साखर घालून द्यावें. २--यादी नंबर ४९ किंवा ५० चा काढा द्यावा. ३--कोंवळ्या बेलफळाच्या कल्कांत सुंठीचें चूर्ण व गूळ घालून तो द्यावा. पथ्य—ताकभात. ४–रसांजन, अतिविष, इंद्रजव, कुड्याची साल, सुंठ व धायटीचें फूल, ह्यांचें चूर्ण तांदुळांचे धुणांत मध घालून त्यांतून द्यावें.

**कफग्रहणीचें कारणः**--जड, अति स्निग्ध व थंड इत्यादि पदार्थ. [illegible]न, जेवतांच झोंप घेणें इत्यादि.

**कफग्रहणीचें लक्षणः**—अन्न कष्टानें पचणें, हृदय लसलसणें, वांति, अरुचि, तोंड कफानें सारविल्यासारखें व गोड होणें, खोकला, कफ, पडणें, पडसें, हृदय पाण्यानें भरल्यासारखें होणें, मधुर ढेंकर, अग्निमांद्य, पातळ आमयुक्त कफानें मिश्रित आणि जड असा मळ होणें इत्यादि.

**उपचारः**—१--यादी नंबर ४९ किंवा ५० चा काढा द्यावा. २–सुंठ, मिरीं, पिंपळी व यवखार, यांचें समभाग चूर्ण ताकांत घालून तें ताक द्यावें.

**त्रिदोष ग्रहणीचें लक्षणः**—वातादिकांचीं निरनिराळीं कारणें व लक्षणें झालीं असतां त्रिदोष ग्रहणी समजावी.

**उपचारः**—१--यादी नंबर ४९ किंवा ५० चा काढा द्यावा. २--दशमुळें ( यादी नंबर १६ पहा. ) आणि सुंठ यांचा काढा द्यावा.

**आमसंग्रहणी**—ही आमवायूपासून होते आणि ही झाली म्हणजे आठ चार दिवसांनीं किंवा रोज आंव पडते.

**उपचारः**—१--आमातिसारावरील उपचार करावे. ( अतिसार प्रकरण पहा. )

२–यादी नंबर ४९ किंवा ५० चा काढा द्यावा. ३-शंखभस्म व सैंधव समभाग घेऊन त्यांचें १ मासा मिश्रण मधाशीं द्यावें. ४-मसुरांच्या काढ्यांत बेलफळाचा मगज शिजवावा आणि तो द्यावा. ५-दशमुळें ( यादी नंबर १६ पहा. ) आणि सुंठ यांचा काढा द्यावा.

**सर्व प्रकारचे संग्रहणीवर उपचारः** - संग्रहणी रोग्याला अजीर्णावरचे उपचार करावे, लंघन दीपन आणि अतिसारावर उक्त असें औषध द्यावें. आमपचन करण्याची क्रिया ( औषध देणें ) करावी. सदोदित दीपन पदार्थ व तक्र खाण्याकडे विशेष लक्ष द्यावें. ताकांत हिंग, जिरें, व सैंधव घालून तें द्यावें. तक्र हें या रोगास फार पथ्यकर आहे. * २–हिरडेदळ १० तोळे, सुंठ, मिरीं, जिरें आणि सैंधव प्रत्येकीं एकेक तोळा, लवंग व लकडी रेवाचिनी प्रत्यकीं अर्धा तोळा, हिंग आणि अफू प्रत्येकीं पाव तोळा, येणेंप्रमाणें जिन्नस घेऊन थोडे कुटून गाईचें ताक पक्का एक शेर घेऊन मडक्यांत घालून त्यांत वरील जिन्नस टाकून मंदाग्नीनें पचन करावे. शिजवितांना मडक्यास पानांचा दादरा बांधावा. सुमारें ताक आटेपर्यंत शिजवावें. या प्रमाणें तीन दिवस नवें ताक घालून शिजवावें. नंतर बारीक वाटून आंवळ्याएवढ्या गोळ्या कराव्या आणि दररोज सकाळीं एक गोळी गाईचे दह्यांतून द्यावी. पथ्य गाईचें ताक व भात. ३ भांग दुधांत शिजवावी. नंतर पाण्यांत उकळून वाळवावी. आणि तिची बारीक पूड करून मधांतून द्यावी. ४-शुद्ध पारा १ तोळा, शुद्ध गंधक १ तोळा, हिंगूळ २ तोळे, आणि अफू २ तोळे घेऊन हे सर्व जिन्नस ह्माक्याचे रसांत घालून एकेक गुंजेच्या गोळ्या करून दररोज सकाळीं व संध्याकाळीं एकेक गोळी गाईचें तूप व मिरपूड यांतून द्यावी. ५-( यादी नं. ४९ किंवा ५० चा काढा द्यावा ) ६-गंधक रसायन द्यावें. ( यादी नं. १३४ पहा. ) ७-मंडूरभस्म, वावडिंगाची पूड आणि मध यांतून द्यावें. ( यादी नं. ११३ पहा. ) ८-कुडेपाक द्यावा. ( यादी नं. १९७ पहा ) ९ मरीच्यादि चूर्ण द्यावें. ( यादी नं ९९ पहा. ) १०-अग्निसूत द्यावा. ( यादी नं. ११९ पहा. ) ११-ग्रहणीकपाट हें औषध द्यावें. ( यादी नं. १२५ पहा. ) १२-प्रमदानंद रस द्यावा. ( यादी नं. १३३ पहा. ) १३-यादी नं. २२७ चें औधध द्यावें. १४-बेलफळादि चूर्ण अथवा दाडिमाष्टक चूर्ण ताकांतून द्यावें. १५-१ मुरुडशेंग २ मोचरस ३ अतिविष ४ कांकडशिंगी ५ सुंठ ६ जायफळ ७ भांग ८ अफू ९ बेलफळाचा गीर १० धायटीचीं फुलें ११ इंद्रजव १२ जायपत्री हीं सर्व औषधें समभाग मिश्र करून त्याच्या चिनी बोराएवढ्या गोळ्या कराव्या व रोज सकाळीं दोन गोळ्या घ्याव्या.

**पथ्य**— निद्रा, ओकारी, लंघन, जुन्यासाळी, मसुरा, मध, तुरी, मूग, गाईचें, शेळीचें किंवा मेंढीचें दूध, दहीं, लोणी काढलेलें ताक, चुना, केळफूल, संपूर्ण तुरट

---

* ताक चांगलें घुसळून लोणी काढून फडक्यावर गाळून घ्यावें.

पदार्थ, डाळिंब, जून केळें, बेलफळ, भांग, कंवठ, कुडा, जिरें, इत्यादि.

**अपथ्यः**—जागरण, उदकपान, स्नान, स्त्रीसंग, अंजन, घाम, धूम्रपान, श्रम, पावटे, वाटाणे, उडीद, यव, चवळ्या, कोहळा, पांढरा भोंपळा, तांबूल, ऊंस, आंबा, कांकडी, गुळ, नारळ, कंद, संपूर्ण पालेभाज्या, संपूर्ण सारक पदार्थ, जडान्न इत्यादि.

## स्त्रीरोग.

**प्रदरः**—विरुद्ध आहार, गर्भपात, अति मैथून, दिवसास निद्रा, संभोगाविषयीं आतूर असतां न मिळणें, फार उपवास इत्यादि कारणांनीं स्त्रियांचा आर्तव ह्मणजे विटाळ दुष्ट होऊन धुपणी लागते तिला प्रदर असें ह्मणतात. याचें पूर्वरूप अंग मोडणें, वेदना, दुर्बलपणा, ग्लानि, तृषा, दाह, डोळ्यांवर झांपड इत्यादि.

**याचे मुख्य प्रकार**—श्वेतप्रदर आणि रक्तप्रदर असे आहेत.

१—**श्वेतप्रदर (सोमरोग)** आमरस युक्त, बुळबुळीत, किंचित् पांढरा आणि कोंड्याच्या पाण्यासारिखा स्राव होतो तो.

**उपचारः**—१ गोपीचंदन १ तोळा व तुरटी ३ मासे एकत्र खलून मात कापड करून गजपूट द्यावें, ह्मणजे भस्म होतें. तें दर वेळेस १।२ गुंजा भस्म साखरेबरोबर सात दिवस द्यावें. पथ्य—दूधभात, तूप, गव्हांची पोळी व सांजा. मीठ खाऊं नये. २—लाजरीचा पाला आणि धावशीचीं फुलें समभाग घेऊन एकत्र वांटून सुपारीएवढी गोळी घेऊन त्यांत २-२॥ मासे मध घालून तें द्यावें. **पथ्य** दूधभात. ३—यादी नं. ७२ चा काढा द्यावा. ४—लोध्राचें चूर्ण केळीचे कांद्याचे रसांतून किंवा आल्याचे रसांतून द्यावें. ५—कांटेशेवरीचे कांड्यांचें चूर्ण साखरेंतून द्यावें. ६—आंवळकटीच्या बिया पाण्यांत वांटून त्यांत साखर व मध घालून तीन दिवस द्याव्या.

**रक्तप्रदरः**—रुक्ष आरक्तवर्ण, फेनयुक्त आणि थोडें थोडें असें योनीपासून रक्त स्रवतें, वातजन्य शूलादिक पीडा होतात आणि तें रक्त मांस धुतलेल्या पाण्यासारिखें असतें तो. पित्तजन्य विकार असल्यास पीतवर्ण, नीलवर्ण, व उष्ण असें रक्त स्रवतें व दाह होतो आणि धुपणीचा वेग फार असतो.

**उपचारः**—१ कुंभ्याचे सालीचा रस सुमारें एक तोळा काढून त्यांत २।३ मासे तूप घालून द्यावा. या रसांतून १।२ गुंजा प्रवाळ दिल्यास विशेष उपयोग होतो. हें तीन तीन तासानें द्यावें. हें औषध फार उत्तम आहे. कुंभ्याचे सालीचा अंगरस न येईल तर दूध घालून काढावा. वडाच्या पारंब्यांचा रस पारंबे दुधांत वांटून काढून खडीसाखर घालून द्यावा. २—“श्वेतप्रदरावरील उपचार” या सदरांतील १ नं. चें औषध द्यावें. ३—तांदुळजाच्या मुळ्या वांटून कल्क करून त्यांत मध व रसांजन मिळवून तो तांदुळाचे धुणांतून द्यावा. ४—नारळमाडाचे पोईचीं फुलें व जिरें तांदु-

ळांचे धुणांत वाटून तें द्यावें. हें फार चांगलें आहे. ५-खडीसाखर आणि जिरें समभाग घेऊन त्याचें चूर्ण तांदुळाचे धुणांतून द्यावें. काटे शेवरीचे सालीचें चूर्ण दुधांतून द्यावें. ६-कांटे शेवरीची साल व गोंदणीच्या बिया यांचें चूर्ण करून दुधांतून द्यावें. हें औषध १०।१२ दिवस द्यावें. पथ्यः—दूधभात तूप गव्हांची पोळी व सांजा. मीठ खाऊं नये. ७-कथल्यागोंद रात्रीं पाण्यांत भिजत घालून सकाळीं कोळून तें पाणी घेऊन त्यांत साखर घालून द्यावें. याप्रमाणें ७ दिवस करावें. ८-यादी नंबर ७२ चा काढा द्यावा. ९-दर्भाची मुळें तांदुळांचे धुणांत वांटून द्यावीं.

**कोणत्याहि प्रकारचे प्रदरावरः**—१-सागाचें बीं सुमारें १।२ तोळे अगर शक्तिमानानें घेऊन थंड पाण्यांत वाटून द्यावें. २-पिंपळाची साल ऊन पाण्यांत वांटून रस काढून त्यांत जिरें व खडीसाखर घालून तो द्यावा. ३ गुलखैराची चार पांच फुलें, एक तोळा खडी साखरेबरोबर वाटून द्यावीं. सात दिवसांनीं गुण येईल. ४-लकडी, रेवाचिनी, जेष्टमध, गोखरूं, लकड्या पाषाणभेद, धने, बाळहरडे, धमासा, शिलाजित, व शतावरी, हीं प्रत्येकीं एक एक तोळा घेऊन त्यांचा काढा करून मध घालून द्यावा. ५-एक तोळा दारूहळद घेऊन तिचा काढा करून त्यांत शिलाजित ३ मासे घालून द्यावा. याप्रमाणें ७ दिवस दिल्यानंतर निंबाच्या सालीच्या रसांत जिरें घालून तो रस सात दिवस द्यावा ह्मणजे प्रदर (धुपणी) तिडीक व ज्वर हे विकार दूर होतात. ६-यादी नंबर ७२ चा काढा द्यावा. ७-कोहाळेपाक द्यावा. (यादी नंबर १६३ पहा.) ८-जिरेपाक द्यावा. (यादी नंबर १५७ पहा.) ९-कामदुधा द्यावी. (यादी नंबर १२१ पहा.) १०-प्रदरराज चिंतामणी द्यावा (यादी नंबर १३२ पहा.) ११ गोक्षुरादि गुग्गुळ द्यावा. (यादी नं. १४८ पहा.)

## गर्भारपण.

**गर्भधारणेचें लक्षणः**—मासिक विटाळ येण्याचे पूर्वीं किंवा विटाळ येऊन गेल्यावर लगेच गर्भधारणा होते. क्वचित एकदां बाळंत जाहलेवर पुन्हा विटाळ येण्याचे पूर्वीं स्त्री गरोदर राहते. वांती किंवा ओकारी हें गर्भधारणेचें एक सामान्य लक्षण आहे. गर्भारपणाचे ४।६ आठवडे झाल्यावर वांतीस सुरवात होते व ती ४।५ महिनेपर्यंत राहते. दुसऱ्या किंवा तिसऱ्या महिन्यापासून स्तन वृद्धि पावतात. जसजसे दिवस जातील तसतसा स्तनाचा अग्रभाग जास्ती मोठा व काळा होत जातो. ४ महिन्यापासून गर्भाशय बस्तींतून पोटांत येतो. पांचवे महिन्यांत बस्तीचेवर आणि नाभीचे खालीं अशा मधल्या अंतरांत असतो, सहाव्या महिन्यांत नाभीपर्यंत, सातव्या महिन्यांत नाभीचेवर, ८ व्या महिन्यांत काळजाजवळ व ९ व्या महिन्यांत काळजाजवळ आऊन खालीं उतरतो.

**गर्भारपणाची मुदत**:—गर्भ ९ महिने पोटांत राहून जन्मतो ही गोष्ट सर्वांस माहीत आहे. सर्वसाधारणपणें कमीत कमी २७३ व जास्तींत जस्त २८० दिवसांनी गर्भ जन्मतो.

**गर्भारपणाचीं औषधें**:—सर्वसाधारण औषधें देण्याची जरूर नाहीं. अन्न साधें परंतु भरपूर असावें. अतिशय खारट, तिखट, तेलकट खाऊं नये. आईचे रक्तापासून गर्भाचें पोषण होत असतें हें ध्यानांत ठेवून वागणें जरूर आहे. मोठ्या श्रमाचीं कामें करूं नयेत परंतु नित्यनैमित्तिक कामें असतील तीं करण्याची वहिवाट ठेवावी. गर्भारपणीं कांहीं कमजास्त लक्षणाची वाढ जाहली असेल ती बाळंत झालेवर आपोआप दूर होते. आंगांत गरम कपडे असावेत परंतु ते तंग असूं नयेत. सुखप्रसूतीकारितां ८ वे महिन्यांनंतर १५ दिवशी एरंडेल घेत जावें.

**गर्भिणीचा रक्तस्राव**:—गर्भ राहिल्यानंतर उष्ण व तिखट पदार्थांचे सेवनानें उष्णता होऊन योनीपासून रक्तस्राव होतो, व त्यामुळें गर्भ वाढत नाहीं, आणि आपला वाढण्याचा काळ टाकून दुसरे काळाची अपेक्षा करितो व थोडा हालतो.

**उपचार**:—रक्त प्रदरावरील नंबर १ चें औषध द्यावें. खडीसाखर कमळ आणि नागकेशर यांचा काढा तूप व मध घालून द्यावा. २—शिंगाडे व कशरा यांची लापशी द्यावी. ३—धने, नागरमोथे, वाळा, लाजाळूं, गुळवेल, वावडिंग, पित्तपापडा व धमासा, यांचा काढा खडीसाखर घालून द्यावा.

**गर्भपात**:—भय, अभिघात, उष्ण पदार्थ खाणें व विषम भोजन, इत्यादिकांनीं गर्भपात होतो. गर्भपात होत-असतां शूलयुक्त रजोदर्शन होतें. चौथ्या महिन्यापर्यंत गर्भ पातळ अवस्थेंत असल्यामुळें तो स्रवतो ह्मणून त्यास स्राव ह्मणतात, व पुढें जो गर्भ पडतो त्यास गर्भपात ह्मणतात.

**गर्भपातावर उपचार**:-१-कुंभाराच्या हाताची माती शेळीच्या दुधांत कालवून द्यावी. २-जांबळीच्या सालीचा रस, आंबाड्याचे सालीचा रस, आणि आंब्याचे सालीचा रस प्रत्येकीं पैसाभार घेऊन त्यांत २ मासे जिऱ्याची पूड व सहा मासे खडीसाखर घालून एकदां द्यावें. एखादे सालीचा रस न आल्यास साल वाटून दूध घालून काढावा. **पथ्य**:-दूध भात, तूप साखर व गव्हांचे पदार्थ ३--साखर कमळाचीं बिसें आणि तीळ हे पदार्थ समभाग घेऊन वाटून तें मधाबरोबर द्यावें, ह्मणजे गर्भपाताचें भय रहात नाहीं.

**सूतिकारोग (बाळंत रोग)**—अंग मोडून येणें, ज्वर, तृषा, अंगाला जडत्व सूज, ढाळ, आणि शूल, हीं लक्षणें झालीं ह्मणजे बाळंतरोग झाला असें समजावें. होण्याचें कारण—बाळंतिणीला भलते उपचार करणें, अजीर्ण, दोषजनक अन्न किंवा पान यांचें सेवन इत्यादि. बल आणि मांस यांचा क्षय झाला असतां असाध्य समजावा.

**उपचारः**—१-यादी नंबर २१५ चें औषध. द्यावें हें फार उत्तम आहे. २—यादी नंबर २१६ चें औषध द्यावें. हेंहि चांगलें आहे. ३—यादी नंबर ३१ चा किंवा नंबर १६ चा काढा द्यावा. ४--सौभाग्य सुंठ द्यावी. (यादी नंबर २२६ पहा.) ५—कोहाळेपाक द्यावा (यादी नंबर १६३ पहा.) ६--कारवींचें बीं शेळीच्या मूत्रांत ७ दिवस द्यावें. ७—प्रतापलंकेश्वर द्यावा (यादी नं. १३१ पहा.)

**पथ्यः**—रक्तपित्तावर पथ्य किंवा अपथ्य जें सांगितलें आहे तें दोष पाहून योजावें.

**विशेष सूचनाः**—बाळंतरोगावर वर लिहिलेलें नंबर २१५ चें औषध अति उत्तम अनुभविक आहे. प्रथम हें द्यावें. पथ्य मात्र त्यांत सांगितल्याप्रमाणें केलें पाहिजे.

## हलीमक.

पांडुरोगामध्यें पित्तवायु कुपित होऊन त्यापासून हा रोग होत असतो.

**लक्षणः**—शरिराचा रंग हिरवा निळा किंवा पिंवळा, शक्ति क्षीण, डोळ्यांवर झांपड, अग्नीमांद्य, बारीक ज्वर, स्त्री विषयीं अप्रीति, श्वास, खोकला, तहान, अरुचि इत्यादि.

**उपचारः**—लोहभस्म आणि नागरमोथ्याचें चूर्ण हीं एकत्र करून तें खैराच्या सालीचे काढ्याबरोबर द्यावें. २—पांडुरोगावरचे व कामलेवरचे उपचार करावे.

**पथ्यः**—ओकारी, रेच, तांबड्यासाळी, गहूं, मूग, तुरी, पडवळ कोंवळी वांगीं, कांदे, लसूण, ताक, तूप, लोणी, आंवळे, जुनेंकेळें, पिक्का आंबा, हळद, तुरट पदार्थ इ.

**अपथ्यः**—धूम्रपान, मैथून, भुयमूग, पालेभाज्या, हिंग, उडीद, विडा, मध, आम्लपदार्थ, जड व विदाहि अन्न इत्यादि.

